**बरीस वासिल्येव**

# शांत इथे पहाटवेळा...

कादंबरी


राद्गा प्रकाशन
मॉस्को



लोकवाङ्मय गृह प्रा. लि.
मुंबई



१

स्टेशन क्र. १७१ वर बारा घरे, आगीच्या बंबाची एक शेड आणि लांबच लांब सखल गुदाम टिकून राहिले. मोठमोठ्या दगडांना काळजीपूर्वक तासून ह्या शतकाच्या आरंभी गुदामाची बांधणी झाली होती. गेल्या वेळेच्या हवाई हल्ल्यात पाण्याची टाकी कोसळली होती आणि इतःपर येथे आगगाड्या थांबत नव्हत्या. जर्मन आता जरी बाँबफेक करीत नव्हते, तरी अजूनही दररोज त्यांची विमाने स्टेशनवर घिरट्या घालून जायची. सावधगिरी म्हणून सोविएत लष्करी ठाण्याने चार नळयांच्या दोन विमानविरोधी तोफा सज्ज ठेवल्या होत्या.

१९४२ चा मे महिना. पश्चिमेला (दमट रात्री अवजड तोफांचा अशुभ गडगडाट ऐकू यायचा) दोन्ही बाजू मोर्चे लावून बसल्या होत्या व सरतेशेवटी आपापले मोर्चे लढवण्यात गुंतल्या होत्या. पूर्वेला जर्मन रात्रंदिवस कालव्यावर आणि मूर्मान्स्कच्या रस्त्यावर बाँब फेकत होते. उत्तरेला सागरी मार्गांसाठी कडवी धुमश्चक्री उडाली होती. दक्षिणेत वेढ्यातील लेनिनग्राद ठाम प्रतिकार करीत होते.

पण इथे मात्र एखाद्या विश्रामस्थळासारखे भासत होते. निवांत परिसर आणि रिकामपणामुळे सैनिकमंडळी बाष्पस्नान घेतल्यासारखी नरम बनली होती. बाँबहल्ल्यांमधून टिकून राहिलेल्या बारा घरांमधून अजून भरपूर तरुणी व विधवा होत्या. कोणत्याही वस्तूपासून, अगदी डासांच्या गुणगुणीपासून-सुद्धा, हातभट्टीची दारू गाळण्यात त्या पटाईत बनल्या होत्या. नवे गोलंदाज पहिले तीन दिवस भरपूर झोपा काढत आणि एकूण परिस्थितीचा अंदाज घेत. चौथ्या दिवशी कुणाच्यातरी वाढदिवसाचा उत्सव साजरा करण्यास आरंभ होई आणि त्यानंतर दारूचा चिकट दर्प स्टेशनला कायमचा वेढून टाकी.

स्टेशनचा कमांडंट, उदास चेहऱ्याचा सार्जंट-मेजर फेदोत वास्कोव, प्रत्येक गैरवर्तनाचा अहवाल वरिष्ठ अधिकाऱ्यांना लिहून कळवायचा. अशा अहवालांची संख्या दहापर्यंत पोहो-चली, म्हणजे वास्कोवचा वरिष्ठ अधिकारी त्याला नेहमीप्रमाणे तंबी द्यायचा आणि चैनी आयुष्य जगल्यामुळे आता डोळ्यांखाली फुगीर सुजवटे आलेल्या लोकांच्या जागी नवी अर्धी पलटण पाठवून द्यायचा. सुमारे आठवडाभर मदतीची मागणी न करता कमांडंट कसेबसे निभावून न्यायचा, पण त्यानंतर प्रत्येक गोष्ट नेमकी पूर्वीसारखीच घडायची. शेवटी शेवटी तर तो स्वतःच्या आधीच्या अहवालांच्या नुसत्या नकला उतरवून काढू लागला, फक्त नव्या तारखा आणि नवी नांवे लिहू लागला.

"वेळेचा अपव्यय!" अगदी नवे अहवाल तपासायला आलेला मेजर गरजला. "वेळेचा आणि कागदाचा अपव्यय! तुम्ही कोण – कमांडंट की लेखक?"

"दारू न पिणारे लोक पाठवा!" वास्कोव निग्रहाने परत म्हणाला. मोठ्यांदा गरजणाऱ्या सगळ्या अधिकाऱ्यांची जरी

त्याला भीती वाटायची, तरी तो स्वतःची बाजू निकराने लढवीत होता. "दारू न पिणारे... आणि बायकांच्या मागं न धावणारे!"

"म्हणजे हिजडे?"

"ते तुम्हालाच जास्त चांगलं माहीत..." सार्जंट-मेजर नावग्रपणे उत्तरला.

"बरं, बरं, वास्कोव," स्वतःच्या कडक शिस्तीनुसार वाहवत जाऊन मेजर भयानक आवाजात म्हणाला. "तुम्हाला दारू न पिणारे मिळतील आणि बाईबाजी करणारेही त्यात नसतील. मात्र याद राखा सार्जंट-मेजर, जर त्यांच्याशी तुम्ही जमवून घेतलं नाही..."

"होय, साहेब," कमांडंट मख्खपणे उत्तरला.

विमानविरोधी तोफांचे एकही ओरखडा न उमटलेले गोलंदाज मेजर आपल्यासमवेत घेऊन गेला. जाताना त्याने वास्कोवला परत एकदा आश्वासन दिले की, खुद्द सार्जंट-मेजरपेक्षाही जास्त प्रमाणात बायकांचा तिटकारा करणारे व हातभट्टीला न शिवणारे नवे गोलंदाज लौकरच तो पाठवून देईल. अर्थात ह्या आश्वासनाला जागणे फारसे सोपे नसावे, कारण तीन दिवसांच्या अवधीत चिटपाखरूसुद्धा तेथे फिरकले नाही.

"ही फार अवघड कामगिरी आहे," सार्जंट-मेजर आपली घरमालकीण मारीया निकीफरोवनाला म्हणाला. "दोन विभाग म्हणजे. जवळ जवळ वीस दारू न पिणारी, सबंध आघाडी जरी त्यांनी विंचरून काढली, तरी अशी माणसं त्यांना सापडतील किंवा नाही याबद्दल मला शंकाच आहे..."

पण त्याच्या शंकांना आधार नव्हता असे सिद्ध झाले, कारण दुसऱ्या दिवशी सकाळी त्याच्या घरमालकिणीने घोषणा

केली की, गोलंदाज आले होते. तिच्या आवाजात काहीसा खट्याळपणा होता, पण सार्जंट-मेजर अजून अर्धवट झोपेत असल्यामुळे तो त्याच्या नेमका ध्यानात आला नाही. त्याला सर्वांत चिंताजनक वाटणारा प्रश्न त्याने विचारला: "त्यांच्या-बरोबर कुणी अधिकारी आहे?"

"तसं काही दिसत नाही."

"बरं झालं बुवा!" सार्जंट-मेजरला स्वतःच्या कमांडंटपदाचे फार प्रेम होते. "अधिकारात वाटणी करण्याइतकं दुसरं वाईट काही नाही."

"एवढ्यात आनंद साजरा करू नका," गूढ स्मित करीत घरमालकीण म्हणाली.

"युद्ध संपल्यानंतर आपण आनंद साजरा करू," वजनदार-पणे फेदोत एवग्राफीच म्हणाला. त्याने डोक्यावर टोपी घातली व तो बाहेर गेला.

आवार ओलांडायला त्याने आरंभ केला आणि एकदम जाग-च्या जागी थिजून तो उभा राहिला. त्याच्या पुढ्यात पेंगुळले-ल्या मुलींच्या दोन रांगा उभ्या होत्या. आपण अजूनही स्वप्नात आहोत असे सार्जंट-मेजरला वाटले आणि नजर स्वच्छ करण्या-साठी त्याने डोळ्यांची उघडझाप केली. पण लष्करी नियमां-मध्ये नमूद न केलेल्या जागी गोलंदाजांच्या लष्करी कुडत्यांना फुगवटे आलेले होते व त्यांच्या टोप्यांखालून वेगवेगळ्या रंगां-च्या आणि प्रकारांच्या केसांच्या बटा रुळत होत्या.

"कॉम्रेड सार्जंट-मेजर, पहिला आणि दुसरा विभाग, तिसरी पलटण, अलग केलेल्या विमानविरोधी बटालियनची पाचवी कंपनी उद्दिष्टाचं रक्षण करायला तुमच्यापुढं हजर आहे," वरिष्ठ मुलीने निर्विकार आवाजात वर्दी दिली.

"सार्जंट कीर्यानोवा, साहाय्यक पलटण कमांडर, वर्दी देत्येय."

"ठीक," नियमांमध्ये नमूद केल्याप्रमाणे अजिबात न बोलता कमांडंट म्हणाला. "तर त्यांना दारू न पिणारे सापडले..."

दिवसभर तो कुऱ्हाड चालवीत होता, आगीच्या बंबाच्या शेडमध्ये तात्पुरते पलंग बनवत होता, कारण नव्या गोलंदाजांनी स्थानिक लोकांच्या घरांमध्ये राहण्यास नकार दिला होता. मुली फळ्या वाहून नेत होत्या, तो सांगील ते काम पार पाडत होत्या. अनेक नीलकण्ठ पक्षी एकत्र यावेत त्याप्रमाणे अखंड बडबडत होत्या. स्वतःचा आब कायम राखण्यासाठी सार्जंट-मेजर गंभीर मौन धारण करून होता.

"माझ्या परवानगीशिवाय छावणीबाहेर पाऊल टाकायचं नाही," सर्व काही तयार झाल्यानंतर त्याने घोषणा केली.

"रानफळं गोळा करायलासुद्धा?" एका पिंगट केसवाल्या मुलीने धीटपणे विचारले. वास्कोवच्या ती आधीच नजरेत आली होती.

"अजून रानफळं नाहीत," तो म्हणाला.

"आंबटचुक्याचं काय? तो आम्ही गोळा केलेला चालेल?" कीर्यानोवाने पृच्छा केली. "आम्हाला जादा शिध्याशिवाय अवघड जातं, कॉम्रेड सार्जंट-मेजर, नाहीतर आम्ही वाळून जाऊ."

सार्जंट-मेजर वास्कोवने तट्ट फुगलेल्या कुडत्यांवरून शंकित नजर फिरवली, पण तो कबूल झाला: "मात्र तरीही, नदीपल्किडं नाही. दरीत खूप आंबटचुका आहे."

स्टेशनवर पूर्ण शांतता नांदू लागली, पण कमांडंटची शांतता मात्र पळाली. गोलंदाज मुली फारच गोंगाट करणाऱ्या आणि सतावणाऱ्या निघाल्या. सार्जंट-मेजरला लौकरच स्वतःच्या

घरात पाहुण्यासारखे वाटू लागले. चुकीचे बोलू अथवा चुकीचे वागू, अशी त्याला सतत भीती वाटू लागली. आणि खोलीत शिरण्यापूर्वी दारावर टकटक करायला जर तो विसरला, तर भयानक किंचाळ्यांमुळे त्याला तात्काळ पाय मागे घ्यावा लागे. त्यांच्यापैकी कुणावरतरी त्याचा डोळा आहे असा जर कुणी विनोद केला अगर सूचना केली तर काय, ह्याची त्याला सर्वांत जास्त भीती वाटत होती. म्हणून तो सतत जमिनीवर नजर खिळवूनच वावरत होता. जणू गेल्या महिन्याचा त्याचा पगार हरवला होता असे त्याच्याकडे पाहणाऱ्याला भासत होते.

"जरा उल्हासी बना, एवढे कष्टी राहू नका," त्याचे एकूण वर्तन पाहून त्याची घरमालकीण म्हणाली. "तुमच्यापाठी त्या तुम्हाला म्हातारा म्हणतात, तेव्हा त्याच पद्धतीनं त्यांच्याशी वागा."

सार्जंट-मेजरने त्या वसंतात स्वतःचा बत्तीसावा वाढदिवस साजरा केला होता आणि स्वतःला म्हातारे वाटून घेण्याची त्याची मुळीच तयारी नव्हती. थोडा विचार केल्यानंतर तो अशा निष्कर्षाला आला की, त्याच्या घरमालकिणीचा स्वतःचे स्थान बळकट करण्याचा तो प्रयत्न होता. कारण वसंतामधल्या एका रात्री सार्जंट-मेजरच्या हृदयातील बर्फ वितळविण्यात तिला यश आले होते आणि आता साहजिकच भक्कम मोर्चा लावण्याचे तिचे प्रयत्न चालले होते.

रात्रीच्या वेळी गोलंदाज पोरी जर्मन विमानांवर आठही नळ्यांमधून भडिमार करीत आणि दिवसभर अखंड धुणी धूत, आगीच्या बंबाच्या शेडभोवती सर्वत्र स्वतःची अंतर्वस्त्रे वाळत घालत.

असली सजावट सार्जंट-मेजरला मान्य नव्हती. त्याने सार्जंट कोयनोवाला परखडपणे तसे सांगितले आणि नमूद केले की, त्यामुळे आडोसा नष्ट होत आहे.

"पण त्याबाबत हुकूम आहे," डोळ्याची पापणी न लववता तिने प्रत्युत्तर केले.

"कसला हुकूम?"

"नेमक्या ह्याच प्रश्नावर. त्यात म्हटलंय की, सर्व महिला सैनिकांना सर्व आघाड्यांवर स्वतःची अंतर्वस्त्रं वाळत घालण्याची परवानगी आहे."

कमांडंटने वाद घातला नाही. ह्या मुलींबरोबर तसे शक्यच नव्हते. एकदा का त्यांच्याशी वाद सुरू केला असता, तर शरदाच्या मोसमापर्यंत त्यांची टिव टिव चालली असती...

वातावरणात खूप उष्णता होती आणि वारा पडलेला होता. प्रचंड प्रमाणात डास झाल्यामुळे त्यांचे निवारण करण्यासाठी कोणी एखादी डहाळी घेतल्याविना एक पाऊल पुढे टाकता येत नव्हते. तरीही, लष्करी माणसाच्या हाती डहाळी दिसली तर फारसे बिघडण्यासारखे नव्हते. पण लौकरच कमांडंट प्रत्येक कोपऱ्यावर खोकताना आणि खाकरताना ऐकू येऊ लागला— जणू तो खरोखरच म्हातारा होता. ही एक दुसरीच बाब होती.

ते सगळे सुरू झाले मेच्या एका मनस्वी उकाड्याच्या दिवशी. गुदामाच्या कोपऱ्यापासून तो वळला आणि एकदम थबकला. शुभ्र नागवा स्त्री-देह आठ वेळा नजरेस पडल्यामुळे त्याचे डोळे अक्षरशः दिपून गेले आणि त्याला अक्षरशः हीव भरले. संपूर्ण महिला विभाग, त्याची कमांडर ज्युनियर सार्जंट ओस्यानीना-सकट सर्वजणी, सैन्यातून पुरवलेल्या ताडपत्रीवर पूर्णतया

नग्न अवस्थेत सूर्यस्नान घेत पहुडल्या होत्या. निदान देखाव्यापुरते त्यांनी चीत्कार काढले असते, पण त्याऐवजी ताडपत्रीवर नाके टेकवून त्या मूकाट तशाच पडून राहिल्या. त्यामुळे चोरून बघणारा मुलगा सापडावा तशी सार्जंट-मेजरची परिस्थिती झाली व त्याला माघार घ्यावी लागली. त्या दिवसापासून जणू डांग्या खोकला झाल्याप्रमाणे दर कोपऱ्याशी त्याने खोकायला आरंभ केला होता.

कडक नजरेची ओस्यानीना त्याच्या आधीच लक्षात आली होती. ती कधीही हसत नसे. तिच्या ओठांची किंचित हालचाल व्हायची, पण तिचे डोळे कायम गंभीर रहात. ओस्यानीना अगदी विचित्र मुलगी होती व म्हणून वास्कोवने आपल्या घरमालकिणीमार्फत तिच्याविषयी अधिक माहिती काढण्याचे सावध प्रयत्न केले. अर्थात त्याची घरमालकीण ही कामगिरी पार पाडण्यास फारशी राजी नव्हती हे त्याच्या ध्यानात आले होते.

"ती विधवा आहे", एक दिवसानंतर मारीया निकीफरोवनाने घोषित केले व ओठ घट्ट मिटले. "तेव्हा तुम्हाला स्वतःचे खेळ सुरू करायला हरकत नाही — ती काही निष्पाप बालिका नाही."

वास्कोवने काहीच भाष्य केले नाही. बाईला शब्दांनी पटवून देणे अशक्यच. त्याने कुऱ्हाड उचलली व तो बाहेर गेला. विचार करायचा असेल तेव्हा लाकडे फोडण्याइतका दुसरा उत्तम मार्ग नाही आणि त्याला खूप गोष्टींबाबत विचार करायचा होता. त्याला स्वतःच्या विचारांची व्यवस्थित जुळणी करावयाची होती.

सर्वप्रथम, शिस्त प्रस्थापित करणे आवश्यक होते. आता

नडगन घडत नव्हते आणि स्थानिक बायकांबरोबरच्या भानग-डी होत नव्हत्या हे ठीक – वरपांगी सर्व काही ठीक होते. ... खोलवर खणल्यास खूप बेशिस्त होती.

न्यूदा, वेरा आणि कात्या – पहाऱ्याचं काम! कात्या, ... कामाचा ताबा घे."

अशाना पहारा बसवायची ही काय योग्य पद्धत होती? ही ... लष्करी नियमांनुसार काटेकोरपणे घडायला हवी होती. नियमांच्या ह्या थट्टेबाबत काहीतरी करणे त्याला भाग होते. ... काय? त्याने त्यांच्या वरिष्ठापाशी ह्याबाबत चर्चा करायचा प्रयत्न केला, पण कीर्यानोवाने त्याला सुनावले: "आम्हाला परवानगी आहे... खुद्द सेनापतींकडून."

त्या छोट्या कैदाशिणी त्याला हसत होत्या.

"फेदोत एवग्राफीच, फार प्रयत्न करतोस?"

तो मागे वळला. शेजारी राहणारी पालीना येगोरोवा त्याला विचारत होती. ही बाई महावाह्यात होती. आधीच्या महिन्यात तिने आपला वाढदिवस चारदा साजरा केला होता.

"तू फार श्रमू नकोस फेदोत एवग्राफीच, आता तू एकटाच उरला आहेस आमच्यासाठी, गोठ्यातल्या बैलासारखा!"

खो खो हसत ती कुंपणावर ओणवी झाली आणि भट्टीतून काढलेल्या ताज्या पावासारखे दिसणारे तिचे स्तन उघडे पडले.

"आता तुला गुराख्याप्रमाणं घरा-घराच्या फेऱ्या कराव्या लागतील. एका घरात एक आठवडा, दुसऱ्या घरात दुसरा आठवडा. आम्हा बायकांनी तुझ्या बाबतीत असं ठरवलंय."

"ए पालीना येगोरोवा, जरा चाड बाळग. तू सैनिकाची बायको आहेस का कुठली छिनाल बाई आहेस? थोडं जबाब-दारीनं वाग."

"सगळे दोष युद्ध आपल्या माथी घेईल, एवग्राफीच. सैनिक आणि सैनिकांच्या बायका जे काही करतील त्या सगळ्यांचं!"

अशा बाईशी तो काय बोलणार? तिला तेथून हाकलून लावायला पाहिजे होते. पण कसे? नागरी अधिकारी कुठे होते? ती त्याच्या अधिकारकक्षेबाहेर होती. भसाड्या आवा-जात बोलणाऱ्या मेजरबरोबर त्याने ह्या प्रश्नाची चर्चा केली होती.

खरेच, त्याला खूप विचार करायचा होता—किमान दोन घनमीटर लाकडामधून जाण्याइतका. प्रत्येक विचाराचा खास परामर्श घेणे भाग होते. अगदी खास परामर्श...

अशा प्रकारच्या गोष्टींमध्ये त्याच्या शिक्षणाचा अभाव मोठा अडथळा ठरत होता. तो लिहा-वाचायला शिकला होता, त्याला गणित येत होते, हे खरे. पण त्याने शाळेच्या फक्त चार इयत्ता केल्या होत्या. चौथीच्या वर्गाच्या अखेरी तो होता तेव्हा त्याच्या वडिलांना अस्वलाने ठार मारले होते. ह्या पोरींना जर त्या अस्वलाबद्दल समजले तर किती हसतील त्या! कमाल होती—त्याचे वडील पहिल्या महायुद्धात विषारी वायू-मुळे मेले नव्हते, यादवी युद्धात तलवारीचा घाव बसून ठार झाले नव्हते, कुलकाच्या बंदुकीतील गोळीने मेले नव्हते, बिछान्यात आजारपणानेही त्यांना मृत्यू आला नव्हता. त्यांच्यावर अस्वलाने उडी घातली होती! ह्या पोरींनी अस्वलाला फक्त प्राणिसंग्रहालयातच पाहिलेले असणार...

होय, फेदोत वास्कोव, तू कमांडंट असशील, पण तू कुठल्यातरी अतिदूरच्या गावढ्या गावातून सरपटत आला आहेस, पण त्या जरी सामान्य शिपाई असल्या तरी त्यांना शास्त्राची माहिती आहे, त्या कोनमापकांचे आणि कोनांचे

त्यांना ज्ञान आहे. त्यांच्या बोलण्यांवरून ध्यानात येते की, त्यांनी निदान सातवी अथवा नववी पास केलीय. नऊमधून चार उणे केले म्हणजे पाच उरतात. म्हणजे त्याने खुद्द शाळेत जेवढी वर्षे काढली होती, त्यापेक्षा जास्त वर्षांनी तो त्यांच्या मागे होता.

ह्या उदास विचारांपायी बेभान होऊन तो लाकडे फोडू लागला. पण दोषी कोण? ते बेंगरूळ अस्वल?

आश्चर्य वाटण्यासारखे होते, पण आत्तापर्यंत तो स्वत:ला जीवनात सुदैवी समजत होता. तसे म्हटले तर तक्रार करण्यास-ही त्याच्यापाशी पुरेसे कारण नव्हते. कारण चौथीपर्यंतच्या तुटपुंज्या शालेय शिक्षणाच्या शिदोरीवर त्याने रेजिमेंट विद्याल-याचा अभ्यास पूर्ण केला होता व दहा वर्षांच्या लष्करी सेवेनंतर आता तो सार्जंट-मेजर पदापर्यंत पोहोचला होता. तेथे सर्व-काही सुरळीत पार पडले होते, पण इतर क्षेत्रांमध्ये अधूनमधून त्याच्यावर अचानक घाला पडत होता व एकदोनदा तर त्याच्या दैवाने त्याच्यावर अगदी जवळून गोळ्या झाडल्या होत्या. तरीही, फेदोत वास्कोव टिकून राहिला होता...

फिन्लंडविरोधी युद्धाच्या जरा आधी त्याने शिबंदीच्या इस्पितळातील एका नर्सशी लग्न केले होते. ती खूप उत्साही बाई ठरली होती. तिला गायला, नाचायला आणि दारू प्यायला खूप आवडत होते. तिने त्याला एका मुलाची देणगी दिली होती. त्या मुलाचे नांव त्यांनी इगोर ठेवले – इगोर वास्कोव. मग फिन्लंडचे युद्ध सुरू झाले आणि वास्कोव युद्ध-आघाडीवर गेला. दोन पदके छातीवर लटकावून जेव्हा तो परत आला, तेव्हा त्याच्या दैवाने त्याच्यावर पहिला प्रहार केला. जेव्हा वास्कोव ऐन बर्फात स्वत:चा जीव धोक्यात घालून लढत

होता, तेव्हा त्याची बायको रेजिमेंटमधल्या पशुडॉक्टरबरोबर दक्षिणेत पळून गेली होती. वास्कोवने तात्काळ तिला घटस्फोट दिला, कोर्टामार्फत मुलाचा ताबा घेतला आणि खेड्यात आपल्या म्हाताऱ्या आईकडे मुलाला पाठवून दिले. बारा महिन्यांनंतर मुलगा मेला आणि त्यानंतर वास्कोवच्या मुद्रेवर फक्त तीनदा स्मित उमटले: जनरल जेव्हा त्याच्या छातीवर पदक लावत होते, सर्जननी जेव्हा त्याच्या खांद्यामधून तोफगोळ्याच्या कवचाचा तुकडा उपसून काढला आणि त्याची सध्याची घरमालकीण मारीया निकीफरोवना हिच्या समजशक्तीबद्दल.

त्या तोफगोळ्याच्या कवचामुळे त्याला सध्याचे पद मिळाले होते. गुदामात अजूनही काही माल होता, पण त्याचे रक्षण करायला पहारेकरी नव्हते. म्हणून कमांडंटची नेमणूक झाली होती आणि त्याच्यावर गुदामाची जबाबदारी सोपवण्यात आली होती. दिवसातून तीनदा वास्कोव गुदामाला भेट द्यायचा, कुलूपे तपासून पहायचा आणि नोंदवहीत तीच ठराविक नोंद करायचा: "तपासणी केली. सर्व ठाकठीक." मग तपासणीच्या वेळेची नोंद व्हायची.

सार्जंट-मेजर वास्कोवचे जीवन निवांतपणे चालले होते. अगदी आजपर्यंत सर्व काही शांतपणे. पण आता...

सार्जंट-मेजरने उसासा टाकला.

## २

युद्धापूर्वीच्या सर्व प्रसंगांपैकी रीता मूश्ताकोवाला ठळक आठवण होती तिच्या शाळेत साजऱ्या झालेल्या एका संध्याकाळच्या कार्यक्रमाची—सीमारक्षकांपैकी सन्मानित वीरांनी त्यांच्या शाळेला भेट दिली होती. जणू काही आत्ताच ती संध्याकाळ

मगावी एवढी रीताच्या मनात तिची ताजी आठवण होती. नीमेनजीकच्या छोटचा गावातील प्रतिध्वनी निघणाऱ्या लाकडी पादपथावरून लाजरा लेफ्टनंट ओस्यानीन अजून तिच्याबरोबर चालतोय असे तिला भासत होते. लेफ्टनंट काही सन्मानित वीर नव्हता, पण योगायोगाने त्या प्रतिनिधीमंडळात त्याचा समावेश झाला होता व त्याबद्दल त्याला कमालीचे शरमिंदे वाटत होते.

खुद्द रीतालाही लाजल्यासारखे झाले होते. कोणत्याही औपचारिक समारंभात भाग न घेता अथवा हौशी कलाकारांच्या कार्यक्रमात भाग न घेता ती सभागृहात फक्त बसून होती आणि तिशीच्या आतील कोणत्याही पाहुण्याबरोबर संभाषण सुरू करण्यापेक्षा सर्व मजल्यांवरून धूम ठोकून उंदरांचा सुळसुळाट असलेल्या तळघरात लपणे तिने जास्त पत्करले असते. पण योगायोगाने लेफ्टनंट ओस्यानीन आणि ती शेजारी-शेजारी बसली होती. हलण्याचे अजिबात धाडस न करता, समोर नजरा रोखून ती दोघे बसली होती. नंतर, कुणीतरी चोर-शिपाई खेळ सुरू केला तेव्हा परत ती एकमेकांशेजारी योगायोगाने आली. त्यांना वॉल्तझ् नाच करण्याची शिक्षा मिळाली व एकत्र नृत्य करावे लागले. त्यानंतर दोघे खिडकीपाशी उभी राहिली. आणि नंतर... नंतर तो तिला घरापर्यंत पोचवायला गेला.

आणि त्यावेळी रीता अत्यंत धूर्त वागली. तिने दूरच्या रस्त्याने त्याला आपल्या घरापर्यंत नेले. पण तरीही, तो गप्प राहिला. उलट, दरवेळी तिची घाबरत परवानगी मागून तो धूम्रपान करत राहिला. तो घाबरटपणे विचारायचा तेव्हा प्रत्येक वेळी रीताच्या काळजाचा ठोका चुकत होता.

निरोपाच्या वेळीसुद्धा त्यांनी हस्तांदोलन केले नाही—फक्त

एकमेकांकडे पाहून मान लववली. बस्स, एवढेच. मग लेफ्टनंट सीमेवरील स्वतःच्या तुकडीकडे निघून गेला आणि दर शनिवारी तिला एक छोटेसे पत्र लिहू लागला. आणि दर रविवारी ती त्याला प्रदीर्घ उत्तर लिहू लागली. उन्हाळ्यापर्यंत असे चालले. जून महिन्यात एके दिवशी त्या छोटचा गावी तीन दिवसांच्या सुटीवर तो आला व त्याने बातमी दिली की, सीमेवर इतःपर शांतता नाही, आता यापुढे कुणाला रजा मिळणे शक्य नसेल आणि म्हणून त्यांनी सरळ नोंदणी कचेरीत जाऊन विवाह करणे आवश्यक आहे. रीताला ह्याचे मुळीच आश्चर्य वाटले नाही, पण कचेरीतील रजिस्ट्रार अस्सल नोकरशहा निघाला. त्याने त्यांचा विवाह नोंदण्यास नकार दिला, कारण रीताला वयाची अठरा वर्षे पूर्ण होण्यास अजून साडेपाच महिने अवधी होता. शेवटी गावातल्या कमांडंटला भेटून, तिच्या आई-वडिलांना भेटून, त्या दोघांनी आपले ईप्सित साध्य केले होते.

रीता तिच्या वर्गात लग्न करणारी पहिलीच ठरली होती. तेसुद्धा कुणा सोम्यागोम्याशी नव्हे – लाल सेनेतल्या एका कमांडरशी व तोही सीमारक्षक! पृथ्वीवर तिच्याइतकी सुखी दुसरी कोणतीही मुलगी असणे शक्य नव्हते.

सीमा-ठाण्यावर तिची महिला सोविएतमध्ये तात्काळ निवड झाली व सर्व वर्तुळांमध्ये तिला दाखल करण्यात आले. जखमींना बँडेज बांधणे, बंदूक चालवणे, घोड्यावर बसणे, ग्रेनेड फेकणे, विषारी वायूच्या हल्ल्यापासून स्वतःचे रक्षण करणे, अशा सर्व गोष्टी रीता शिकली. एक वर्षानंतर तिला मुलगा झाला (त्याचे नांव त्यांनी आल्बेर्त ठेवले – लाडके नांव आलिक), आणि त्यानंतर एक वर्षाने युद्ध पेटले.

युद्धाच्या पहिल्या दिवशी घबराट न उडालेल्यांमध्ये तिचा

...वेश होता. तिचा स्वभाव शांत आणि चिंतनशील होता. ... ह्यावेळी ती शांत असण्याचे साधे कारण म्हणजे मे महि-...न्यात तिने आलिकला आपल्या आई-वडिलांकडे पाठवून दिले ... व इतर लोकांच्या मुलांना वाचविण्याचे काम करणे ...मुळे तिला शक्य झाले होते.

...सीमेवरील ठाण्याने सतरा दिवस तग धरली. दूरवर चाल-...णारा गोळीबार रीताला दिवस-रात्र ऐकू येत होता. ठाणे ...जून शाबूत होते आणि त्याबरोबरच तिची आशाही शाबूत ...होती की, तिचा नवरा जिवंत आहे, सैन्याची नवी कुमक ...येईपर्यंत सीमारक्षक टिकून राहतील आणि नंतर ठोशास ...ठोसा देतील. ठाण्यावर एक गाणे म्हणत: "रात्र आली आणि ...धुक्याने सीमा झाकल्या, त्यांना कुणी ओलांडून येणार नाही ...आणि शत्रूला आम्ही सोविएत बागेत तोंड खुपसू देणार नाही." ... दिवस उलटत गेले, मदत आली नाही आणि सतराव्या ...दिवशी ठाणे थंड पडले.

इतर कुटुंबांबरोबर रीतालाही पिछाडीवर पाठवण्यात येणार ...होते, पण लढाईवर जाण्याची तिची इच्छा होती. मालगाडी-च्या डब्यात तिला जबरदस्तीने ढकलण्यात आले होते, पण ...वरिष्ठ लेफ्टनंट ओस्यानीनची, ठाण्याच्या उप-प्रमुखाची, ...ही बायको एका दिवसानंतर आरक्षित प्रदेशातील मुख्य ...ठाण्यावर परत आली. शेवटी तिला वैद्यकीय विभागात स्वच्छता करण्याच्या कामावर घेण्यात आले. सहा महिन्यांनंतर ...विमानविरोधी तोफांच्या रेजिमेंट विद्यालयात तिची पाठवणी झाली.

वरिष्ठ लेफ्टनंट ओस्यानीन युद्धाच्या दुसऱ्या दिवशी, ...सकाळच्या प्रतिहल्ल्याच्या वेळी, ठार झाला होता. जुलैमध्ये ...रीताला ही बातमी समजली होती. आता पडलेल्या ठाण्या-

मधून सीमारक्षकांपैकी एक सार्जंट चमत्काराने निसटून आला होता, तेव्हा त्याच्याकडून ही हकीकत समजली होती.

शूर लेफ्टनंटच्या ह्या स्मित न करणाऱ्या विधवेबद्दल एव्हाना सेनाप्रमुखांचे फार चांगले मत झाले होते. संदेशांमध्ये तिच्या नांवाचा उल्लेख होत होता, एक आदर्श म्हणून तिचा निर्देश करण्यात येत होता आणि तिची वैयक्तिक मागणी मान्य करण्यात आली होती. गोलंदाजीच्या अभ्यासक्रमाच्या अखेरी तिने इच्छा व्यक्त केली होती की, जेथे तिचा नवरा संगिनीं-च्या हातघाईच्या लढाईत ठार झाला होता त्या आघाडीवरील क्षेत्रात तिला पाठवण्यात यावे. आघाडी किंचित मागे सरली होती; सरोवरांशी चिकटली होती, जंगलांचा तिने आडोसा घेतला होता, पूर्वीचे सीमेवरील ठाणे आणि लेफ्टनंट ओस्या-नीन व ९ 'ब' मधील शाळकरी मुलगी एकमेकांना जेथे भेटली होती ते छोटेसे गाव, यांच्या दरम्यान कुठेतरी खंदक खणून मोर्चे धरलेले होते.

आता रीता समाधानी होती. तिला हवे होते ते मिळाले होते. तिच्या नवऱ्याचा मृत्यूसुद्धा आता तिच्या स्मृतींच्या खोल कप्प्यात मागे सारला गेला होता. तिला कामगिरी पार पाडायची होती, तिच्यावर जबाबदाऱ्या होत्या व विशिष्ट तिरस्काराचे तिचे उद्दिष्टविषय होते. शांतपणे आणि कठोरपणे द्वेष करायला ती शिकली होती. जरी तिच्या गोलंदाज पथकाने अद्याप शत्रूचे एकही विमान पाडले नव्हते, तरी एक जर्मन निरीक्षक बलून पाडण्यात तिला यश लाभले होते. त्या बलूनने पेट घेतला होता, ऐन हवेतच त्याची जळून राख बनली होती व एखाद्या दगडाप्रमाणे टोपलीतील निरीक्षक खाली कोसळला होता.

"उडव रीता, उडव!" तिच्या साथीदार मुली ओरडल्या होत्या.

रीता थांबून राहिली होती. खाली कोसळणाऱ्या ठिपक्या-वरून तिने तोफेची माशी बाजूला सरकवली नव्हती. जमिनी-च्या जवळ येताच त्या जर्मनाने हवाई छत्री उघडली होती. स्वत:च्या जर्मन देवाचे तो नि:संशयपणे आभार मानत असावा, तोच तिने शांतपणे चापाचा खटका दाबला. चार नळ्यांमधून बाहेर पडलेल्या फैरींनी त्या काळया आकृतीच्या चिंध्या चिंध्या उडाल्या. मुलींनी विजयोन्मादाने आरोळ्या ठोकल्या व रीतावर चुंबनांचा वर्षाव केला. रीताने एक थंड स्मित केले. सबंध रात्रभर ती शहारत होती आणि साहाय्यक पलटण-प्रमुख कीर्या-नोवाने तिला चहा देत तिचे सांत्वन केले होते: "रीता, हे निघून जाईल. पहिल्या वेळी मी जेव्हा माणसाला ठार मारलं तेव्हा मलाच जवळ जवळ मेल्याची भावना झाली होती. सबंध महिनाभर त्या गलिच्छ जर्मनाचं मला स्वप्न पडायचं..."

कीर्यानोवाची लढाईची मोठी कारकीर्द होती. फिन्लंडच्या युद्धात तिला बराच अनुभव मिळाला होता. प्रथमोपचाराची पडशी घेऊन युद्धआघाडीवर सरपटत तिने बरीच कामगिरी बजावली होती आणि त्याबद्दल तिला सन्मानपदक मिळाले होते. तिच्या स्वभावातील कणखरपणाचा रीताला आदर वाटायचा, पण तिच्याविषयी विशेष ओढ मात्र वाटायची नाही.

रीता नेहमी थोडीशी अलिप्तच रहायची. विभागातील सर्व मुली कम्सामोलच्या* सदस्या होत्या आणि त्या रीतापेक्षा

---

*सोविएत कम्युनिस्ट युवक संघ.

वयाने लहान होत्या असे नव्हे, पण अगदीच पोरसवदा होत्या. ना त्यांना माहीत होते प्रेम ना मातृत्व. ना माहीत होते दु:ख ना आनंद. वेगवेगळ्या लेफ्टनंटांबाबत आणि चुंबनांबाबत त्या उगीच वटवट करत व आता रीताला ते सर्व त्रासदायक वाटू लागले होते.

"झोपायला जा!" आणखी एक कबुलीजबाब ऐकल्यानंतर ती तुटकपणे म्हणाली. "आणखी असला मूर्खपणा ऐकायला आला, तर पहाऱ्यावर उभं राहण्याचं भरपूर काम करावं लागेल."

"अग पण रीता," कीर्यानोवा सूर लांबवत आळसटपणे म्हणाली, "खुशाल वटवट करू देत. त्यांना त्यात गंमत वाटते."

"त्या प्रेमात पडल्या तर माझी काही हरकत नाही. पण हे कोपऱ्यांच्या आडोशानं मिठ्या मारणं मला समजत नाही."

"त्यांना उदाहरण घालून दे," स्मित करत कीर्यानोवा म्हणाली.

रीता एकदम गप्प झाली. तसे कसे काय घडू शकेल ह्या-बद्दल ती कल्पनाच करू शकत नव्हती. कारण इत:पर पुरुष तिच्या दृष्टीने अस्तित्वातच नव्हते. एकच पुरुष होता— युद्धाच्या दुसऱ्या पहाटेला अत्यंत दबाव आलेल्या त्या सीमेवरील ठाण्याचे रक्षण करताना हातघाईच्या लढाईत तो पुरुष लढला होता. ताठ मानेने आणि कमरपट्टा कसून ती जगत होती. अगदी शेवटच्या छिद्रापर्यंत कमरपट्टा ताणत होती.

मे दिनाच्या जरा आधी तोफखान्याला गंभीर प्रसंगातून जावे लागले होते. पाऱ्यासारख्या 'मेस्सेरश्मिट' विमानां-बरोबर त्याची दोन तास तुंबळ लढाई झाली. थेट सूर्यावरून

जर्मनांनी विमानविरोधी तोफांच्या मोर्चांवर सूर मारले होते आणि आग ओकली होती. दारूगोळा वाहण्याचे काम करणाऱ्या एका लठ्ठ, सुमार रूपाच्या, नकट्या नाकाच्या मुलीला त्यांनी ठार मारले होते. ही मुलगी नेहमी गुपचूप काहीतरी चघळत असायची. इतर दोघींना किंचित जखमा झाल्या. तुकडीचे कमिस्सार दफनविधीला हजर होते. मुली हमसाहमशी रडल्या, थडग्यावर सलामीची फैर उडवण्यात आली आणि नंतर कमिस्सारनी रीताला एका बाजूला बोलावून घेतले.

"विभागात आपल्याला ताकद आणली पाहिजे."

रीता गप्प राहिली.

"तुमचं पथक छान आहे, मार्गारीता स्तेपानोवना. युद्ध-आघाडीवर बायका सर्वांत जास्त सर्वांचं लक्ष वेधून घेतात हे तुम्हाला स्वतःलाच ठाऊक आहे. आणि काही वेळा त्यांचा संयम सुटतो."

पुन्हा रीता गप्प राहिली. कमिस्सारनी पावलांची चाळवा-चाळव केली, सिगारेट शिलगावली आणि काहीशा नरम आवाजात ते म्हणाले: "एका वरिष्ठ अधिकाऱ्यानं—ते कर्नल आहेत आणि विवाहित गृहस्थ आहेत—एक मैत्रीण शोधली. माझ्या वरिष्ठांना जेव्हा हे समजलं, तेव्हा त्यांनी कर्नलची खरडपट्टी काढली आणि त्यांच्या मैत्रिणीला एखाद्या चांगल्या पथकात कामाला लावण्याची जबाबदारी माझ्यावर टाकली."

"पाठवा इकडं," रीता म्हणाली.

दुसऱ्या दिवशी सकाळी तिने त्या मुलीला पाहिले आणि कौतुकाने तिचे मन भरून आले—ती उंच, पिंगट केसांची आणि दुधाळ कांतीची होती. तिचे डोळे लहान मुलासारखे होते—हिरवे आणि बशांप्रमाणे गोल.

"प्रायव्हेट येवगेनिया कोमेल्कोवा वर्दी देतेय..."

त्या दिवशी स्नानाचा दिवस होता आणि जेव्हा सगळ्या विवस्त्र झाल्या तेव्हा ह्या नवागत मुलीकडे जणू ती चमत्कार असल्याप्रमाणे सर्वजणी टकमका बघत राहिल्या.

"झेन्या, तू खरी जलपरी आहेस!"

"झेन्या, तुझी कांती पारदर्शी आहे!"

"झेन्या, तुझ्यातून शिल्प घडवतील!"

"झेन्या, तू ब्रेसियर न घालताच फिरत जा!"

"झेन्या, तुला खरं म्युझियममध्येच ठेवायला हवं! काळ्या मखमालीवर, काचेच्या पेटीत!"

"बिच्चारी!" उसासत कीर्यानोवा म्हणाली. "अशा शरीराला लष्करी गणवेषात कोंबायचं म्हणजे... मी त्यापेक्षा मरण पत्करीन!"

"ती सुंदर आहे," रीताने सावधपणे सुचवले. "सुंदर मुली क्वचित सुदैवी ठरतात."

"स्वत:बद्दल विचार करतेस?" कपटी हास्य करत कीर्यानोवाने विचारले.

रीता गप्प राहिली. साहाय्यक पलटण-प्रमुख कीर्यानोवा-बरोबर स्नेहभावाने राहणे तिला अशक्य होते.

पण झेन्याबरोबर तिची मैत्री होऊ शकली. कोणतीही पूर्वतयारी न होता, जमीन न चाचपता, अगदी सहजपणे त्यांची मैत्री जमली. रीताने ताबडतोब तिला स्वत:ची जीवन-कहाणी सांगितली. अंशत: झेन्याची खरडपट्टी काढण्याचा तिचा त्यात हेतू होता आणि अंशत: स्वत:चा आदर्श घालून तिला फुशारकी मारायची होती. उत्तरादाखल झेन्याने ना करुणा व्यक्त केली ना सहानुभूती. ती संक्षेपाने म्हणाली:

"अच्छा, म्हणजे तुलासुद्धा वैयक्तिक हिशेब चुकता करायचा आहे."

ते अशा काही रीतीने बोलले गेले की, जरी रीताला कर्नलविषयी सर्व ठाऊक होते, तरी तिने विचारले: "आणि तुला?"

"आता मी एकटी आहे. माझी आई, माझी बहीण आणि माझा छोटा भाऊ—सर्व मशिनगननं ठार झाले."

"लढाईत सापडले?"

"त्यांचा वध करण्यात आला. जर्मनांनी अधिकाऱ्यांच्या कुटुंबियांना पकडून नेलं आणि मशिनगनसमोर उभं केलं. समोरच्याच घरात एका एस्तोनियन बाईनं मला लपवून ठेवलं होतं आणि तो सर्व प्रसंग मी पाहिला. अगदी सर्व! माझी छोटी बहीण सर्वांत शेवटी कोसळली—त्यांना तिच्यावर दुसऱ्यांदा गोळ्या झाडाव्या लागल्या..."

"झेन्या, मला सांग, त्या कर्नलचं काय?" रीताने दबल्या आवाजात विचारले. "असं कसं करू शकलीस, झेन्या?"

"करू शकले!" झेन्याने केस मागे झटकत आव्हानपूर्व नजरेने म्हटले. "मला आताच सुधारण्याचा प्रयत्न करणार आहेस, अथवा लढाई संपल्यावर?"

झेन्याच्या अनुभवामुळे रीताची स्वत: अपवादात्मक असल्याची भावना नष्ट झाली होती आणि आश्चर्य म्हणजे रीता काहीशी विरघळू लागली होती, तिच्या अंतरंगात काहीतरी नरम बनले होते. काहीवेळा ती हसलीसुद्धा. मुलींबरोबर तिने गाणीही म्हटली. मात्र झेन्याबरोबर जेव्हा ती एकटी असे, तेव्हाच फक्त पूर्णतया स्वाभाविकपणे वागत असे.

पिंगट केसवाल्या झेन्याच्या वैयक्तिक जीवनात एवढी मोठी

शोकांतिका घडलेली होती तरीसुद्धा ती कमालीची मनमिळाऊ होती आणि अनेक खोडया करायची. कधी एखाद्या लेफ्टनंटला स्तंभित करून सगळ्या विभागाचे मनोरंजन करायची, तर कधी मुलींच्या ला-ला तालावर तरबेज जिप्सी नाच करायची, तर कधी अचानक एखाद्या कादंबरीचे कथानक सांगायला आरंभ करायची – आणि सगळयाजणी मंत्रमुग्ध होऊन ऐकत रहायच्या.

"झेन्या, तू रंगभूमीवर असायला हवं होतंस!" कीर्यानोवा उसासत उद्गारायची. "तुझे गुण तू वाया घालवते आहेस!"

अशा रीतीने रीताचा काळजीपूर्वक जतन केलेला एकलेपणा भंगला होता. झेन्याने सर्व गदगदा हलवून टाकले होते. त्यांच्या पथकात एक अगदी लहानखुरी, दुबळी, वाईट दिसणारी मुलगी होती. तिचे नांव गाल्या चेत्वेर्ताक. ती कमालीची हडकुळी होती, तिचे नाक लांब टोकदार होते, वेण्या तागाच्या बनवलेल्या भासायच्या आणि एखाद्या मुला-प्रमाणे तिची छाती सपाट होती. झेन्याने तिला बान्या*मध्ये खसाखसा चोळून काढले, तिची केशभूषा केली, तिच्या मापासरशी कुडता परत शिवला आणि गाल्या फुलली. अचानक तिच्या नजरेत चमक खेळू लागली, तिच्या ओठांवर स्मित उमटले आणि तिलासुद्धा वक्षस्थळे असल्याचे मुलींच्या एकदम ध्यानात आले. तेव्हापासून गाल्या झेन्याशिवाय एक पाऊलभर दूर जाईनाशी झाली. आता त्यांचे त्रिकूट जमले: रीता, झेन्या आणि गाल्या.

विमानविरोधी तोफांच्या गोलंदाजांना युद्धआघाडीवरून हलवून

---

* बान्या – रशियन पद्धतीचा हमामखाना – अनु.

कुठल्यातरी रेल्वे स्टेशनवर पाठवणार ह्या बातमीने त्यांच्यात जोरदार आक्षेप उमटले. फक्त रीता गप्प होती. ती मुख्य ठाण्यावर धावली, तिने नकाशावर नजर टाकली व ती म्हणाली: "माझ्या विभागाला पाठवा."

मुली चकित झाल्या. झेन्याने बंडाचे निशाण उभारले. पण दुसऱ्या दिवशी सकाळी अचानक ती शांत झाली. आता मुक्काम हलवण्याची तिची गडबड सुरू झाली. का आणि कुठे ह्याबद्दल कुणालाही काहीही समजले नव्हते, पण त्यांनी आक्षेप घेण्याचे थांबवले. त्याचा अर्थ त्यांनी जायला पाहिजे होते, कारण झेन्यावर त्यांची अटळ श्रद्धा होती. त्यांनी बडबड बंद केली व जाण्याची तयारी सुरू केली. नव्या मोर्चावर जेव्हा त्यांचे आगमन झाले तेव्हा रीता, झेन्या व गाल्याने एकदमच साखरेशिवाय चहा पिणे सुरू केले.

तीन रात्रींनंतर रीता छावणीमधून नाहीशी झाली. आगीच्या बंबाच्या शेडमधून ती सरपटत बाहेर आली, झोपलेल्या स्टेशनला एखाद्या सावलीप्रमाणे तिने ओलांडले आणि दंवाने चिप्प भिजलेल्या आल्डरच्या दाट झाडीत ती वितळून गेली. गवत माजलेल्या रानवाटेवरून चालत ती मुख्य रस्त्यापाशी आली व तेथे तिने पहिलीच लॉरी थांबवली.

"खूप लांब निघालीस काय, सुंदरी?" मिशीवाल्या सैनिकाने विचारले. रात्रीच्या वेळी दारूगोळ्यासाठी लॉरी पिछाडीवर जात आणि त्यांना चालवणारे कोणत्याही नियमांची पर्वा करत नसत.

"शहरापर्यंत घेऊन जाल?"

लॉरीच्या मागील भागातून मदतीचे हात बाहेर आले. परवानगीची वाट न पाहता रीता चाकावर चढली व क्षणात





ती वर चढली. त्यांनी तिला कुठल्यातरी किंतानावर बसवले आणि तिच्या खांद्यांवर दुलईदार जाकीट टाकले.

"एक तासभर डुलकी काढ..."

दुसऱ्या दिवशी सकाळी ती परत स्वतःच्या जागी आली.

"लीदा, राया – कामावर!"

कुणीही तिला पाहिले नव्हते, पण कीर्यानोवाला समजले. कुणीतरी तिला सांगितले. कीर्यानोवा काहीही बोलली नाही, पण स्वतःशीच हसली.

"म्हणजे ह्या गर्विष्ठेचा कुणीतरी तिथं आहे. ठीक आहे, त्यामुळं तरी विरघळेल..."

तिने वास्कोवपाशी ह्या गोष्टीचा उल्लेख केला नाही. जाता जाता सांगायचे म्हणजे एकही मुलगी वास्कोवला भीत नव्हती. रीता तर मुळीच भीत नव्हती. तो जणू स्टेशनभोवती वावरणारा एक म्हातारडा होता. त्याच्यापाशी वीस शब्दांचे भांडार होते आणि ते शब्द नियमावलीतले होते. त्याचे गंभीरपणे कोण ऐकणार?

पण शिस्त म्हणजे शिस्त आणि लष्करात तिला विशेष महत्त्व म्हणून निदान शिस्तीसाठी रीताच्या रात्रीच्या सहली झेन्या व गाल्या चेत्वेर्ताक यांच्याशिवाय इतर कुणाला न समजणे आवश्यक होते.

शहरात जाताना ती स्वतःबरोबर साखर, बिस्कीटे, खिरीची भुकटी व काहीवेळा शिजवलेल्या मांसाचे डबे घेऊन जायची. यशामुळे धुंद झालेली रीता एका आठवड्यात दोन-तीन वेळा जाऊ लागली. तिचा चेहरा ओढलेला व थकलेला दिसू लागला. झेन्या तिच्या कानात रागाने फुसफुसली: "ए बये, तू अतिरेक चालवला आहेस! पहाऱ्यावरचे तुला पकडतील, किंवा कुणी

अधिकारी नाक खुपसायला सुरुवात करील आणि मग तुझी कंबख्ती भरेल!"

"चूप झेन्या, माझ्या बाबतीत तसं घडणार नाही!"

तिचे डोळे आनंदाने चमकत होते. एखादी व्यक्ती अशा मन:स्थितीत असताना तिच्याशी गंभीरपणे कसे बोलायचे? झेन्या चिंतेत पडली.

"सांभाळ, रीता!"

कीर्यानोवाच्या कटाक्षांवरून आणि ओठातल्या ओठात हसण्यावरून रीताने लौकरच ताडले की, तिच्या सहली कीर्यानोवाला माहीत झाल्या होत्या. तिची खवचट स्मिते रीताच्या अंत:करणात धारदार सुरीप्रमाणे खुपत होती, जणू स्वत:च्या मृत नवऱ्याशी ती खरेच बेइमान झाली होती. ती संतापाने काळी निळी होत होती आणि कीर्यानोवाला धडा शिकवण्याचा तिचा इरादा होता, पण झेन्या तिला तसे करू देत नव्हती. तिने रीताचा हात पकडला व तिला दूर खेचून नेले.

"रीता, खुशाल तिला हवा तो समज करून घेऊं दे!"

रीताने स्वत:ला सावरले, कारण अर्थातच झेन्याचे सांगणे योग्य होते. कीर्यानोवा जोवर काही बोलत नव्हती, अडथळा आणत नव्हती आणि वास्कोवला सांगत नव्हती, तोपर्यंत काय वाट्टेल ते अमंगळ तर्क तिला करूं देत. वास्कोवची चर्पटपंजरी सुरू झाली असती—त्याच्या वटवटीला अंत नव्हता. एव्हाना एक प्रसंग घडला होता: पहिल्या विभागातील दोन मुलींना सार्जंट-मेजरने नदीच्या पैलतीरावर पकडले होते. त्याने त्यांना दुपारच्या जेवणापासून ते रात्रीच्या जेवणापर्यंत चार तास वर्तनावर व्याख्यान झोडले होते. स्वत:च्या आदेशांसह आणि

उपदेशांसह त्याने नियमांचे पुस्तक त्यांच्यासमोर फेकले होते. निदान तीनदा आसवांचे पूर वाहवून झाल्यानंतर मुलींनी वचन दिले होते की, इत:पर त्या नदी ओलांडून कधीही जाणार नव्हत्या, छावणीच्या बाहेरदेखील पाऊल टाकणार नव्हत्या.

कीर्यानोवाने आपले मौन चालू ठेवले.

वाराविहीन आणि स्तब्ध श्वेतरात्री सुरू झाल्या. सूर्यास्त व सूर्योदय यांच्या दरम्यानचा प्रदीर्घ संधिप्रकाश फुलणाऱ्या गवतांच्या मादक वासांनी भरून जात होता. आगीच्या बंबाच्या शेडबाहेर बसून पहाटेपर्यंत गोलंदाज मुली गाणी गायच्या. रीता आता फक्त वास्कोवपासून लपवून ठेवत होती. दर दोन दिवसांनंतर तिसऱ्या रात्री ती जेवणानंतर छावणीतून पसार व्हायची व सकाळी इषारतीच्या वेळेआधी परतायची.

सकाळचे परतणे रीताला सर्वांत अधिक आवडायचे. पहाऱ्यावरील सैनिकांच्या तावडीत सापडण्याचे भय आता खूप मागे पडले होते. दंवाने अत्यंत गार बनलेल्या गवतावरून ती अनवाणी चालत यायची. स्वत:चे बूट तिने खांद्यांवर टाकलेले असत. गवतामधून चालत असताना आदल्या रात्रीच्या भेटीबद्दलचे, तिच्या आईच्या तक्रारींबद्दलचे व पुढील वेळच्या चोरट्या भेटीबद्दलचे विचार तिच्या मनात घोळत असत. आणि पुढील भेट जवळ जवळ कुणाच्याही इच्छेची पर्वा न करता ती स्वत:च ठरवू शकत होती ही वस्तुस्थिती रीताला अत्यंत आनंदित करायची.

पण मानवी आयुष्यांची विल्हेवाट लावत युद्ध चालू राहिले होते. ही आयुष्ये विचित्रपणे आणि अनाकलनीयपणे एकमेकांशी गुंफलेली होती. निवांत छोट्या १७१ क्रमांकाच्या स्टेशनच्या कमांडंटला चकवण्यात जेव्हा ती गुंतली होती, तेव्हा कनिष्ठ

मार्जंट मार्गारीता ओस्यानीनाला माहीत नव्हते की, "फक्त कमांडसाठी" अशा नोंदीसह इंपिरीयल सर्व्हिस SD No. C 219/702 च्या आदेशावर एव्हाना सही झाली होती व अंमलबजावणीसाठी तो मंजूर झाला होता.

३

इथे पहाटवेळा फार शांत होत्या, अगदी नीरव होत्या.

रीता गवतामधून सपसप आवाज करत अनवाणी चालली होती. तिच्या पाठीवर तिचे बूट लोंबकळत होते. दलदलीमधून उमटणारे दाट धुके तिच्या पायांना गारठवून टाकत होते व तिच्या कपड्यांवर चिकटत होते. स्टेशननजीकच्या परिचित झाडाच्या खुंटावर बसायचे व तेथे कोरडे मोजे आणि बूट पायात चढवायचे असा रीताचा बेत होता. आता ती घाई-घाईने चालत होती, कारण परत येतेवेळी लॉरी मिळायला तिला विलंब झाला होता. वास्कोव खूप खूप लौकर उठायचा आणि नेहमी गुदामाची कुलूपे तपासायला जायचा. रीता आता नेमकी तेथे बाहेर यायची होती–तिच्या झाडाचा खुंट लाकडी ओंडक्यांच्या भिंतीपासून दोन पावलांवर, काही झुडूपां-च्या मागे होता.

पायवाटेची आणखी दोन वळणे, मग सरळ आल्डरच्या झाडीतून आणि ती खुंटापाशी पोहोचली असती. रीताने पहिले वळण घेतले–आणि ती जागच्या जागी थिजून उभी राहिली. कुणीतरी रस्त्यावर उभे होते.

तो तेथे मान मागे वळवून उभा होता. तो उंच होता, त्याच्या अंगात पाण्याने न भिजणारे जंगलात लपण्यास योग्य असे ठिपक्या-ठिपक्यांचे उपवस्त्र होते व त्या वस्त्राचा त्याच्या

पाठीवर फुगवटा आला होता. त्याच्या उजव्या हातात पट्ट्यांनी बांधलेले एक लांबट पुडके होते; त्याच्या छातीवर सबमशिनगन होती.

रीता झुडूपांमध्ये लपली. त्यांनी तिला दवाने चिप्प भिजवून काढले. पण त्याचे तिला भान नव्हते. जेमतेम श्वास घेत, किंचित विरळ पानांमधून ह्या अनोळखी, अचल माणसाकडे ती पहात होती. एखाद्या भयाण दु:स्वप्नामधील माणसाप्रमाणे तो तिची वाट अडवून उभा होता.

झाडीमधून दुसरा माणूस अवतरला. पहिल्यापेक्षा तो किंचित बुटका होता. त्याच्याही छातीवर सबमशिनगन लटकत होती आणि तशाच प्रकारचे पुडके त्याच्या हातात होते. ते मुकाटपणे थेट तिच्याच दिशेने चालू लागले. त्यांच्या उंच, लेसवाल्या बुटांचा दंवभिजल्या गवतात मुळीच आवाज होत नव्हता.

रीताने स्वत:ची मूठ स्वत:च्या तोंडात कोंबली व तिच्यावर दात एवढ्या जोराने दाबले, की तिला खूप दुखले. काहीही झाले तरी तिने अजिबात हालचाल करायची नव्हती, किंचाळी फोडायची नव्हती, झुडूपांमधून धावत सुटायचे नव्हते. ते दोघे अगदी तिच्या जवळून पुढे गेले आणि ती ज्या फांद्यांमागे उभी होती त्या फांद्यांना जवळच्याचा खांदा घासला गेला होता. सावल्यांप्रमाणे ते मुकाटपणे आवाज न करता निघून गेले व दृष्टीआड झाले.

रीता थोडा वेळ थांबली, पण आणखी कुणी आले नाही. सावधपणे ती बाहेर निसटली, जोरात धावत रस्ता ओलांडून झुडूपात तिने उडी मारली व कान देऊन ऐकू लागली.

सर्व शांत होते.

धापा टाकत बेभानपणे ती पुढे धावली. तिचे बूट तिच्या

पाठीवर आदळत होते. लपून राहण्याचा प्रयत्न न करता ती निद्रिस्त खेड्यातून थेट धावत सुटली आणि बंद दारावर तिने जोरजोराने ठोकले.

"कॉम्रेड कमांडंट! सार्जंट-मेजर!"

अखेरीस दार उघडले. वास्कोव दारात उभा होता – लष्करी तंग तुमानीत, सुती सदऱ्यात आणि उघडे पाय सपातांमध्ये खुपसून. त्याने झोपाळूपणे डोळ्यांची उघडझाप केली.

"काय झालं?"

"जंगलात जर्मन आलेत!"

"अस्सं..." वास्कोवने संशयाने डोळे किलकिले केले. ती त्याची फिरकी घेत असावी. "कसं समजलं?"

"मी स्वतः पाहिलं. दोघं. सब-मशिनगन आहेत त्यांच्या-पाशी आणि लपायचे अंगरखे..."

नाही, ती खोटे बोलत नव्हती. तिचे डोळे भेदरलेले होते...

"थांब इथं."

सार्जंट-मेजर वेगाने घरात गेला, त्याने पायात बूट चढवले, खांद्यांवरून कुडते ओढले. मारीया निकीफरोवना फक्त रात्री झोपण्याच्या वस्त्रांमध्ये घाबरून आ वासून बिछान्यावर बसली होती.

"काय झालं?"

"काही नाही. तुमच्याशी त्याचा काही संबंध नाही."

रिवॉल्वरचा पट्टा बांधतच तो रस्त्यावर धावत आला. रीता अजूनही त्याच जागी पूर्वीप्रमाणे उभी होती, अजून तिचे बूट तिच्या खांद्यावर होते. सार्जंट-मेजरने अभावितपणे तिच्या पावलांवर नजर टाकली. ते लाल आणि ओले होते व एका मोठ्या अंगठ्यावर एक पान चिकटलेले होते. म्हणजे बूट

खांद्यावर टाकून ती अनवाणी जंगलात भटकत होती. म्हणजे आजकाल अशा रीतीने ते लढत आहेत!

"सगळ्यांनी आपापल्या रायफली घ्या आणि ताबडतोब रांगेत उभं रहा! कीर्यानोवाला माझ्याकडं पाठवा! धावत!"

ती वेगवेगळ्या दिशांना धावली: मुलगी आगीच्या बंबाच्या शेडकडे आणि तो स्टेशनवरील टेलीफोनकडे! दळणवळण चालू असले म्हणजे मिळवली असे धावताना त्याच्या मनात येत होते...

"'सस्ना!'* 'सस्ना!' अरे देवा! एक तर झोपा काढताहेत किंवा दळणवळण तुटलंय... 'सस्ना...' 'सस्ना...'"

"'सस्ना' ऐकतोय!"

"सतरा बोलतोय. तीन दे. लौकर, आणीबाणी!.."

"देतो, बोंबलू नको... आणीबाणी म्हणे!"

टेलिफोनमध्ये खूप वेळपर्यंत विचित्र शीळ वाजत राहिली, खडखड होत राहिली आणि मग दूरवरून एक आवाज आला:

"वास्कोव, तू? काय झालं?"

"होय, मी, कॉम्रेड तीन. आमच्या जागेपासून जवळच्या जंगलात जर्मन आलेत. आज आम्हाला त्यांपैकी दोघे दिसले..."

"कुणी पाहिलं?"

"कनिष्ठ सार्जंट ओस्यानीना..."

कीर्यानोवा आत आली. जाता जाता सांगायचे म्हणजे तिच्या डोक्यावर टोपी नव्हती. जणू समारंभाला यावे अशा थाटात तिने मान हलवून त्याला अभिवादन केले.

---

*सस्ना – देवदार (प्रस्तुत ठिकाणी परवलीचा शब्द) – अनु.

"मी धोक्याचा इषारा दिलाय, कॉम्रेड तीन. जंगल विंचरून काढायचा इरादा आहे..."

"जरा थांब, वास्कोव. ह्यावर थोडा विचार करणं आवश्यक आहे. मोर्चा आपण जर संरक्षणाशिवाय सोडला, तर कुणीही आपल्या पाठीवर शाबासकीची थाप मारणार नाही. ते कसे दिसत होते, तुझे जर्मन?"

"ती म्हणते की त्यांनी लपण्याचे अंगरखे घातले होते आणि त्यांच्याजवळ सब-मशिनगन होत्या. टेहळणी करायला..."

"टेहळणी करायला? तिथं तुमच्यापाशी काय आहे टेहळणी करण्यासारखं? तू घरमालकिणीला मिठी मारून झोपतोस किंवा नाही?"

नेहमी हे असे घडायचे. नेहमी वास्कोवची चूक. प्रत्येक बाबतीत त्याचा बळी.

"गप्प का बसलास, वास्कोव? कसला विचार करतोस?"

"मला वाटतंय, आम्ही त्यांना पकडलं पाहिजे, कॉम्रेड तीन. अजून ते फार लांब गेले नाहीत तोवर."

"अगदी बरोबर. सोबतीला पाच मदतनीस घे आणि माग थंड पडला नाही तोवर पळ. कीर्यानोवा तिथं आहे?"

"होय, कॉम्रेड..."

"तिला फोन दे."

कीर्यानोवा थोडक्यात बोलली: दोनदा म्हणाली "समजलं" आणि सुमारे पाचदा तिने होकार व्यक्त केला. फोन ठेवून ती म्हणाली: "पाच सैनिकांना तुमच्या हवाली करण्याचा हुकूम आहे..."

"जिनं त्यांना पाहिलं तिला दे."

"ओस्यानीना त्यांची प्रमुख राहील."



"ठीक. तुमच्या लोकांना रांगेत उभं कर."

"त्या रांगेत उभ्या आहेत, कॉम्रेड सार्जंट-मेजर."

त्यांना सैनिक म्हणणे कठीण होते! एकीचे केस आयाळी-प्रमाणे मानेवरून कमरेपर्यंत मोकळे सुटलेले होते, दुसरीच्या केसात कागदाचे कपटे अडकलेले होते. लढवय्ये! ह्यांना घेऊन जंगल विंचरायचं आणि सबमशिनगनवाल्या जर्मनांना पकडायचं! त्यांच्यापाशी फक्त थोड्या जुन्या १८९१ च्या बनावटीच्या विश्वासू रशियन रायफली होत्या... १९३० नंतर थोडी सुधारणा केलेल्या...

"आराम!"

"झेन्या, गाल्या, लीझा..."

सार्जंट-मेजरच्या कपाळाला आठ्या पडल्या.

"थांब, ओस्यानीना! आपण जर्मनांना पकडायला चाललोय, मासे धरायला नाही. तेव्हा निदान बंदूक उडवता आली पाहिजे, निदान..."

"येते."

वास्कोव हात झटकणार होता, पण केवळ एवढेच म्हणाला:

"आणखी एक गोष्ट. जर्मन भाषा कुणाला येते?"

"मला येते."

एक अगदी बारीक आवाज आला. बोलणारी मुलगी एक पाऊल पुढेसुद्धा आली नाही. त्यामुळे सार्जंट-मेजर खरेच भडकला.

"मला? मला म्हणजे कुणाला? व्यवस्थित सांगता आलं पाहिजे!"

"प्रायव्हेट गूर्विच."

"ओ-हो-हो! त्यांच्या भाषेत 'हात वर?' कसं?"

«Hände hoch!»

"बरोबर!" ह्यावेळी सार्जंट-मेजरने हात झटकून घेतला.

"ठीक, चल, गूर्विच..."

त्या पाचजणींची रांग बनली. त्यांच्या मुद्रांवर बालिश गंभीरता होती, पण अद्याप भीती नव्हती.

"आपण दोन दिवसांसाठी जातोय, असं आपण गृहीत धरलं पाहिजे. बरोबर शिधा घ्यायचा, दारूगोळा घ्यायचा... प्रत्येकी पाच थाळ्या. आता तुमच्या पोटांमध्ये थोडं इंधन टाका... म्हणजे व्यवस्थित खाऊन घ्या, पाय नीट गुंडाळून घ्या आणि एकूण स्वतःला ठाकठीक बनवा. तुम्हाला चाळीस मिनिटं देतो. वि... राम!.. कीर्यानोवा आणि ओस्यानीना, माझ्याबरोबर थांबा."

मुली जोवर न्याहरी घेत होत्या आणि मोहीमेची पूर्वतयारी करत होत्या, तोवर सार्जंट-मेजरने त्या दोघी सार्जंटना आपल्या-बरोबर चर्चेसाठी स्वतःच्या घरी नेले. सुदैवाने घरमालकीण अदृश्य झाली होती, पण बिछाना आवरून न ठेवता. दोन उशा अगदी प्रेमाने एकमेकींशेजारी पडल्या होत्या. सार्जंट-मेजरने दोघींना कसलातरी पातळसा सार दिला व मग जुन्या, कोपरे दुमडलेल्या विस्तारीत नकाशावर नजर टाकली.

"ह्या रस्त्यावर तुला ते भेटले?"

"इथं," ओस्यानीनाने बोटाने हलकेच नकाशावर स्पर्श केला. "आणि इथं मला ओलांडून ते मुख्य रस्त्याच्या दिशेनं गेले."

"मुख्य रस्त्याकडं? आणि पहाटे चार वाजता तू जंगलात काय करत होतीस?"

ओस्यानीनाने उत्तर दिले नाही.

"तिला बाहेर जायचं होतं," न बघता कीर्यानोवा म्हणाली.

"तिला बाहेर जायचं होतं?" वास्कोव रागाने म्हणाला. त्या चक्क खोटे बोलत होत्या. "तुमच्यासाठी मी स्वत: संडास बांधून दिलाय. का त्यात बसायला जागा पुरत नाही?"

त्या दोघींनी रागाने डोळे वटारून त्याच्याकडे पाहिले.

"कॉम्रेड सार्जंट-मेजर, तुम्हाला ठाऊक आहे, काही प्रश्नांना उत्तर देण्यास स्त्री बांधलेली नाही." पुन्हा कीर्यानोवाच बोलली.

"इथं बायका नाहीत!" सार्जंट-मेजर गरजला व त्याने हाताची मूठ मेजावर आपटली. "मुळीच नाहीत! इथं आहेत सैनिक आणि अधिकारी, समजलं? युद्ध चाललंय आणि ते संपेपर्यंत आपणात स्त्री-पुरुष भेद असणार नाहीत."

"सार्जंट-मेजर, म्हणूनच तुमचा बिछाना अजून अशा अवस्थेत पडलाय का? लिंगभेदाशिवाय?"

काय विषारी होती ही कीर्यानोवा! साक्षात नागीण!

"हमरस्त्याकडं जात होते म्हणालीस?"

"त्या दिशेनं..."

"हमरस्त्यावर काय ढेकळं करणार ते! फिन्लंडच्या युद्धातच जंगलाच्या दोन्ही बाजू नष्ट झाल्या आहेत. लौकरच त्यांना मानगुटीला धरून खेचत आणू. नाही, कॉम्रेड सार्जंट, त्यांना हमरस्ता नको होता... बरं, तुम्ही पटकन खाऊन घ्या."

"तिथं झुडूपं आणि धुकं," ओस्यानीना म्हणाली. "मला भासलं..."

"तसं भासलं तर क्रूसाची खूण करायला पाहिजे होती," कमांडंट गुरगुरला. "त्यांच्या हातात पुडकी होती म्हणतेस?"

"होय. आणि ती खूप जड असावीत. उजव्या हातांमध्ये धरून नेत होते. व्यवस्थित बांधलेली होती."

सार्जंट-मेजरने स्वतःसाठी एक मोठी सिगारेट वळवली, ती पेटवली व थोड्या येरझाऱ्या घातल्या. एकदम त्याच्या डोक्यात एवढा लख्ख प्रकाश पडला, की त्याला काहीसे शरमल्यासारखे झाले.

"मला वाटतं, ते स्फोटक पदार्थ घेऊन जात होते. जर माझं बरोबर असेल, तर ते हमरस्त्याकडे जाणार नाहीत, रेल्वे लायनीकडं जातील. कीरोवच्या लायनीकडं!"

"कीरोव लाईन खूप लांब आहे," कीर्यानोवा शंकित स्वरात म्हणाली.

"पण सगळी वाट जंगलातून आहे. आणि केवढं जंगल! आख्खी सेना लपून राहू शकेल. मग दोन माणसांची काय कथा!"

"तसं असेल तर," ओस्यानीना चिंतातुर होत म्हणाली, "रेल्वे रक्षकांना सावध केलं पाहिजे."

"कीर्यानोवा हे काम करील," वास्कोव म्हणाला. "माझ्या रोजच्या संध्याकाळी साडेआठच्या अहवालात तिनं कळवायचं. १७ नंबरवर. ओस्यानीना, खा, खा. पुढं दिवसभर पायपीट करावी लागणार आहे..."

शोध-पथक चाळीस मिनिटात सज्ज होऊन उभे होते, पण दीड तासानंतर कामगिरीवर निघाले होते, कारण सार्जंट-मेजर फारच काटेकोर चिकीत्सा करत होता.

"सगळ्यांनी बूट काढा!"

त्याच्या अपेक्षेप्रमाणे त्यांच्यातील निम्म्याजणींनी पातळ मोजांवर बूट चढवलेले होते आणि उरलेल्या निम्म्याजणींनी मफलर गुंडाळावा त्याप्रमाणे पायांभोवती फडकी गुंडाळली होती. अशा पादत्राणांमध्ये त्यांच्याकडून फारसे लढणे होणार नव्हते. तीन किलोमीटर अंतरानंतर त्यांचे पाय फोडांनी रक्तबंबाळ झाले असते. निदान कनिष्ठ सार्जंट ओस्यानीनाने, जी त्यांची प्रमुख होती, व्यवस्थित पाय गुंडाळून घेतले होते. पण तिने इतरजणींना का शिकवले नव्हते?

चाळीस मिनिटेपर्यंत त्याने त्यांना पायांभोवती पट्ट्या गुंडाळायला शिकवले आणि आणखी चाळीस मिनिटे त्यांना रायफली साफ करायला लावल्या. जोवर रानउवा लागत नव्हत्या तोवर रायफलची त्यांना काय फिकीर! पण रायफल उडवायची त्यांच्यावर पाळी आली तर?..

उरलेल्या वेळात सार्जंट-मेजरने एक छोटे व्याख्यान दिले. मुलींना एकूण कामगिरीचा अंदाज यावा अशा हेतूने.

"शत्रूला घाबरू नका. ते आपल्या पिछाडीवर आहेत हे ध्यानात ठेवा, म्हणजे ते स्वतःच जास्त भ्यायलेले आहेत. पण त्यांना जवळ येऊ देऊ नका. ते फार दणकट असणार आणि हातघाईच्या लढाईत तरबेज असणार. एकदम तुमच्या पुढ्यातच उपटले तर गप्प रहा. कोणत्याही परिस्थितीत पळू नका. सब-मशिनगननं धावत्या माणसाला मारणं सगळ्यात सोपं. दोघी दोघींच्या रांगेनं रहा. मागं रेंगाळू नका आणि बोलू नका. आता सांगा, जर तुम्ही रस्त्यावर आलात, तर तुम्ही काय केलं पाहिजे?"

"आम्हाला माहीत आहे," पिंगट केसांची मुलगी म्हणाली, "एकीनं उजवीकडं, दुसरीनं डावीकडं."

"लपून," सार्जंट-मेजरने अधिक स्पष्ट केले. "आपली जाण्याची पद्धत अशी राहील: आघाडीची टेहळणी करायला कनिष्ठ सार्जंट आणि एक सैनिक जातील. त्यांच्या मागं शंभर मीटर अंतरावर मुख्य तुकडी: मी..." त्याने इतरांकडे नजर टाकली, "दुभाष्याबरोबर चालीन. आणखी शंभर मीटर अंतरामागून शेवटची जोडी येईल. अर्थात त्या एकमेकींबरोबर हलणार नाहीत, तर एकमेकींच्या नजरेच्या टप्प्यात राहतील. जर शत्रू आढळला अथवा काही संशयास्पद वाटलं, तर... एखाद्या प्राण्यासारखा अथवा पक्ष्यासारखा आवाज कोण काढू शकतं?"

त्या मूर्ख पोरी खिदळल्या.

"मी तुम्हाला गंभीरपणं विचारतोय! जंगलात तुमच्या स्वतःच्या आवाजात इशारे देत नाहीत. जर्मनांनासुद्धा कान आहेत."

मुली गप्प झाल्या.

"मला येतं," अखेरीस भीत भीत गुर्विच म्हणाली. "मला गाढवाच्या ओरडण्याची नक्कल करता येते–ही-हॉ, ही-हॉ!"

"या भागात गाढवं फिरत नाहीत," नाराजीच्या सुरात सार्जंट-मेजर म्हणाला. "ठीक आहे... बदकांसारखा आवाज काढायला शिका."

त्याने आवाज काढून दाखवला आणि त्या खो खो हसू लागल्या. त्यांना एवढी गंमत कशात वाटली हे त्याला समजेना, पण तो स्वतःही स्मित दाबू शकला नाही.

"नर बदक मादीला अशी साद घालतो," त्याने खुलासा केला. "चला, प्रयत्न करा एकदा!"

त्यांनी आनंदाने क्वाक्-क्वाक् केले. विशेषतः पिंगट केसवा-

लीने खास प्रयत्न केला, येवगेनियाने (ओह्, मस्त पोरगी आहे, देवा तिच्या प्रेमात पाडू नकोस बाबा, काय सुरेख आहे!). पण सर्वांत उत्तम ओरडणे जमले अर्थातच ओस्यानीनाला. ती खरेच समर्थ होती. दुसरीही वाईट नव्हती, लीझा ना ती? धिप्पाड, दणकट आणि ती कुठे रुंद होती ते सांगणे अवघड होते–खांद्यात अथवा नितंबात. नक्कल छान करत होती. तशी ती ठीकच होती–कुठेही चालण्यासारखी होती. निकोप आणि घोड्यासारखी तगडी. त्या दोन खुरट्या शहरवाल्यांसारखी नाही–गाल्या चेत्वेर्ताक आणि दुभाषी सोन्या गूर्विचप्रमाणे.

"आपण वोप सरोवरापाशी जाणार आहोत. इथं नजर टाका." नकाशाभोवती त्यांनी कोंडाळे केले. त्याच्या मानेला व कानांना त्यांच्या श्वासांचे स्पर्श जाणवू लागले. गंमतीदार पोरी होत्या. "जर जर्मन रेल्वेच्या दिशेनं जात असतील, तर त्यांना सरोवराला ओलांडूनच जावं लागेल. आणि त्यांना जवळची वाट माहीत नाही. म्हणजे आपण त्यांच्याआधी तिथं पोहोचू. इथून सुमारे वीस वेर्स्ता* अंतर आहे–दुपारच्या जेवणाच्या वेळेपर्यंत काटू. आणि त्यांच्यासाठी पूर्वतयारीला आपल्याला अवधी मिळेल, कारण जर्मनांना लपतछपत दूरचा वळसा घालून यायला सुमारे पन्नास वेर्स्ता अंतर चाललं पाहिजे. कॉम्रेड सैनिकहो, सगळं स्पष्ट समजलं?"

त्या गंभीरपणे उत्तरल्या: "समजलं..."

सूर्यस्नान करायचे आणि अधूनमधून विमानांवर गोळ्या झाडायच्या–युद्धाचा अर्थ त्यांच्या दृष्टीने असा होता...

---

*वेर्स्ता – १,०६६८ मी.

"कनिष्ठ सार्जंट ओस्यानीना, रसदेची आणि सज्जतेची तपासणी करा. पंधरा मिनटात आपण निघणार."

त्याने सैनिकांना थोडा वेळ तेथेच सोडले, कारण त्याला स्वत:च्या घरी पळणे भाग होते. मारीया निकीफरोवनाला पडशी भरायला त्याने आधीच सांगितले होते, पण आणखी काही गोष्टी त्याला सांगाती घ्यायच्या होत्या. जर्मन कडवे लढवय्ये होते. फक्त व्यंगचित्रात त्यांना ढिगांनी ठार मारलेले दाखवत. प्रत्यक्षात कसून पूर्वतयारीची आवश्यकता होती.

मारीया निकीफरोवनाने त्याला हव्या त्या सर्व गोष्टी गोळा केल्या होत्याच, शिवाय आणखीही काही वस्तू तिने दिल्या होत्या: बेकनच्या चरबीचा गोळा आणि सुके मासे. तिच्यावर खेकसायची त्याला इच्छा झाली होती, पण त्याने संयम धरला. जणू लग्नाच्या वऱ्हाडाएवढी गर्दी होती. रायफल आणि रिवॉल्वरसाठी त्याने भरपूर काडतूसे कोंबली. हातबाँबची जोडीही घेतली. काय घडेल कुणास माहीत...

घरमालकिणीने त्याच्याकडे भेदरलेली चोरटी नजर टाकली. तिचे डोळे पाणावले होते. त्याला स्पर्श करण्याची तिला अतीव इच्छा होत होती. पण ती जागची हलली नाही. वास्कोवला राहवले नाही. तिच्या मस्तकावर हात ठेवून तो म्हणाला: "परवा मी परत येईन. उशीरात उशीरा बुधवारी."

तिच्या आसवांचा बांध फुटला. अरे बायांनो, बायांनो, तुम्ही खरेच दुर्दैवी! सशाला जेवढी सिगारेट नको, तेवढेच पुरुषांना युद्ध नकोय आणि तुम्हाला तर...

तो बाहेर पडला आणि स्वत:च्या "रक्षकांची" त्याने पाहणी केली. त्यांच्या रायफली जमिनीवर टेकल्या होत्या.

वास्कोवने उसासा टाकला.



"तयार?"

"तयार," रीता उत्तरली.

"माझी साहाय्यक म्हणून कनिष्ठ सार्जंट ओस्यानीनाची ह्या सबंध मोहीमभर मी नेमणूक करत आहे. इषाऱ्यांची मी परत आठवण करून देतो: दोनदा क्वाक—सावधान, शत्रू दिसला. तीनदा क्वाक—सगळीजणं माझ्याकडं."

मुली हसू लागल्या. पण ह्यावेळी मुद्दामच तो तसे बोलला होता: दोनदा क्वाक, तीनदा क्वाक. त्यांना हसवण्यासाठी, उत्साहित करण्यासाठी तसे वागला होता.

"आघाडीचं पथक, कूच करा!"

ते निघाले.

आघाडीवर ओस्यानीना आणि लठ्ठ मुलगी होत्या. त्या झुडूपात नाहीशा होईपर्यंत वास्कोवने वाट पाहिली, मग पुटपुटत शंभर अंक मोजले आणि स्वतःच्या दुभाषीसह तो त्यांच्या पाठोपाठ निघाला. रायफल, काडतूसांची पिशवी, गुंडाळलेला ओव्हरकोट आणि पडशी यांच्या वजनाखाली ती एखाद्या लव्हाळ्याप्रमाणे वाकली होती... पिछाडीच्या पथकात झेन्या कोमेल्कोवा आणि गाल्या चेत्वेर्ताक होत्या.

## ४

वोप सरोवराकडे बळेच पायपीट करावी लागत असल्या-बद्दल वास्कोवला चिंता वाटत नव्हती. जर्मनांना तिकडे जाण्याचा थेट मार्ग कदाचित माहीत नसणे शक्य होते, कारण त्याला स्वतःलाच केवळ फिन्लंडच्या युद्धावेळी त्या रस्त्याचा शोध

लागला होता. तेथे धोकादायी दलदल असल्याचे सर्व नकाशां-मध्ये दाखवलेले होते आणि जर्मनांपाशी एकच संभाव्य मार्ग होता — जंगलामधून वळसा घालून सरोवरापर्यंत व पुढे सीन्यू-खिनां शिखरापर्यंत. दुसरा कोणताही रस्ता तेथे जात नव्हता. त्याचे सैनिक कसेही चालत असले, त्यांची चाल कशीही रडतखडत असली, तरी जर्मनांना खूप जास्त अंतर चालावे लागणार होते. संध्याकाळपूर्वी त्यांना तेथे पोहोचणे शक्य नव्हते आणि दरम्यान सर्व पळवाटा तो रोखू शकत होता. त्या मुलींना पाषाणांमागे उत्तमरीत्या लपवून उभे करणे त्याला जमले असते. जर्मन दृष्टीस पडताच एक-दोन बार हवेत काढले म्हणजे वाटाघाट करायला ते तयार झाले असते आणि तशीच वेळ आली असती तर एका जर्मनाला खलास केले असते व एकास-एक असा सामना करायला वास्कोव घाबरत नव्हता.

त्याचे सैनिक झपझप चालत होते आणि नीट वागत असल्याचे भासत होते. कुणी गप्पा मारत असल्याचे वा हसत असल्याचे त्याला आढळत नव्हते. त्यांची निरीक्षणशक्ती कितपत चांगली होती हे त्याला कळायला काही मार्ग नव्हता, पण तो स्वतः मात्र अस्वलाचा माग काढावा त्याप्रमाणे जमि-नीवर नजर लावून पुढे चालत होता. अपरिचित प्रकारच्या बुटांचे अंधुक ठसे त्याला आढळले होते. बुटांचा आकार ९ नंबरचा होता. त्यावरून सार्जंट-मेजरने निष्कर्ष काढला की, ते जर्मन सैनिक सुमारे दोन मीटर उंचीचे असावेत आणि त्यांचे वजन दोनशे पौंडांपेक्षा जास्त असले पाहिजे. त्याच्या मुली जरी शस्त्रसज्ज असल्या तरी समोरासमोर अशा गिऱ्हाईकाशी सामना देणे अर्थातच त्यांना जमले नसते. पण लौकरच त्याला आणखी बुटांचे ठसे आढळले आणि त्या दोन ठशांवरून त्याची

पक्की धारणा झाली की, जर्मनांनी दलदलीभोवतालून वाट काढली होती. त्याच्या अपेक्षेप्रमाणे सर्व घडून येत होते.

"जर्मनांना चांगलीच पायपीट करावी लागणार," तो आपल्या जोडीदारणीला म्हणाला. "चांगलीच पायपीट, सुमारे चाळीस वेर्स्ता."

दुभाषी मुलगी काही बोलली नाही. ती खूप दमली होती, जमिनीपासून रायफलचा दांडा वर राखणे तिला जेमतेम जमत होते. सार्जंट-मेजरने अनेकदा तिच्याकडे कटाक्ष टाकले. तिचा सामान्य रूपाचा टोकदार चेहरा व त्यावरील अतिगंभीर भाव पाहून त्याला तिची दया आली. पुरुषांचा एकूण तुटवडा लक्षात घेता, ह्या मुलीला कौटुंबिक जीवनाचे आनंद कधीच अनुभवायला मिळायचे नाहीत, अशा विचाराने त्याला वाईट वाटले. अचानक त्याने विचारले:

"तुझे आई-बाप जिवंत आहेत? का तू पोरकी आहेस?"

"पोरकी?" स्मित करत ती म्हणाली. "कदाचित पोरकी असेन."

"तुला स्वतःला नक्की माहीत नाही?"

"सध्या कुणाला याबाबत नक्की माहीत आहे, कॉम्रेड सार्जंट-मेजर?"

"तुझा मुद्दा खरा आहे..."

"माझे आई-बाप मिन्स्कमध्ये आहेत." रायफलचा पट्टा जागेवर राखण्यासाठी तिने खांद्याला झटका दिला. "मी मॉस्कोत परीक्षांची तयारी करत होते आणि..."

"काही बातमी?"

"कसं शक्य आहे..."

"खरंच..." फेदोत एवग्राफीचने तिच्याकडे आणखी एक

तिरपा कटाक्ष टाकला व आपला पुढील प्रश्न तिला अपमानास्पद वाटेल काय याबद्दल मनाशी जरा विचार केला. "तुझे आई-बाप ज्यू आहेत का?"

"स्पष्ट आहे."

वास्कोव रागाने फुरफुरला. "जर स्पष्ट असतं, तर मी विचारलं नसतं."

दुभाषी गप्प होती. गबाळ्या बुटांनी ओले गवत तुडवीत कपाळाला आठ्या घालून ती रखडत चालली होती. हळूच निःश्वास टाकत अचानक म्हणाली:

"कदाचित, निसटून जायला त्यांना जमलं..."

तिचा निःश्वास वास्कोवचे काळीज चरचर कापत गेला. अग गरीब बिचाऱ्या चिमण्या पोरी, हा सगळा बोजा सोसायला तू समर्थ आहेस? आत्ता जर शिवी हासडणे शक्य असते, तर आसमंत दणाणून जाईल अशा आवाजात त्याने ह्या युद्धाचा उद्धार केला असता. आणि त्याबरोबरच ह्या पोरींना पाठलागावर पाठवणाऱ्या त्या मेजरचा. त्यामुळे त्याच्या भावनांचा ताण हलका झाला असता. पण तसे वागण्याऐवजी त्याला बळेच स्मित करावे लागले.

"प्रायव्हेट गूर्विच, तीनदा क्वाक कर!"

"कशासाठी?"

"लढाईची सज्जता तपासून बघायला. काय? विसरलीस वाटतं मी शिकवलेलं?"

तात्काळ तिच्या मुद्रेवर स्मित झळकले आणि तिच्या डोळ्यांमध्ये नवी चमक आली.

"नाही, मी विसरले नाही."

अर्थात तिने काढलेले बदकाचे आवाज मुळीच नैसर्गिक

उमटले नव्हते. केवळ विदूषकी चाळा ठरला होता. नाटकात हे चालले असते. पण तरीही, पुढच्या आणि मागच्या पथका-पर्यंत संदेश पोहोचला. त्या ताबडतोब जवळ आल्या. रायफल सज्ज धरून कनिष्ठ सार्जंट ओस्यानीना धावतच तेथे आली:

"काय झालं?"

"जर काही झालं असतं, तर एव्हाना दुसऱ्या जगात तू देवदूतांच्या संगतीत पोहोचली असतीस," तिची खरडपट्टी काढत वास्कोव म्हणाला. "एखाद्या कालवडीसारखी हुंदाडत आलीस आणि पुन्हा शेपटी वर!"

त्याने तिचा अपमान केला होता. मे महिन्यातील पहाटेची लाली तिच्या चेहऱ्यावर पसरली. काय करणार? शिकणे आवश्यक होते.

"दमलात?"

"मुळीच नाही."

पिंगटकेशा ओस्यानीनाच्या मदतीला धावली होती. ओस्यानीनाचा घडलेला अपमान तिला झोंबल्याचे उघड जाणवत होते.

"ठीक," सामोपचाराच्या सुरात वास्कोव म्हणाला. "वाटेत तुमच्या काय ध्यानात आलं? एका वेळी एकीनं बोलायचं. कनिष्ठ सार्जंट ओस्यानीना."

"विशेष काही नाही..." चाचरत ती म्हणाली. "हो, पायवाटेच्या वळणावर एक फांदी मोडलीय."

"छान. बरोबर. आता पिछाडीचं पथक. प्रायव्हेट कोमेल्कोवा!"

"काहीही आढळलं नाही. सर्व काही सुरळीत."

"झुडूपांवरचं दंव सांडून पडलं होतं," लीझा ब्रीच्कीना मध्येच घाईघाईने म्हणाली. "रस्त्याच्या उजव्या बाजूच्या

झुडूपांवर अजून दंवाचे थेंब आहेत, पण डाव्या बाजूच्या झुडूपांवर दंव राहिलेलं नाही."

"ह्याला म्हणतात तीक्ष्ण डोळे!" खुषीत येऊन सार्जंट-मेजर उद्‌गारला. "शाब्बास, लाल सैनिक श्रीच्कीना! शिवाय वाटेवर पायांच्या ठशांच्या दोन जोडया होत्या. जर्मन बुटांच्या. त्यांचे छत्रीधारी सैनिक असले रबरी बूट वापरतात. ते खरंच दलदलीला वळसा घालून चाललेत असं दिसतंय. ते तसेच जात राहतील अशी आशा धरू या, कारण आपण थेट दलदलीकडे चाललोय. आता धूम्रपानासाठी आणि इतर गोष्टींसाठी पंधरा मिनिटं विश्रांती..."

जणू तो मूर्खपणाचे काही बोलला, अशा तऱ्हेने त्या खिदळल्या. पण नियमावलीत नमूद केल्यानुसार तो योग्यपणे बोलला होता. वास्कोवच्या कपाळाला आठ्या पडल्या.

"असला चावटपणा चालणार नाही! आणि एकत्र रहा! बस्स!"

पडशा आणि ओव्हरकोट कुठे ठेवायचे, रायफली कुठे ठेवायच्या हे त्याने त्यांना दाखवले व नंतर त्यांना रजा दिली. क्षणात उंदरांप्रमाणे त्या झुडूपांमध्ये नाहीशा झाल्या.

त्याने कुऱ्हाड बाहेर काढली आणि सुकलेल्या लाकडापासून सहा भक्कम लांब काठ्या बनवल्या. मगच तो सामानापाशी खाली बसला आणि त्याने सिगारेट पेटवली. लौकरच त्या सगळ्या एकत्र जमल्या, कुजबुजत गप्पा मारू लागल्या, नेत्रपल्लवी करू लागल्या.

"आता आपणा सर्वांना खूप सावधान राहिलं पाहिजे," वास्कोव म्हणाला. "प्रथम मी जाईन आणि तुम्ही माझ्या पाठीमागून एकेकाच्या रांगेनं यायचं, अगदी एकमेकींजवळून,

पण थेट माझ्या पावलांवर पाऊल ठेवून. तिथं उजवी-डावीकडं चिखलाचा गाळ आहे. तुमच्या आयांना मदतीला हाक मारायला सवड मिळायची नाही तुम्हाला. प्रत्येकीनं एकेक दांडकं घ्या आणि प्रत्येक पाऊल जमिनीवर टेकवण्यापूर्वी दांडीनं तिथं चाचपून पहा. काही प्रश्न आहेत?"

ह्यावेळी त्या सगळ्या गप्प राहिल्या. पिंगटकेशीने काहीतरी बोलण्यासाठी मानेला झटका दिला, पण स्वतःला आवरले. सार्जंट-मेजर उठला आणि सिगारेटचे थोटूक त्याने शेवाळात चिरडले.

"कुणापाशी भरपूर ताकद आहे?"

"कशासाठी?" लीझा ब्रीच्कीनाने नवलाने विचारले.

"प्रायव्हेट ब्रीच्कीनानं दुभाषीची पडशी वाहून न्यायची."

"का?" गूर्विचने किरट्या आवाजात विचारले.

"प्रश्न विचारू नकोस! कोमेल्कोवा!"

"इथं आहे."

"प्रायव्हेट चेत्वेर्ताकची पडशी घे!"

"दे बाई चेत्वेर्ताक आणि रायफलसुद्धा देतेस का?"

"वायफळ वटवट नको! सांगितलं तेवढं काम करा. प्रत्येकीनं स्वतःची रायफल स्वतःच घ्यायची..."

तो ओरडत होता, बेचैन बनत होता. तो योग्य मार्ग नव्हता. ओरडून त्यांना समजावणे शक्य होते का? कधीच नाही. अगदी बेंबीच्या देठापासून बोंबलला असता तरी उपयोग नव्हता. ह्या वाह्यात बडबडीला आणि सतत वटवटीला आळा घालण्यासाठी काहीतरी करणे आवश्यक होते. आणि सैनिकाने वटवट करणे म्हणजे संगीन पोटात खुपसून घेण्यासारखे आहे अगदी नक्की...

"परत एकदा पहिल्यापासून सांगतो, म्हणजे काही चूक घडणार नाही. तुम्ही अगदी माझ्या पावलांवर पाऊल ठेवून यायचं. तुमच्या दांड्यांनी दलदल चाचपून पहा..."

"मी एक प्रश्न विचारू?"

अरे देवा, काय ह्या पोरी! अगदी असह्य झाल्यात!

"काय पाहिजे, प्रायव्हेट कोमेल्कोवा?"

"दांडी म्हणजे काय? जिच्यावर बसायची ती?"

पिंगटकेशी वात्रटपणा करीत होती हे तिच्या डोळ्यांवरून स्पष्ट दिसत होते. धोकेबाज डोळे, अथांग डोहासारखे.

"तुमच्या हातात काय आहे?"

"कसलीतरी काठी..."

"तीच तुमची दांडी. समजण्यासारखं बोलतोय?"

"आत्ता स्पष्ट समजलं. दाल."

"हे काय आणखी दाल?"

"एक शब्दकोश आहे, कॉम्रेड सार्जंट-मेजर. भाषा सुधारण्यासाठी."

"येवगेनिया, पुरे कर!" ओस्यानीना ओरडली.

"तर मी सांगत होतो, हा फार धोक्याचा रस्ता आहे. ही विनोद करण्याची वेळ नाही. पुढं जाण्याचा क्रम असा राहील: मी सर्वांत पुढं, मग गूर्विच, ब्रीच्कीना, कोमेल्कोवा, चेत्वेर्ताक आणि शेवटी कनिष्ठ सार्जंट ओस्यानीना. प्रश्न आहेत?"

"तिथं खूप खोल आहे?"

चेत्वेर्ताकला ह्या मुद्द्याबाबत कुतूहल होते. तसे असणे स्वाभाविक होते. तिच्यासारख्या पिटुकलीला बादलीसुद्धा खोल भासली असती.

"काही ठिकाणी... इथपर्यंत, अं... म्हणजे तुमच्या कमरेपर्यंत. रायफली सांभाळा."

पहिल्याच पावलात त्याचा पाय गुडघ्यांपर्यंत दलदलीत रुतला – अगदी दाट चिखल होता. जणू काही स्प्रिंगच्या गादी-वरून चालावे तसे तो लटपटत जात होता. वळून न बघताही धापांवरून व घाबरट दबत्या चीत्कारांवरून त्याला स्वतःच्या पथकाच्या परिस्थितीची स्पष्ट कल्पना येत होती.

दलदलीवर दमट, स्थिर, कोंदट हवा ओठंगली होती. त्यांच्या घामट शरीरांभोवती चिवट वासंतिक डासांच्या झुंडी घोंघावत होत्या. बुरसटलेल्या गवताचा, कुजणाऱ्या पाण-वनस्पतींचा आणि दलदलीचा उग्र कडवट वास दरवळत होता.

थंडगार, चिकटणाऱ्या चिखलामधून पाय ओढत जाताना त्या मुलींना फार श्रम पडत होते. काठ्यांवर त्या आपल्या वजनांचा सगळा भार टाकत होत्या. त्यांचे ओले स्कर्ट त्यांच्या नितंबांना चिप्प चिकटले होते. त्यांच्या रायफलींचे दांडे चिखलात रेषा उमटवीत होते. प्रत्येक पाऊल म्हणजे महासा-यास होते. वास्कोव मंद गतीने पुढे जात होता, छोट्या गाल्या चेत्वेर्ताकच्या गतीशी जुळवून घेत होता.

एका छोट्या बेटाच्या दिशेने तो जात होता. बेटावर कमी उंचीची, दमट हवेने खुरटलेली, पाईनची दोन बेढब झाडे होती. क्षणभरही तो आपली नजर त्या झाडांवरून दुसरीकडे वळवत नव्हता. त्या झाडांच्या वाकड्या बुंध्यांदरम्यानच्या पोकळीतून कोरड्या जमिनीवरचा दूरचा भोजवृक्ष दिसत होता. उजवीकडे वा डांवीकडे आता एकही पायउतार नव्हता.

"कॉम्रेड सार्जंट-मेजर!"

"आता काय..." वास्कोवने आपली काठी अधिक ठामपणे

खोवली व कष्टाने मागे वळून पाहिले. त्या तेथे मुखस्तंभा-प्रमाणे उभ्या होत्या.

"एका जागी थांबून राहू नका! थांबून उभ्या राहू नका! तुम्ही खाली गाळात रुतत जाल!"

"कॉम्रेड सार्जंट-मेजर, माझे बूट निसटले!"

त्याच्या अगदी पाठीशीच असलेली चेत्वेर्ताक त्याला ओरडून सांगत होती. एखाद्या छोटया उंचवटयाप्रमाणे ती भासत होती. दाट रेंदाळात कमरेपर्यंत ती बुडाली होती. ओस्यानीना धडपडत तिच्यापाशी गेली आणि तिने तिला खेचले. आता त्या काठीने चिखल चाचपून पहात होत्या. बूट शोधत होत्या?

"सापडले?"

"नाही! .."

कोमेल्कोवाने आपली काठी वर केली आणि एका बाजूला पाय टाकण्याच्या ती बेतात होती, पण योग्य वेळी त्याचे तिकडे लक्ष गेले. तो एवढया मोठयांदा ओरडला की त्याच्या कपाळा-वरील शिरा तरारून फुगल्या. "कुठं निघालीस मसणात? थांब आहेस तिथं!"

"मी मदत करायला..."

"थांब! .. माघारीचा रस्ता नाही! .."

अरे देवा, त्यांच्याबरोबर तो भलत्याच लफडयात गुंतला होता. प्रथम त्याने त्यांना सतत पुढे जायला सांगितले होते, मग तो त्यांना जागच्या जागी थांबायला सांगत होता. समजा, जर त्यांच्यात घबराट माजली तर? दलदलीत घबराट म्हणजे मरणच.

"शांत व्हा, शांत रहा! बेटापर्यंत पोचायला अगदी थोडं अंतर उरलंय. तिथं दम खाऊ. बूट सापडले?"

"नाही! चिखल पाय खाली ओढतोय, कॉम्रेड सार्जंट-मेजर."

"तुम्हाला सतत पुढं जात राहिलं पाहिजे! इथं भक्कम जमीन नाही. फार वेळ स्तब्ध उभं राहणं शक्य नाही."

"बुटांचं काय करायचं?"

"आता सापडणं शक्य नाही! पुढं चला, पुढं! माझ्या पाठोपाठ या!"

त्याने मोहरा फिरवला व मागे न बघता तो चालत राहिला. "माझ्या पावलांवर पाऊल ठेवून या. मागं पडू नका."

त्यांना धीर यावा म्हणून तो मुद्दामच तसे ओरडला. हुकूमाचा शब्द कानी पडताच सैनिकांना नेहमी हुरूप चढतो हे त्याला माहीत होते. स्वतःचा त्याचा अनुभव होता.

शेवटी ते बेटावर पोहोचले. शेवटचे काही मीटर अंतर त्याला विशेष भीती वाटत होती, कारण तेथे जास्त खोल होते. तेथे त्यांना पाय वर ओढताच येईनात. निव्वळ पाय फरफटावे लागत होते आणि त्यातच सगळे सामर्थ्य व कसब खर्ची पडत होते. पण त्यातून त्या पार पडल्या.

छोट्या बेटासमोर भक्कम जमिनीवर वास्कोव थोडा वेळ थांबला. सबंध तुकडी त्याला ओलांडून जाईपर्यंत तो तेथे उभा राहिला. कोरड्या जमिनीवर पाऊल ठेवायला त्याने प्रत्येकीला मदतीचा हात दिला.

"घाई करू नका. सावकाशीनं घ्या. आपण इथं थोडी विश्रांती घेऊ."

मुली बेटावर आल्या आणि खरबरीत, सुकून गेलेल्या गवतावर त्या आडव्या पडल्या. त्यांची शरीरे ओलीचिप्प बनली होती, अंगभर चिखल माखलेला होता आणि त्या

धापा टाकत होत्या. चेत्वेर्ताकिने दलदलीला केवळ बूट अर्पण केले नव्हते, तर पावलांभोवतालचे कापडही अर्पण केले होते. आता तिची पावले फक्त मोजांमध्ये होती. मोजाला पडलेल्या भोकातून तिच्या पायाचा अंगठा बाहेर डोकावत होता. गारठ्याने अंगठा निळा पडला होता.

"तर कॉम्रेड सैनिकहो, दमलात?"

सैनिक गप्प होते. फक्त लीझाने कबूल केले: "होय, दमलो..."

"मग थोडी विश्रांती घ्या. पुढं सोपं जाईल. आपण त्या जमिनीवरच्या भोजाच्या झाडापर्यंत जायचं आणि मग बास्स!"

"आम्हाला हात-पाय धुवायला मिळाले तर बरं," रीता म्हणाली.

"त्या बाजूला एक लहान ओढा आहे आणि त्याला स्वच्छ वाळूचा किनाराही आहे. पोहायलासुद्धा हरकत नाही. पण अर्थात अंगावरचे कपडे चालता चालताच वाळवावे लागणार."

चेत्वेर्ताकिने उसासा टाकला व लाजत विचारले:

"आता मी बुटांशिवाय कसं करणार?"

"आपण तुझ्यासाठी जोडे विणू," स्मित करत वास्कोव म्हणाला. "पण दलदलीतून बाहेर पडेपर्यंत नाही, इथं नाही. तोपर्यंत चालवून घेशील?"

"हो."

"गाल्या, तू तरी वेडपटच आहेस," झेन्या कोमेल्कोवा चिडून उद्गारली. "तुझे पाय खाली ओढले जाताहेत असं जाणवल्यानंतर अंगठे वर वळवायला हवे होतेस."

"मी वळवले होते, तरी पण निसटले."

"दंडो वाजतेय, पोरींनो."

"मी अगदी पुरती पुरती भिजलेय..."

"आणि मी कोरडी राहिलेय असं वाटतंय? एकदा तर घसरले आणि बूडच खाली टेकलं!"

त्या सगळ्या हसल्या. म्हणजे त्या ठीक होत्या, त्यांनी दलदल पार केली असती. त्या बायका होत्या, पण तरुण होत्या आणि त्यांच्यात काही प्रमाणात बळ होते. बर्फाळ पाणी त्यांना बाधले नाही म्हणजे मिळवली...

वास्कोवने पुन्हा सिगारेटचे झुरके ओढले, थोटूक दलदलीत फेकून दिले व तो उठला. पटकन तो म्हणाला: "आता आपापल्या दांड्यांना उचला, कॉम्रेडहो. मग पूर्वीच्याच क्रमानं माझ्यामागून यायचं. किनाऱ्यावर आपण स्वच्छ होऊ आणि ऊब घेऊ."

तपकिरी चिखलात त्याने कशीबशी एकदम उडी मारली.

हा शेवटचा पट्टा फार भयानक मामला होता. खिरीसारखा दाट, पण पाय भक्कम रोवण्याइतका दाट नव्हे आणि पोहण्या-इतपत पातळ नव्हे. त्याला तुडवत जाताना शरीर घामाघूम होत होते.

"कसं काय कॉम्रेडहो?"

मागे वळून न पाहता केवळ त्यांना उल्हसित करण्यासाठी तो ओरडला.

"इथं जळवा आहेत?" गूर्विचने धापा टाकत विचारले.

ती त्याच्या पाठीशीच होती, त्याच्या सर्व प्रयत्नांचे फायदे तिला मिळत होते. तिला अधिक सोपे जात होते.

"इथं एकही जिवंत प्राणी नाही. ही मृत जागा आहे— थडग्यासारखी."

डावीकडे एक बुडबुडा फुगला. तो फुटला आणि तात्काळ दलदलीमधून एक मोठा सुस्कारा ऐकू आला. पाठीमागून कुणीतरी घाबरलेला चीत्कार काढला तेव्हा वास्कोवने खुलासा केला: "दलदलीमधला वायू बाहेर पडतोय, घाबरू नका. आपण त्याला चाळवलंय." थोडा विचार करून तो पुढे म्हणाला: "जुनी माणसं म्हणतात, इथं जंगलचा मालक राहतो—म्हणजे वेताळ. अर्थात त्या सगळ्या दंतकथा..."

त्याचे "रक्षक" गप्प होते. धपापत, फुस्कारत, चीत्कारत होते, पण पुढे सरत होते. निग्रहाने, संतापाने.

आता वाटचाल अधिक सोपी बनली. खीर विरळ होत गेली, तळपायाची जमीन अधिकाधिक भक्कम होत गेली. अधूनमधून छोटे उंचवटे जाणवू लागले. वास्कोवने मुद्दामच गती वाढवली नाही आणि आता त्याचे सैनिक एकमेकांजवळून एका रांगेत रुबाबदार पावले टाकत चालू लागले. भोजाच्या वृक्षापाशी सगळ्याजणी जवळजवळ एकाच वेळी पोहोचल्या. मग भेटली आणखी झाडे, उंचवटे आणि लवचीक हिरवळ. इथे तर फारच बरे वाटत होते, विशेषतः चढावर. शेवटी लक्षात यायच्या आतच ते सगळे सुक्या देवदारांच्या राईत घुसले. पायांशी शेवाळ होते. त्यासरशी त्यांची वटवट सुरू झाली, त्या आनंद प्रगट करू लागल्या व त्यांनी काठ्या फेकून दिल्या. पण वास्कोवने त्यांना त्या काठ्या परत गोळा करायला लावल्या आणि एका सहज ओळखू येणाऱ्या देवदाराच्या झाडालगत टेकवून ठेवल्या.

"कुणाच्यातरी उपयोगी पडतील."

त्याने त्यांना एकाही मिनिटाची उसंत दिली नाही. अनवाणी गाल्या चेत्वेर्ताकलासुद्धा.

"कॉम्रेडहो, आणखी अगदी थोडं अंतर राहिलंय. थोडी कळ काढा. आपण ओढ्याच्या काठी विश्रांती घेऊ."

एका उंचवट्याच्या ठिकाणी त्यांचे आगमन झाले. देवदारांमधून ओढा दिसू लागला. सोनेरी वाळूच्या किनाऱ्यांमधून अश्रूंसारखे त्याचे नितळ पाणी वाहात होते. "हुर्रा ऽऽ!" पिंगटकेशा झेन्या ओरडली. "पोरींनो, क़िनारा!"

आनंदाने आरोळ्या ठोकत मुली पाण्याकडे धावल्या. कोटांची गाठोडी व पडशा त्यांनी धावता धावता खाली टाकून दिल्या.

"थांबा!" सार्जंट-मेजर खेकसला. "हुश्शार!"

चकित होऊन आणि काहीशा अपमानीत मनाने त्या जागच्या जागी थबकल्या.

"वाळू!" वास्कोव रागाने उद्गारला. "आणि तुम्ही रायफली तिच्यात खोवून ठेवता आहात! एका झाडाला तुमच्या रायफली टेकवून ठेवा, समजलं? पडशा आणि कोट, सर्व एका जागी. तुम्हाला स्वच्छ व्हायला चाळीस मिनिटं देतो. हाकेच्या अंतरावर मी झुडूपात असेन. कनिष्ठ सार्जंट ओस्यानीना, शिस्त राखायची जबाबदारी तुमच्यावर!"

"होय, कॉम्रेड सार्जंट-मेजर!"

"ठीक आहे. चाळीस मिनिटात तयार व्हा. बूट-कपड्यांसह ससुज्ज – आणि संपूर्ण स्वच्छ!"

तो ओढ्याच्या खालच्या बाजूला गेला. जेथे वाळू आणि खोल पाणी होते व सभोवती झुडूपे होती, अशी जागा त्याने निवडली. त्याने सामग्री उतरवली, बूट आणि कपडे काढून ठेवले. थोड्या अंतरावरून मुलींच्या बोलण्याचे अंधुक आवाज येत होते. त्यांचे हसणे व काही शब्द फक्त त्याला समजत होते. म्हणूनच कदाचित तो सारा वेळ कान देऊन ऐकत होता.

सर्वांत प्रथम त्याने स्वत:ची तंग तुमान, पायांना गुंडाळलेला कपडा व अंतर्वस्त्रे धुतली. त्यांना चांगले पिळून झुडूपांवर वाळत टाकले. मग अंगाला साबण चोळला, किनाऱ्यालगत तो थोडासा धावला व खोल पाण्यात त्याने सूर मारला. पाण्यातून तो वर आला तेव्हा त्या बर्फासारख्या थंड पाण्यामुळे क्षणभर त्याचा श्वास घुसमटला. मग आनंदाने एक जोरदार आरोळी ठोकण्याची त्याला तीव्र इच्छा झाली, पण स्वत:चे "शिपाई" घाबरतील अशी त्याला भीती वाटली. त्याने शांतपणे घसा साफ केला. पण त्यात त्याला मजा वाटली नाही. अंगावरील उरलेला साबणाचा फेस धुवून टाकून तो परत किनाऱ्यावर आला. खरखरीत लष्करी टॉवेलने त्याने स्वत:चे शरीर चांगले लाल होईपर्यंत खसाखसा पुसून काढले. श्वास पूर्ववत होताच तो परत कान टवकारून ऐकू लागला.

खेड्यातील कुरणातल्याप्रमाणे त्या सगळ्याजणी एकाच वेळी बोलत होत्या, पण प्रत्येकजण आपापल्या विषयावर. त्यांचे हसणे मात्र एकत्र घडत होते. अचानक चेत्वेर्ताक आनंदाने ओरडली :

"ओय, झेनेच्का! आय्, झेनेच्का!"

"फक्त पुढेच!" झेन्या मोठ्यांदा ओरडली आणि झुडूपांपलिकडे पाण्यात सूर मारल्याचा आवाज झाल्याचे सार्जंट-मेजरने ऐकले.

"अरे वा, पोहतात!" कौतुकाने त्याच्या मनात विचार आला.

एका आनंदी किंचाळीने सर्व आवाज अचानक बुडवून टाकले. जर्मन खूप दूर होते म्हणून बरे. त्या किंचाळीने प्रथम तो गोंधळला आणि मग ओस्यानीना रागाने ओरडली :

"झेन्या, ताबडतोब बाहेर ये!"

स्मित करत वास्कोवने एक जाडजूड सिगारेट वळली, गारगोटी घासून पेटवली आणि प्रसन्नपणे तो सावकाश झुरके मारू लागला. मे महिन्यातील उबदार उन्हात स्वतःची उघडी पाठ शेकू लागला.

अर्थात चाळीस मिनिटांच्या अवधीत त्याचा एकही कपडा वाळला नव्हता, पण थांबून रहायला सवड नव्हती. वास्कोवने तशीच ओली वस्त्रे अंगावर चढवली. सुदैवाने त्याच्यापाशी आणखी एक पायाभोवतालचा कपडा होता, त्यामुळे कोरडी पावले बुटांमध्ये कोंबणे त्याला शक्य झाले. कुडत्यावर त्याने करकचून पट्टा आवळला, बाकीच्या गोष्टी उचलल्या व मोठ्यांदा आरोळी मारली: "तयार झालात कॉम्रेड सैनिकहो?"

"जरा थांबा..."

हे असे होणार, त्याला माहीतच होते. ह्यावेळी फेदोत एवग्राफीचने हास्य केले, मान हलवली आणि त्यांना घाई करा असे सांगायला त्याने तोंड उघडले, तोच ओस्यानीनाचा परत आवाज आला: "आता तुम्ही यायला हरकत नाही!"

सार्जंट-मेजरला असे म्हणतात सैनिक! "यायला हरकत नाही!" नियमांची ही धडधडीत चेष्टा होती. संपूर्ण बेशिस्त.

पण हा विचार क्षणभरच त्याच्या मनात टिकला. आंघोळी-नंतर आणि विश्रांतीनंतर त्याची मनःस्थिती मे-दिनाच्या सणासारखी आनंदी बनली होती. शिवाय त्याचे "रक्षक" नीटनेटके, स्वच्छ आणि हसरे दिसत होते.

"कसं काय कॉम्रेड लालसेनावाले, सर्व ठीक?"

"सगळं ठीक, कॉम्रेड सार्जंट-मेजर. झेन्या तर पोहलीसुद्धा."

"शाबास. कोमेल्कोवा! गारठली नाहीस?"

"गारठले तरी ऊब द्यायला कुणीच नाही ..."

"चतुर आहेस! चला, कॉम्रेड सैनिकहो, थोडं खाऊन घेऊ आणि मग पुढं जाऊ. फार वेळ बसून चालणार नाही."

पाव आणि सुकवलेल्या माशांचा त्यांनी समाचार घेतला. अधिक पोषक खाद्यपदार्थ सध्या राखून ठेवण्याचे त्याने ठरवले. मग हतभागी चेत्वेर्ताकिच्या पादत्राणाची त्याने सोय केली. जादा कपडयात त्याने तिची पावले गुंडाळली व एकावर एक दोन लोकरी पायमोजे त्यावर चढवले (एक जोडी त्याच्या घरमालकिणीने त्याच्यासाठी विणून दिली होती) आणि भोजाच्या ताज्या सालीपासून सपाता बनवून त्याने त्या तिच्या पावलांना गच्च बांधल्या.

"ठीक?"

"खूपच छान. धन्यवाद, कॉम्रेड सार्जंट-मेजर."

"आता चला. आणखी दीड तास पायपीट करावी लागणार. मग आपल्या पाहुण्यांच्या स्वागतासाठी आपल्याला योग्य जागा शोधली पाहिजे..."

स्वतःच्या चालीच्या वेगाने तो मुलींना पळवत होता. तसे करणे भागच होते, कारण त्यामुळे त्या पोरींची अंगावरची ओली वस्त्रे सुकत जाणार होती. पण मुली ठीक होत्या. त्या दम टिकवून होत्या. फक्त त्यांचे गाल लाल लाल झाले होते.

"चला, कॉम्रेड सैनिकहो, घाई करा! माझ्यामागून धावत!"

दम टिकेपर्यंत तो धावत राहिला. मग काही अंतर त्याने त्यांना चालू दिले; त्यांची धाप नाहीशी होताच परत आज्ञा केली: "माझ्यामागून—धावत!"

वोप सरोवरापाशी ते आले तेव्हा सूर्यास्त घडत होता. खडकांना पाण्याच्या लाटांचा हळुवार स्पर्श होत होता. देवदारांची सायंकालीन कुजबूज त्यांना ऐकू येत होती. सार्जंट-मेजरने बारीक नजरेने क्षितिज धुंडाळले, पण पाण्यात कुठेही होडीचा पत्ता नव्हता. अस्पष्ट बोलणाऱ्या वाऱ्याची झुळूक त्याने खूप हुंगून पाहिली, पण कुठूनही धुराचा वास येत नव्हता. युद्धापूर्वीही ह्या प्रदेशात फारशी लोकवस्ती नव्हती आणि आता तर तो निर्जन बनला होता. जणू प्रत्येकजण–लाकूडतोडे, शिकारी, मच्छीमार आणि डांबर बनवणारे–युद्धआघाडीवर गेला होता.

"किती शांत आहे नाही?" एरवी खणखणणारा झेन्याचा आवाज आता दबता बनला होता. "स्वप्नात असल्यासारखं वाटतं."

"तिथं डावीकडच्या भूशिरापासून सीन्यूखिना शिखर सुरू होतं," वास्कोव सांगू लागला. "शिखराच्या दुसऱ्या टोकाला दुसरं सरोवर आहे. त्याचं नांव लेगोन्तोवो. एकेकाळी तिथं एक संन्यासी रहात होता–त्याचं नांव लेगोन्त. शांतीच्या शोधात होता."

"त्याला ती इथं नक्की सापडली," सुस्कारत गूर्विच म्हणाली.

"जर्मन फक्त एकाच वाटेनं जाऊ शकतात: दोन सरोवरां-मधून, डोंगरामधून. आणि तिथं काय आहे ते तुम्हाला ठाऊक आहे–घराच्या आकाराएवढे मोठमोठे पाषाण. तिथंच आपण दबा धरायचा. नियमावलीत म्हटल्याप्रमाणं मुख्य आणि राखीव. आपण जागा निवडू, थोडं खाऊ आणि विश्रांती घेऊ, मग वाट पहात बसू, असंच की नाही, कॉम्रेड लालसेनावाले?"

कॉम्रेड लालसेनावाले गप्प होते. त्यांच्यापाशी विचार करायला खूप होते...

५

वास्कोवला नेहमीच स्वतःच्या वयापेक्षा अधिक वडील असल्याचे जाणवायचे. वयाच्या चौदाव्या वर्षी तो एखाद्या कुटुंबवत्सल गृहस्थाप्रमाणे खूप राबत होता–अन्यथा त्याच्या घरची माणसे भिकेला लागली असती. त्या काळी खायला पुरेसे मिळत नव्हते आणि प्रत्येक गोष्ट अस्थिर होती. कुटुंबात तो एकटाच पुरुष होता–खाणे, पिणे व इतर प्रत्येक बाबतीत घरची माणसे त्याच्यावरच अवलंबून होती. उन्हाळ्यात तो शेतावर काम करायचा आणि हिवाळ्यात शिकार करायचा. विशीनंतर प्रथमच त्याच्या ध्यानात आले की, माणसांनी सुटी घ्यायची असते. मग सैन्यभरती आली. सैन्य म्हणजे काही बालवाडी नव्हते... सैन्यात स्थिर, खात्रीशीर माणसांचा आदर होतो आणि त्याने सैन्याचा आदर राखला. म्हणून ह्या टप्प्यात सुद्धा तो आपल्या प्रत्यक्ष वयापेक्षा वडील राहिला होता व सार्जंट-मेजरच्या वरिष्ठपदाला चढला होता. सार्जंट-मेजर त्याच्या शिपायांना नेहमीच म्हातारा भासतो. परिस्थितीच तशी असते.

फेदोत एवग्राफीच स्वतःच्या वयाबद्दल विसरून गेला होता. त्याला एकच गोष्ट माहीत होती: सर्व सैनिकांपेक्षा आणि लेफ्टनंटांपेक्षा तो वडील होता, सर्व मेजरांच्या वयाचा होता व कोणत्याही कर्नलपेक्षा नेहमीच तरुण होता. वरिष्ठपणाचा मगर शिष्टाचाराचा प्रश्न नव्हता–जगाकडे पाहण्याचा त्याचा दृष्टिकोन तसा होता.

म्हणून आता ज्यांचे नेतृत्व तो करत होता त्या मुलींकडे तो दुसऱ्या पिढीच्या पातळीवरून पहात होता. जणू तो यादवी युद्धातील लढवय्या होता आणि वासिली इवानोविच चापायेव यांच्याबरोबर ल्बीश्चेन्स्क गावात त्याने चहा घेतला होता. त्यात कोणतेही तर्कशास्त्र नव्हते वा कोणताही हेतू नव्हता, फक्त त्याचा तसा स्वभाव होता.

स्वतःच्या वयापेक्षा आपण अधिक वयस्करीतीने वागतो हा विचार वास्कोवच्या मनात कधीही शिरला नव्हता. फक्त ह्या शांत, संधिप्रकाशित रात्री त्याच्या मनात काहीशी शंका उमटून गेली.

पण कदाचित रात्र पडण्यापूर्वीच, जेव्हा स्वतःच्या जागा त्यांना अद्याप निश्चित करायच्या होत्या, तेव्हाच त्याच्या मनात ही भावना चुळबुळायला आरंभ झाला होता. त्याचे सैनिक बोकडांप्रमाणे दगडांवरून उड्या मारत होते व अचानक तोसुद्धा त्यांच्या जोडीने उड्या मारू लागला होता. स्वतःच्या चपळ-पणाचे त्याचे त्यालाच आश्चर्य वाटले होते. ज्या क्षणी त्याच्या हे ध्यानात आले तेव्हा त्याने कपाळाला आठ्या घातल्या व अधिक धीमेपणाने तो जाऊ लागला होता. त्यामुळे पाषाणा-च्या वरती पोहोचायला त्याला तीन यत्न करावे लागत.

तरीही, ही गोष्ट मुख्य नव्हती. त्याला सुरेख जागा सापडली होती ही मुख्य गोष्ट होती. उत्तम आडोसे असलेली, दगडांच्या मधोमध अशी ती जागा होती व जंगलापासून ते सरोवरापर्यंतचे दृश्य तेथून नजरेच्या टप्प्यात येत होते. मोठमोठ्या पाषाणांची सरोवराच्या काठापर्यंत जी साखळी होती, त्या साखळीत ती जागा होती. त्या पाषाणांनी सरोवरा-काठाला फक्त एक अरुंद पट्टी रिकामी सोडली होती. जर्मन

जर ह्या रस्त्याने आले असते, तर डोंगराला वळसा घालायला त्यांना सुमारे तीन तास लागले असते आणि जर काही घोटाळा झालाच तर त्याला व त्याच्या सैनिकांना डोंगरात माघार घेता आली असती आणि शत्रू पोहोचायच्या आत राखीव जागेपर्यंत जाता आले असते. पण तो केवळ सावधगिरीचा भाग होता. ह्या मुख्य जागेवरच दोन छत्रीधारी जर्मनांशी सामना देण्याची त्याची तयारी होती.

जागा निवडल्यानंतर, फेदोत एवग्राफीचने आगमनाच्या वेळेचे अंदाज बांधले. जर्मनांची आणखी किमान चार तास-पर्यंत तरी त्यांना वाट पहावी लागणार होती. म्हणून त्याने आपल्या सैनिकांना गरम जेवण बनवण्याची परवानगी दिली— दोन माणसांसाठी एक डबा ह्या हिशोबाने. लीझा ब्रीच्कीनाने स्वयंपाकाची जबाबदारी स्वतःवर घेतली. तेव्हा त्याने शहरच्या दोन पिटुकल्यांना लीझाच्या मदतीला दिले. मात्र अजिबात धूर करायचा नाही अशी त्याने सक्त ताकीद दिली.

"जर मला धूर दिसला, तर भांड्यातलं अन्न मी सरळ आगीत ओतून टाकीन. समजलं?"

"समजलं," पडल्या सुरात लीझा उत्तरली.

"नाही, कॉम्रेड सैनिक, अजून स्पष्ट समजलेलं नाही. जेव्हा माझ्यापाशी कुऱ्हाड मागशील आणि तुझ्या मदतनीसांना वाळकी लाकडं तोडून आणायला सांगशील, तेव्हा स्पष्ट होईल. आणि ज्या फांद्यांवर शेवाळ नाही अशाच फांद्या त्या तोडतील अशी खबरदारी घे, कारण तसलं लाकूड पटकन तुटतं, धूर अजिबात होणार नाही आणि आग छान पेटेल.

हुकूम म्हणजे हुकूम, पण नमून्यादाखल त्याने काही सुकी लाकडे स्वतः गोळा करून आणली आणि आगोटी पेटवली.

ओस्यानीनाबरोबर आसपासची टेहळणी करीत असताना तो अधूनमधून आगोटीकडे नजर टाकत होता, पण धूर येत नव्हता. खडकांवर हवा थरथरत होती, पण ती ध्यानात यायला तरबेज शिकाऱ्याची नजर असणे आवश्यक होते आणि जर्मनांपाशी तशी नजर असण्याची शक्यता नव्हती.

तिघी जोवर स्वयंपाकात गुंतल्या होत्या, तोवर वास्कोव, कनिष्ठ सार्जंट ओस्यानीना व सैनिक कोमेल्कोवा यांनी डोंगरात फिरून दबा धरण्याच्या जागा, निशाणबाजीची क्षेत्रे, संदर्भ स्थळे यांच्या नोंदी केल्या. वास्कोवने खुद्द लांब ढांगा टाकून संदर्भ स्थळे तपासली आणि नियमावलीत नमूद केल्याप्रमाणे गोळीबाराच्या नकाशावर नोंदली.

जेवायला येण्याचा इषारा झाला. दोघा-दोघांच्या जोडीने ते जेवायला बसले. कमांडंटने प्रायव्हेट गूर्विचबरोबर एका डब्यातून खाल्ले. अर्थात ती लाजत होती आणि त्याच्यासाठी अन्न राखून स्वत: रिकामा चमचाच तोंडी लावत होती. सार्जंट-मेजर नाराजीने म्हणाला: "कॉम्रेड दुभाषी, असं वागायची गरज नाही. मी काही तुझा प्रियकर नाही, तेव्हा माझ्यासाठी घास राखून ठेवायची आवश्यकता नाही. सैनिकाला शोभेसं खा!"

"मी खात्येय ना..." स्मित करत ती म्हणाली.

"पाहतोय ना! वसंतामधल्या हडकलेल्या डोंबकावळ्या-सारखी लुकडी!"

"माझा बांधाच तसा आहे."

"बांधा? ब्रीच्कीनाचाही बांधा तुझ्यासारखा अथवा इतर कुणाहीसारखा आहे, पण... बघण्यासारखं त्याच्यावर काही आहे..."

जेवणानंतर ते बिलबेरीचा चहा प्यायले. वाटचालीत वास्कोवने पाने खुडली होती. मग त्यांनी अर्धा तास विश्रांती घेतली व सार्जंट-मेजरने त्यांना रांगेत उभे केले.

"लढाईचा हुकूम ऐका," गंभीरपणे त्याने बोलायला आरंभ केला, पण अंत:करणाच्या खोल कप्प्यात मात्र त्याला स्वत:च्या कृतीच्या योग्यपणाविषयी शंका वाटत होती. "कीरोव रेल्वेकडे आणि कॉम्रेड स्तालीन यांचं नांव दिलेल्या श्वेतसागर-बाल्तिक कालव्याकडं गुपचूप घुसायच्या उद्देशानं शत्रू, भरपूर शस्त्रसज्ज असलेले दोन फ्रीत्स, वोप सरोवराच्या दिशेनं सरकत आहे. सीन्युखीना शिखर लढवणं आणि शत्रूला कैद करणं, हे आपल्या सहाजणांच्या तुकडीचं काम आहे. आपला डावा शेजारी वोप सरोवर आणि उजवा लेगोन्तोवो सरोवर." सार्जंट-मेजर थांबला आणि खोकला. कागदाच्या कपट्यावर हुकूम आधी लिहून न काढल्याचा त्याला खेद वाटला. मग तो पुढे बोलू लागला: "माझी योजना अशी: मुख्य जागेवर शत्रूला गाठायचं आणि गोळीबार न करता, त्यांनी शरण यावं असा प्रस्ताव मांडायचा. जर प्रतिकार झाला, तर एकाला ठार मारायचं आणि दुसऱ्याला कोणत्याही परिस्थितीत जिवंत पकडून न्यायचं. आपली सर्व मालमत्ता राखीव जागी ठेवायची आणि तिथं प्रायव्हेट चेत्वेर्ताकिनं पहारा करायचा. मी हुकूमाचा शब्द उच्चारल्यानंतरच केवळ कामगिरी सुरू करायची. कनिष्ठ सार्जंट ओस्यानीनाला मी माझी उप-प्रमुख नेमतो आणि जर ती कामगिरीतून बाद झाली, तर प्रायव्हेट गूर्विच. प्रश्न आहेत?"

"मी राखीव जागी का थांबायचं?" चेत्वेर्ताकिने अपमानीत स्वरात विचारले.

"ह्या प्रश्नात काही मुद्दा नाही, कॉम्रेड प्रायव्हेट, तुम्हाला हुकूम मिळालाय, तुम्ही तो पाळलाच पाहिजे."

"गाल्या, तू आमची राखीव आहेस," ओस्यानीना म्हणाली.

"काहीही प्रश्न नाहीत. सर्व काही सुरेख आणि स्पष्ट आहे," कोमेल्कोवा उल्हासितपणे उत्तरली.

"स्पष्ट आहे ना, तर घ्या आपापल्या जागा."

ओस्यानीनाबरोबर आधी ठरवून ठेवलेल्या जागांवर त्याने सैनिकांची मांडणी केली. प्रत्येकीला त्याने खुणा ठळकपणे दाखवून दिल्या आणि उंदरांप्रमाणे गुपचूप पडून राहिले पाहिजे असे परत एकदा वैयक्तिकरीत्या बजावून सांगितले.

"कुणी बोटसुद्धा उचलायचं नाही. सगळ्यात पहिल्यांदा मी त्यांच्याशी बोलेन."

"जर्मनमध्ये?" गूर्विचने खवटपणे विचारले.

"रशियनमध्ये!" सार्जंट-मेजर ताडकन उत्तरला. "आणि जर त्यांना समजलं नाही, तर दुभाषी, तू बोलशील. स्पष्ट बोलतोय ना?"

सगळ्याजणी गप्प बसल्या.

"लढाई चालू असताना जर तुमची डोकी तुम्ही वर काढत राहिलात, तर प्रथमोपचाराचं पथक इथं नसल्याचं तुमच्या लक्षात येईल. तसंच तुमच्या आयासुद्धा."

त्यांच्या मातांचा उल्लेख करण्यात त्याने चूक केली होती, त्याचे पूर्णपणे चुकले होते आणि त्यामुळे तो कमालीचा संतापला. सरतेशेवटी प्रत्यक्ष शत्रूशी सामना होता, निशाणबाजीचा सराव नव्हता.

"जर्मनांविरुद्ध दूर अंतरावरून लढणं ठीक. पण ते जवळ

असताना जर तुम्ही रायफलीच्या खटक्याची खडखड करू लागलात, तर ते तुमची चाळण उडवतील. म्हणून गप्प पडून राहण्याचा मी तुम्हाला कडक हुकूम देतोय. खुद्द मी गोळीबार करण्याचा हुकूम देईपर्यंत गप्प पडून रहायचं. तुम्ही बायका म्हणून गय करणार नाही..." इथे फेदोत एवग्राफीच एकदम थबकला आणि त्याने हात झटकला. "बस्स. आदेश संपले."

त्याने मुलींच्या प्रत्येक जोडीला निरीक्षणक्षेत्र नेमून दिले. म्हणजे प्रत्येक स्थळावरून चार डोळे टेहळणी करणार होते. तो स्वतः अधिक उंच ठिकाणी गेला आणि डोळ्यांमधून पाणी वाहीपर्यंत त्याने दुर्बीणीमधून जंगल धुंडाळले.

सूर्य आता बरोब्बर झाडांच्या माथ्यांना टेकला होता, पण ज्या दगडावर तो आडवा पसरला होता, त्या दगडात अजून दिवसाची ऊब शिल्लक होती. त्याने दुर्बीण खाली ठेवली व डोळ्यांना आराम मिळावा म्हणून डोळे मिटून घेतले. काही समजायच्या आत त्याला डुलकी लागली. त्या उबदार पाषाणाने हलकेच उड्डाण केले व कुठल्यातरी निवांत, शांत जागी तो तरंगत गेला. वास्कोवला वाऱ्याची झुळूक जाणवत होती आणि सगळे आवाज ऐकू येत होते, पण तरीही त्याला वाटत होते की, चुलाण्यावर तो झोपला होता, त्यावर फडके टाकायला तो विसरला होता आणि त्याबद्दल आईला त्याने सांगायला हवे होते. त्याला त्याची आईसुद्धा दिसली: झटपट हालचाली करणारी, छोट्या चणीची, जणू शेतकरी-जीवनातून सवड काढून वर्षानुवर्षे फक्त फेफऱ्यांमध्ये आणि दचकण्यांमध्ये झोपणारी. तिचे कमालीचे कृश हात त्याला दिसले, खडतर कष्टांमुळे आणि संधिवातामुळे ताठरलेली तिची बोटे त्याने पाहिली. भाजलेल्या सफरचंदाप्रमाणे दिसणारा तिचा सुरकुत-

लेला चेहरा त्याला दिसला, तिच्या फिकट गालांवरचे अश्रू त्याने पाहिले आणि मेलेल्या इगोरच्या मृत्यूचे ती अजूनही दु:ख करीत होती, स्वत:ला दूषणे देत होती, त्याच्या मृत्यूचे दु:ख तिच्या काळजाला अद्याप कुरतडत होते, हे त्याला समजले. तिच्याशी ममताळूपणे बोलण्याची त्याची इच्छा होती, पण अचानक एका हाताचा त्याच्या पायाला स्पर्श झाला. का कुणास ठाऊक, पण तो स्पर्श त्याच्या वडलांचा होता असे त्याला वाटले व तो कमालीचा भेदरला. त्याने डोळे उघडले. ओस्यानीना दगड चढून आली होती आणि त्याच्या पायाला स्पर्श करत होती.

"जर्मन?"

"कुठं?" तिने घाबरून विचारले.

"हात्तिच्या... मला वाटलं..."

तिने त्याच्याकडे दीर्घ काळ पाहिले व स्मित केले.

"एक डुलकी काढा सार्जंट-मेजर. मी तुमचा ओव्हरकोट घेऊन येत्ये."

"छे:, भलतंच, ओस्यानीना! एकदम तंद्री लागली. एक सिगारेट ओढली पाहिजे."

तो खाली उतरला तेव्हा कोमेल्कोवा खडकाच्या आडोशात बसून केस विंचरत असल्याची त्याला आढळले. तिच्या केसांचा संभार एवढा विपुल होता की तिची पाठ पूर्ण झाकली गेली होती. जेथवर हात खाली पोहोचेल तेथवर तिने विंचरायला आरंभ केला. मग तिने अखेरचा पुंजका हातात पकडला व वर उचलून शेवटपर्यंत कंगवा फिरवत नेला. तिचे केस दाट व मऊ होते आणि तापलेल्या तांब्यासारखा त्यांचा रंग होता. तिच्या हालचाली मंद आणि हलकेच होत होत्या.

"रंगवलेत वाटतं," सार्जंट-मेजर म्हणाला व ती फटकन काही दुरुत्तर करील अशा धास्तीने चपापला. सगळाच बेरंग झाला असता.

"नाही, मूळचाच रंग तसा आहे. माझा अवतार दिसतोय?"

"काही विशेष नाही."

"आणि तुम्ही चिंता करू नका. लीझा ब्रीच्कीना तिथं डोळ्यात तेल घालून बसलीय. तिची नजर तीक्ष्ण आहे."

"ठीक, ठीक. आटप तुझं लौकर..."

अरे बापरे! परत तो शब्द! नियमावलीत तो होता हीच पंचाईत होती. त्याच्या मनात कायमचा कोरला गेलेला. वास्कोव, लेका तू अगदी रानातले अस्वल होतास!..

त्याने कपाळाला आठ्या घातल्या, सिगारेट पेटवली व धुराला हाताचा आडोसा धरला.

"कॉम्रेड सार्जंट-मेजर, तुमचं लग्न झालंय?"

त्याने तिच्याकडे पाहिले. लालसर ज्वालेमधून एक हिरवा डोळा त्याच्याकडे टक लावून पहात होता. काय त्या डोळ्याची ताकद! जणू १५२ मि. मी. ची तोफ!

"होय, प्रायव्हेट कोमेल्कोवा."

अर्थातच तो खोटे बोलत होता. पण अशा संगतीत फक्त तसेच करणे शक्य होते. त्यामुळे प्रत्येकाचे स्थान निश्चित होत होते, कोण कुठे उभे होते ह्याची स्पष्टता होत होती.

"आणि तुमची बायको कुठं आहे?"

"अर्थात घरी."

"मुलं आहेत?"

"मुलं?" फेदोत एवग्राफीचने सुस्कारा टाकला. "एक लहान मुलगा होता. तो वारला. युद्धाच्या जरा आधी."

"वारला?"

तिने केस मागे झटकून उडवले आणि त्याच्याकडे पाहिले — थेट त्याच्या काळजात. होय, अगदी थेट त्याच्या काळजात. आणि पुढे ती काहीही बोलली नाही. तिने सांत्वनाचे शब्द उच्चारले नाही, विनोद केले नाही, पोकळ शेरे मारले नाही. वास्कोवलाच राहवले नाही आणि उसासत तो म्हणाला: "आईचा त्यात थोडा दोष होता..."

त्याचा त्याला तात्काळ पश्चात्ताप झाला. त्याला एवढा खेद वाटला की, तो ताडकन उभा राहिला आणि जणू पाहणीसाठी कुडता सरळ करू लागला.

"ओस्यानीना, कसं काय?"

"कुणी दिसत नाही अजून, कॉम्रेड सार्जंट-मेजर."

"टेहळणी चालू ठेव!"

एकेका सैनिकाकडे जाऊन तो भेटू लागला.

सूर्य केव्हाच मावळला होता, पण जणू पहाटेपूर्वीची आभा फाकल्याप्रमाणे उजेड पसरला होता. प्रायव्हेट गूर्विच खडकामागे बसून पुस्तक वाचत होती. प्रार्थना म्हणावी त्याप्रमाणे ती पुटपुटत होती. तिला भानावर आणण्यापूर्वी वास्कोवने तिचे पुटपुटणे थोडा वेळ ऐकले.

कुचंबल्या वर्षांत जन्मलेल्यांना
स्वतःच्या वाटा आठवत नाहीत,
आम्हा — रशियातल्या भयकाळातल्या मुलांना —
विसर कशाचाच पडत नाही.

राखेतल्या वर्षांनो!
सुचवताय तुम्ही आम्हाला वेडेपणा अथवा आशा?
युद्धाच्या दिवसांपासून, स्वातंत्र्याच्या दिवसापर्यंत
रक्तलांच्छित प्रतिबिंब आमच्या मुद्रांवर...

"कुणाला वाचून दाखवते आहेस?" तिच्यापाशी जात त्याने विचारले.

दुभाषी शरमली (सरतेशेवटी तिला टेहळणी करण्याचा हुकूम होता). तिने पुस्तक खाली ठेवले व ती उठण्याच्या बेतात होती. सार्जंट-मेजरने खुणेनेच तिला खाली बसायला सांगितले.

"मी तुला विचारतोय, कुणाला वाचून दाखवतेस?"

"कुणालाही नाही. स्वत:शीच."

"मग मोठ्यांदा का?"

"ही कविता आहे ना?"

"अं..." वास्कोवला समजले नाही. त्याने पुस्तक उचलले – पातळसेच होते, ग्रेनेड फेकण्याच्या साधनाचा उपयोग कसा करावा ह्याबद्दल सूचना देणाऱ्या पुस्तिकेसारखे – आणि चाळून पाहिले. "तुझे डोळे बिघडवून घेशील."

"उजेड आहे, कॉम्रेड सार्जंट-मेजर."

"मी आपलं सांगितलं... आणि ह्या दगडांवर बसू नको. त्यांच्यामधून उष्णता लौकर निघून जाते आणि तुमच्या ध्यानात यायच्या आत तुमच्या शरीरातली ऊब ते शोषून घेतात. कोट पसरून त्यावर बैस."

"ठीक आहे, कॉम्रेड सार्जंट-मेजर. धन्यवाद."

"पण मोठ्यांदा वाचू नको. संध्याकाळची हवा दमट आहे. तिच्यातून आवाज लांबपर्यंत वाहात जातो आणि पहाट इथं

इतकी शांत आहे की, पाच वेर्स्ता अंतरावर तुझा आवाज ऐकू जाईल. लक्ष ठेव. प्रायव्हेट गूर्विच, नीट लक्ष ठेव."

ब्रीच्कीना सरोवरापाशी होती आणि तिच्या जवळ जाण्यापूर्वीच वास्कोवने समाधानाने स्मित केले. इथे खरी चतुर मुलगी होती! फर वृक्षाच्या काही फांद्या तिने मोडल्या होत्या दोन दगडांच्या दरम्यान स्वत:साठी आरामशीर गुंफा बनवली होती आणि ओव्हरकोटाने तिला झाकून टाकले होते.. आपले काम तिला ठाऊक होते. कुतूहलाने त्याने तिला विचारले :

"कुठची तू ब्रीच्कीना?"

"ब्र्यान्स्क प्रदेशातली, कॉम्रेड सार्जंट-मेजर."

"सामुदायिक शेतावर काम करत होतीस?"

"होय. पण जास्त करून मी माझ्या वडलांनाच मदत करायची. ते जंगल अधिकारी आहेत. आम्ही जंगलपट्ट्यात रहात होतो."

"म्हणून तुला बदकाचा आवाज छान काढता येतो."

ती हसली. ह्या मुलींना हसायला आवडत होते, अजून स[illegible]य गमावली नव्हती.

"काही दिसलं का?"

"अजून तर शांत आहे."

"दक्ष रहा, ब्रीच्कीना. झुडूपं हलली अथवा पक्ष्यांनी धोक्याचे इशारे दिले, तर तिकडं लक्ष ठेव. तू जंगलात राहिलेली आहेस, तेव्हा तुला सारं माहीत आहे."

"हो."

"ठीक, ठीक..."

तो पावलांची चाळवाचाळव करत होता. त्याने सर्व काही

सांगून झाले होते, सूचना देऊन झाल्या होत्या आणि आता तेथून निघून जाण्याची वेळ झाली होती. पण त्याचे पाय तेथून हलेचनात. ती त्याच्या आवडीची मुलगी होती, जंगलची मुलगी होती. तिने स्वतःची आरामशीर व्यवस्था करून घेतली होती आणि तिच्यामधून विलक्षण ऊब उमटत होती — थोड्या वेळापूर्वी त्याला स्वप्नात दिसलेल्या रशियन चुलाण्यासारखी.

"लीझा, लीझा, लीझावेता, पत्र का मला पाठवत नाहीस, प्रेमाचं गीत गात का नाहीस, अथवा तुला तो आवडत नाही?" सार्जंट-मेजरने एका दमात सर्व ओळी म्हटल्या आणि मग शुष्क आवाजात खुलासा केला: "आमच्या भागातलं गाणं आहे."

"आमच्या भागातसुद्धा..."

"नंतर गाऊ आपण एकत्र, लीझावेता. लढाईची कामगिरी पार पाडू आणि नंतर गाऊ."

"खरंच?" स्मित करत लीझाने विचारले.

"मी तसं म्हणालोय, होय की नाही?"

सार्जंट-मेजरने अचानक तिला मस्त डोळा मारला. त्याच्या ह्या कृतीची तिच्यापेक्षा त्याला स्वतःलाच अधिक शरम वाटली. त्याने स्वतःची टोपी नीट केली व तो तेथून निघाला. ब्रीच्कीना त्याच्या पाठी म्हणाली: "आठवण ठेवा, कॉम्रेड सार्जंट-मेजर! तुम्ही वचन दिलंय!"

त्याने उत्तर दिले नाही, पण डोंगरातून राखीव जागेवर येईपर्यंतच्या सर्व वाटेवर त्याचा चेहरा हसरा होता. येथे मात्र त्याच्या मुद्रेवरचे स्मित लोपले आणि प्रायव्हेट चेत्वेर्ताकची लपण्याची जागा तो शोधू लागला.

प्रायव्हेट चेत्वेर्ताक एका कड्याच्या आडोशाला त्या सर्वांच्या

पडशांवर बसली होती. स्वतःचे शरीर तिने ओव्हरकोटात गच्च गुंडाळून घेतले होते व हात बाह्यांमध्ये खुपसले होते. तिच्या वर केलेल्या कॉलरमुळे तिचा चेहरा झाकला गेला होता व टोपी खाली खेचलेली असल्यामुळे फक्त तिचे लाल, पातळ नाक बाहेर डोकावत होते.

"तू अशी अंगाची मुटकुळी करून काय बसलीस, कॉम्रेड प्रायव्हेट?"

"थंडी वाजतेय..."

त्याने हात पुढे केला व तिने अंग चोरले. मूर्ख पोरीला वाटले की, तो तिच्या अंगचटीला येत होता...

"जागची हलू नकोस. बघू तुझं कपाळ मला. चल!"

तिने मान लांब केली आणि सार्जंट-मेजरने तिच्या कपाळावर हात ठेवला–तापले होते. भाजत होते. काय तरी पोरटचा ह्या!

"तुला ताप भरलाय, माहीत आहे?"

ती काही बोलली नाही. तिचे डोळे खिन्न होते, एखाद्या पाडीसारखे. कुणावरही त्यांनी ठपका ठेवला असता. ती दलदल, कॉम्रेड सार्जंट-मेजर वास्कोव. तुझ्या सैनिकाने गमावलेला तो बूट. तू केलेली घाई आणि मे महिन्यातले गार वारे. आपला एक सैनिक निकामी झाला असे त्याने स्वतःला बजावले. तुकडीवर बोजा, त्याच्या स्वतःच्या सदसद्विवेक-बुद्धीवर बोजा.

फेदोत एवग्राफीचने स्वतःची पिशवी उघडली आणि हात आत खुपसून चाचपले. त्याचा अत्यंत महत्त्वाचा शिधा तेथे लपवून ठेवलेला होता–स्पिरिटची ७५० ग्रामची बाटली. आता त्याने काही स्पिरीट कपात ओतले.

"तू सरळ पिणार का त्यात काही मिसळलं पाहिजे?"

"काय आहे ते?'

"औषध... अं... स्पिरिट. काय?"

तिने जोराने नकार दिला: "ओय, कमाल तुमची..."

"घे असा हुकूम करतोय!"

थोडा विचार करून सार्जंट-मेजरने स्पिरिटमध्ये किंचित पाणी मिसळले.

"पी आणि नंतर थोडं पाणी पी."

"नाही..."

"पिऊन टाक, वटवट नको!"

"असं काय करता तुम्ही! माझी आई... डॉक्टर आहे..."

"इथं आया नाहीत. युद्ध आहे, जर्मन आहेत, मी आहे, सार्जंट-मेजर वास्कोव. आया नाहीत. जे युद्धातून वाचतील, त्यांना आया भेटतील. शिरलं तुझ्या डोक्यात?"

तिने गटकन स्पिरिट पिऊन टाकले. ठसक्याने तिचा श्वास घुसमटला व डोळ्यांमध्ये पाणी आले. फेदोत एवग्राफीचने तिच्या पाठीवर हलकेच थोपटले. ती सावरली. गालांवर ओघळलेली आसवे तिने हाताने पुसून टाकली. स्मित करून म्हणाली:

"बाई ग, माझं डोकं... कुठंतरी पळून जातंय!"

"उद्या गाठशील."

त्याने फरच्या काही फांद्या गोळा करून आणल्या व त्यांची तिच्यासाठी बिछायत बनवली. मग स्वत:चा ओव्हरकोट तिच्या अंगावर पांघरून तो म्हणाला:

"विश्रांती घे, कॉम्रेड सैनिक."

"पण ओव्हरकोटाशिवाय तुम्ही कसे राहणार?"

"मी भक्कम आहे, घाबरू नको. मात्र उद्यापर्यंत बरी हो. माझी विनवणी आहे, बरी हो."

सभोवार कमालीची शांतता पसरली. झाडे, सरोवरे, खुद्द हवा रात्रीपुरती विश्रांतीला गेली आणि स्तब्धता नांदू लागली. मध्यरात्र उलटून गेली, नवा दिवस सुरू होत होता, पण जर्मनांचा मागमूस नव्हता. रीता अधूनमधून सार्जंट-मेजरकडे नजर टाकत होती. शेवटी ती दोघेच राहिली तेव्हा तिने त्याला विचारले:

"कदाचित आपण उगीचच बसून राहतोय?"

"कदाचित असेल तसं," उसासत सार्जंट-मेजर म्हणाला. "पण मला तसं वाटत नाही. म्हणजे झाडांच्या खुंटांना चुकून तू जर्मन समजली नसलीस तर!"

दरम्यान त्याने टेहळणीचे काम बंद करायला सांगितले होते व सर्वांना राखीव जागी पाठवून दिले. फरच्या फांद्या गोळा करून बिछाने बनवा आणि तो जागे करायला येईपर्यंत झोपून जा, असे त्यांना सांगितले होते. स्वतः मात्र मुख्य जागी थांबून राहण्याचा त्याने निर्णय घेतला होता व ओस्यानीनाने त्याच्या बरोबर तेथेच थांबण्याचा आग्रह धरला होता.

जर्मनांचे दर्शन अद्याप न घडल्यामुळे तो गोंधळून गेला होता. कदाचित, रेल्वेकडे जाण्याचा दुसरा एखादा मार्ग त्यांनी शोधला असावा. कदाचित त्यांच्यावर दुसरीच एखादी कामगिरी सोपवलेली असेल–त्याच्या मनात जे आले होते ते नसेल. एव्हाना त्यांनी भयंकर उत्पात घडवला असेल, कुणातरी मोठ्या अधिकाऱ्याला ठार मारले असेल, महत्त्वाचे एखादे ठाणे उडवून लावले असेल. तर मग सरळ लष्करी न्यायालयासमोर उभे राहून जाब द्यावा. उगाच जंगल विंचरून काढण्यापेक्षा

आणि जर्मनांना खतम करण्याच्या हेतूने स्वतःच्या पथकाची पायपीट करण्यापेक्षा? मुलींना बचावण्याचा तू प्रयत्न करत होता? खुल्या लढाईत त्यांना फेकायला तू घाबरत होता? हुकूम अंमलात न आणल्याबद्दल ती सबब पुरेशी नाही. कोणतीही सबब चालणार नव्हती.

"तुम्ही थोडी झोप घेतलीच पाहिजे, कॉम्रेड सार्जंट-मेजर. पहाटे मी तुम्हाला जागं करीन..."

झोप? मरो ती झोप! जरी त्याचा ओव्हरकोट त्याने देऊन टाकला होता, तरी त्याला थंडीसुद्धा वाजत नव्हती...

"माझ्या झोपेची चिंता करू नकोस, ओस्यानीना. मी झोपीन थोडा... कायमचीच झोप मिळेल—जर ते जर्मन माझ्या हातून हुकले तर!"

"कदाचित तेसुद्धा आत्ता झोपलेले असतील, फेदोत एवग्राफीच?"

"झोपलेले?"

"हो, तीसुद्धा माणसंच आहेत. तुम्हीच म्हणालात की, सीन्यूखीना शिखरावरूनच रेल्वेपर्यंत जायला सर्वांत सोयीचा रस्ता आहे. आणि अंतर..."

"थांब, ओस्यानीना, थांब! अर्थात ५० वेर्स्ता अंतर नक्की आहे, त्याहून जास्तच. आणि ओळखीचा प्रदेश नाही; प्रत्येक झुडूपाआड काय दडलंय ह्याची भीती... काय? बरोबर?"

"होय, कॉम्रेड सार्जंट-मेजर."

"तसं असेल तर नक्कीच कुठंतरी दाट जंगलात झोपायचं त्यांनी ठरवलं असणार... सूर्य उगवेपर्यंत. आणि सूर्य उगवला म्हणजे... काय?.."

रीताने स्मित केले आणि खूप खूप वेळपर्यंत त्याच्याकडे टक लावून पाहिले. बायका लहान मुलांकडे पाहतात तसे.

"तर मग तुम्हीही सूर्य उगवेपर्यंत विश्रांती घेऊ शकता. मी तुम्हाला जागं करीन."

"मला झोप येत नाही, कॉम्रेड ओस्यानीना... मार्गरीता ... तुमच्या वडलांचं नांव काय?"

"मला फक्त रीता म्हणा, फेदोत एवग्राफीच."

"सिगारेट ओढू या, कॉम्रेड रीता?"

"मी धूम्रपान करत नाही."

"होय, तीसुद्धा माणसंच आहेत... इकडं मी दुर्लक्ष केलं. बरोबर सांगितलंस: तेसुद्धा विश्रांती घेत असणार. रीता, तुलाही विश्रांती घेतली पाहिजे. जा."

"मला झोपायची इच्छा नाही."

"मग नुसती पडून रहा. पाय सरळ कर. चालायची सवय नसल्यामुळं नक्की दमले असतील."

"उलट मला चांगली सवय आहे," स्मित करत रीता म्हणाली.

तरीसुद्धा, सार्जंट-मेजरने तिचे मन वळवून तिला विश्रांती घ्यायला लावली. लीझा ब्रीच्कीनाने स्वत:साठी बनवून ठेवलेल्या फरच्या फांद्यांच्या बिछायतीवर. हेच ठिकाण त्यांची युद्धआघाडी बनायचे होते. तिने आपला ओव्हरकोट खांद्यांवरून ओढून घेतला—पहाट फुटण्यापूर्वी एक डुलकी काढण्याच्या इराद्याने. आणि ती झोपली, गाढ झोपली, कोणतीही स्वप्ने न पाहता.

सार्जंट-मेजरने तिच्या कोटाला खेचल्यामुळे तिला जाग आली.

"काय झालं?"

"चूप! ऐकलंस?"

रीताने कोट बाजूला फेकला, स्कर्ट व्यवस्थित केला आणि उडी मारून ती उभी झाली. सूर्य नुकताच क्षितिजावरून वर सरकला होता आणि दगडांना गुलाबी छटा आली होती. तिने वर नजर टाकली: दूरवरच्या जंगलावर पक्षी उडत होते, कर्कश्य आवाजात साद घालत होते.

"पक्षी ओरडताहेत..."

"नीलकण्ठ!.." वास्कोव हळूच हसला. "नीलकण्ठ ओरडा करताहेत, रीता. म्हणजे कुणीतरी त्यांना त्रास देतंय. म्हणजे आपले पाहुणे आलेत. ओस्यानीना, जा आणि आपल्या सैनिकांना ताबडतोब इकडं आण. मात्र आवाज न करता! अगदी गुपचूप!.."

रीता धावली.

सार्जंट-मेजर स्वतःच्या जागी स्थानापन्न झाला. इतर सर्वांच्या थोडे पुढे, एका उंचवट्यावर. त्याने पिस्तूल तपासले, रायफल ठासली आणि उगवत्या सूर्याच्या किरणांनी एव्हाना स्पर्शलेल्या जंगलाच्या किनारीवरून दुर्बीण फिरवली. नीलकण्ठ अजूनही झुडूपांवर घिरट्या मारत होते, एकमेकांना कर्कश्य आवाजात साद घालत होते.

एकामागून एक त्याचे सैनिक आले आणि मुकाटपणे प्रत्येकीने आपापली जागा घेतली.

गूर्विच त्याच्यापाशी गेली:

"नमस्ते, कॉम्रेड सार्जंट-मेजर."

"रामराम. तिथं चेत्वेर्ताक कशी आहे?"

"झोपलीय. तिला आम्ही जागं केलं नाही."

"योग्य तेच केलंत. संपर्कासाठी माझ्याजवळ रहा. पण स्वत:ला दाखवू मात्र नकोस."

"नाही दाखवणार," गूर्विच म्हणाली.

दरम्यान नीलकण्ठ पक्षी जवळ जवळ येत होते आणि झुडूपांचे शेंडे अधूनमधून किंचित हलल्याचे वास्कोव पहात होता. अवजड पावलाखाली वाळकी फांदी काडकन मोडलेली ऐकल्याचाही त्याला भास झाला. मग काही वेळपर्यंत सर्व काही शांत होते. नीलकण्ठ पक्षीसुद्धा शांत झाल्याचे भासले. पण झुडूपात, जंगलाच्या अगदी किनारीला, कुणीतरी आहे याबद्दल सार्जंट-मेजरची खात्री होती. आत्ता नक्की ते तेथे बसून सरोवराचा किनारा न्याहाळत होते, दुसऱ्या बाजूचे जंगल पहात होते; त्यांची वाट जेथून जात होती त्या डोंगराकडे पहात होते. आणि सार्जंट-मेजर व झोपेमुळे गुलाबी गाल बनलेल्या त्याच्या सैनिक मुली तेथेच लपून बसल्या होत्या.

आता तो रहस्यमय क्षण आला होता–जेव्हा एक प्रसंग नकळतपणे दुसऱ्यात मिसळत असतो, जेव्हा कारण परिणामाला वाट करून देते, जेव्हा योगायोग जन्माला येतो. असा क्षण शांतताकाळात ध्यानात न येता उलटून जातो, पण युद्धात, जेथे नसा कमाल मर्यादेपर्यंत ताणलेल्या असतात आणि जिवंत राहणे हेच आद्य उद्दिष्ट बनते, तेव्हा असे क्षण भयानक वास्तव बनतात, सुस्पष्ट दिसतात आणि चिरंतन काळपर्यंत टिकलेत असे भासतात.

"अरे... या ना... या..." आवाज न करता फेदोत एवग्राफीच पुटपुटला.

दूरची झुडूपे हलली आणि जंगलाच्या किन[illegible]ी दोन पुरुष घाबरत बाहेर आले. त्यांच्या अंगावर शेवाळी रंगाचे

लपण्याचे अंगरखे होते, पण सूर्य थेट त्यांच्या तोंडांवर तळपत होता व त्यांची प्रत्येक हालचाल सार्जंट-मेजर पाहू शकत होता. सब-मशिनगनच्या चापांवर बोटे ठेवून, खाली झुकून, हलक्या, मांजराच्या पावलांनी ते सरोवराकडे जात होते.

पण वास्कोव इत:पर त्यांच्याकडे पहात नव्हता. त्याचे कारण त्यांच्यामागील झुडूपे अजूनही हलत होती आणि सब-मशिनगन सज्ज धरलेल्या शेवाळी रंगाच्या पोषाखातील अधिकाधिक आकृती झुडूपांमधून बाहेर पडत होत्या.

"तीन... पाच... आठ... दहा..." अस्पष्ट आवाजात गूर्विच मोजत होती. "बारा... चौदा... पंधरा... सोळा, कॉम्रेड सार्जंट-मेजर..."

पुन्हा एकदा झुडूपे स्तब्ध बनली.

नीलकण्ठ पक्षी दूर उडत जाताना ओरडत होते.

सावधपणे, सावकाशपणे सोळा जर्मन सरोवराच्या काठाने सीन्यूखीना शिखराकडे येऊ लागले...

## ६

फेदोत एवग्राफीचला सबंध आयुष्यभर हुकूम पाळण्याची सवय झाली होती. हे सगळे हुकूम तो शब्दश:, वेगाने व आनंदाने पार पाडायचा, कारण कुणाच्यातरी इच्छेची काटेकोर अंमलबजावणी करण्यात त्याच्या अस्तित्वाचे पूर्ण सार साठवलेले होते. त्याचे वरिष्ठ त्याच्याकडून हुकूमाच्या अंमलबजावणीची अपेक्षा धरत आणि त्याशिवाय त्याच्याकडून दुसरी कोणतीही अपेक्षा केली जात नव्हती. एका महाप्रचंड, सुनियंत्रित यंत्रणेमधील तो एक दांता होता. तो फिरत होता आणि इतरांनाही फिरवत होता. मात्र हालचालीचा उगम, तिची दिशा

अथवा तिची निष्पत्ती यांबाबत त्याच्या मनात विचार येत नसे.

वोप सरोवराच्या काठाने जर्मन सावकाशपणे आणि कठोरपणे थेट त्याच्या व त्याच्या सैनिकांच्या दिशेने पुढे येत होते. त्याने शिकवल्यानुसार, त्याचे सैनिक आपले गाल रायफलींच्या दांड्यांना घट्ट चिकटवून दगडांमागे आत्ता लपून बसले होते.

"सोळा, कॉम्रेड सार्जंट-मेजर," जेमतेम ऐकू जाईल अशा तऱ्हेने गूर्विच परत म्हणाली.

"मला दिसतंय," मागे न फिरता तो उत्तरला. "गूर्विच, स्वतःच्या जागेवर जा आणि ओस्यानीनाला सांग की, तिची तुकडी घेऊन राखीव जागेवर जा. आणि हे अगदी गुपचूप कर, अगदी गुपचूप! थांब, कुठं निघालीस?.. ब्रीच्कीनाला माझ्यापाशी पाठवून दे. आणि कॉम्रेड दुभाषी, सरपटत जा. यापुढं चांगला काळ येईपर्यंत सरपटत जगावं लागणार आहे."

दगडांमधून काळजीपूर्वक वाट काढत गूर्विच सरपटत गेली. काहीतरी विचार केला पाहिजे असे वास्कोवला मनस्वी वाटले. काहीतरी निर्णय घ्यायला हवा होता. पण त्याचे डोके अगदी ठणठणीत रिते होते. वर्षानुवर्षांच्या प्रशिक्षणाने त्याच्यात मुरवलेली गोष्ट करण्याची विलक्षण खुमखुमी त्याला सतावत होती — वर्दी देण्याची. अगदी त्याच क्षणाला, थेटपणे, एखाद्या वरिष्ठ अधिकाऱ्यापाशी सगळा वृत्तांत सांगावा असे त्याला वाटत होते; परिस्थिती बदलली आहे व त्याच्या अख्त्यारातील सैनिकांच्या साह्याने कीरोव रेल्वे अथवा स्तालीन कालवा यांचे रक्षण करण्याची त्याची कुवत नव्हती, असे सांगावेसे वाटत होते.

त्याची तुकडी माघार घेत होती. रायफल कशावरतरी आपटल्याचा अथवा एखादा दगड निसटल्याचा आवाज त्याला

ऐकू येत होता. ह्या आवाजांचा अक्षरशः त्याच्या शरीरात प्रतिध्वनी घुमत होता व जर्मन जरी अजून दूर अंतरावर होते आणि त्यांना काही ऐकू जाणे शक्य नव्हते, तरी फेदोत एवग्राफीचला खऱ्या भीतीने घेरले होते. आत्ता जर काडतूसांच्या पूर्ण थाळीसह एक मशिनगन आणि एक चलाख मदतनीस असता तर! मशिनगन कशाला? नुसत्या तीन सबमशिनगन आणि पाठीशी तीन धडधाकट पुरुष असते, तरी त्याने समाधान मानले असते. पण ना त्याच्यापाशी मशिनगन होत्या, ना पुरुष. त्याच्यापाशी होत्या पाच खिदळणाऱ्या पोरी आणि दर रायफलीगणिक काडतूसाच्या पाच थाळ्या. अशा परिस्थितीत त्या मे महिन्यातील दंवभरल्या सकाळीसुद्धा सार्जंट-मेजर वास्कोवला दरदरून घाम फुटला तर त्यात नवल नव्हते...

"कॉम्रेड सार्जंट-मेजर... कॉम्रेड सार्जंट-मेजर...."

मान वळवण्यापूर्वी वास्कोवने काळजीपूर्वक आपल्या बाहीने घाम पुसून काढला. त्याच्या अगदी नजीक, डोळ्यांची एक जोडी विस्फारून त्याच्याकडे पहात असलेली त्याला आढळली. डोळा मारून तो म्हणाला:

"ब्रीच्कीना, आनंदी हो. अग हे तर फारच छान की, ते सोळा आहेत. समजलं?"

दोनपेक्षा सोळा जर्मन असणे फारच छान का, ह्याचा खुलासा सार्जंट-मेजर करू शकला नाही. पण लीझाने होकारार्थी मान हलवली आणि एक तात्पुरते स्मित तिच्या ओठांवर उमटले.

"तुला माघारीचा रस्ता आठवतो?"

"होय, कॉम्रेड सार्जंट-मेजर."

"फ्रीत्सांच्या डावीकडं पाईनची राई पसरलेली दिसते. त्या रस्त्यानं, राईलगत, सरोवराकाठानं जा."

/

"म्हणजे सुकी लाकडं तुम्ही फोडली होती तिथं?"

"शाब्बास पोरी! त्यानंतर ओढ्याकडं वळ. तो सरळ रस्ता आहे... तिथं तू वाट चुकणार नाहीस."

"मला माहीत आहे, कॉम्रेड..."

"थांब, लीझावेता, एवढी घाई करू नकोस. मुख्य मुद्दा— दलदल, समजलं? पायउतार अरुंद आहे. जरा डावं-उजवं झालं तर संपला मामला. भोजाचं झाड लक्ष्य म्हणून धर. आणि भोजापासून थेट छोट्या बेटावरच्या दोन पाईन झाडां-पर्यंत जा."

"हो, हो."

"तिथं थोडा दम खा. पटकन पुढं धावू नको. बेटानंतर तुझं उद्दिष्ट झाडाचा जळका खुंट. त्याच्यावरून मी दलदलीत पहिलं पाऊल टाकलं. बारकाईनं पहा. तो खुंट ठळक उठून दिसतो."

"हो, हो."

"कीर्यानोवाला इथली हकीकत सांग. दरम्यान इथं आम्ही जर्मनांना थोडा वेळ घोळत ठेवतो, पण फार काळ टिकाव धरणं आम्हाला शक्य होणार नाही. तुला स्वतःलाच माहीत आहे."

"हो, हो."

"रायफल, पडशी, ओव्हरकोट—सगळं इथंच ठेव. हलक्या वजनानं पसार हो."

"म्हणजे, मी आत्ता निघायचं?"

"दलदलीत पाय टाकण्यापूर्वी काठी घ्यायला विसरू नको."

"हो, हो. मी पळते आता."

"पळ, लीझावेता – जे काही तुझ्या वडलांचं नांव असेल ते."

लीझाने मूकपणे मान डोलावली आणि ती दूर झाली. तिने रायफल दगडाला टेकवून ठेवली आणि चामडी पट्ट्यामधून काडतूसांची पेटी काढून टाकायला आरंभ केला. हा सारा वेळ ती वास्कोवकडे अपेक्षेने पहात होती. पण वास्कोवचे ध्यान जर्मनांकडे होते, त्यामुळे लीझाची गोंधळलेली मुद्रा त्याने कधीच पाहिली नाही. लीझाने हळूच सुस्कारा टाकला, पट्टा कमरेला गच्च आवळला आणि पाईनच्या राईकडे ओणव्याने ती पळाली. जगभरच्या बायका ज्या पद्धतीने किंचित पाय फरफटत धावतात त्या पद्धतीने ती किंचित पाय फरफटत धावली.

जर्मन आता अगदी जवळ आले होते. त्यांचे चेहरे स्पष्ट दिसत होते आणि वास्कोव दगडांना घट्ट चिकटून होता. जर्मनांवर लक्ष ठेवत असतानाच अगदी शिखरापासून सुरू झालेल्या व जंगलाच्या टोकापर्यंत पसरलेल्या पाईनच्या राईवरही त्याचे लक्ष होते. तेथे किंचित हालचाल झालेली त्याच्या ध्यानात आली. झुडूपांचे डोलणे दोनदा घडले. पण जणू काही एखादा पक्षी स्पर्श करून जावा एवढी ती हालचाल हलकी होती. ह्या कामगिरीवर लीझा ब्रीच्कीनाला त्याने पाठवले ते योग्य केले, असे त्याने स्वत:ला बजावले.

लीझाचे पळणे जर्मनांच्या ध्यानात न आल्याबद्दल खात्री झाल्यानंतर त्याने रायफलीचा संरक्षक खटका लावला आणि दगडावरून तो खाली उतरला. लीझाची रायफल त्याने उचलली आणि मागे थेट पळ काढला. पावलांचा आवाज होऊ नये म्हणून कुठे पाय टेकायचा ह्याचे ज्ञान त्याला अंत:प्रेरणेने घडत होते.

"कॉम्रेड सार्जंट-मेजर..."

मूठभर धान्यावर चिमण्यांचा थवा जसा झडप घालतो, तशा त्या त्याच्याकडे धावल्या. ओव्हरकोट उडवून चेत्वेर्ताकसुद्धा धावली.

सैनिकांनी तशा रीतीने वागणे योग्य नव्हते आणि त्याने त्यांना शिस्त राखायला सांगणे आवश्यक होते. पहारेकरी न ठेवल्याबद्दल त्याने ओस्यानीनाला ताकीद द्यायला हवी होती. त्याने रुबाबात कपाळाला आठया घातल्या आणि हुकूम ठोकायला तोंड उघडले, अगदी अस्सल हुकूम द्यायला, पण मग त्यांच्या डोळ्यांमधील तीव्र भाव त्याच्या ध्यानात आला. तेव्हा त्याने इरादा बदलला व एखादा सामुदायिक शेतावरील पथक-प्रमुख ज्या पद्धतीने बोलतो, त्या थाटात तो म्हणाला: "पोरींनो, मामला वाईट आहे."

एका दगडावर तो बसायच्या बेतात होता, तेवढ्यात गूर्विचने त्याला अडवले आणि पटकन आपला ओव्हरकोट अंथरला. त्याने कृतज्ञतेने तिच्याकडे पाहून मान झुकवली, तो खाली बसला आणि त्याने तंबाखूचा बटवा बाहेर काढला.

मुली त्याच्या पुढ्यातच एका रांगेत बसल्या आणि तो सिगारेट वळत असताना मुकाट पहात राहिल्या. वास्कोव चेत्वेर्ताकिकडे वळून म्हणाला:

"आता कशी आहेस तू?"

"वाईट नाही." स्मित करण्याचा तिचा इरादा यशस्वी झाला नाही. तिचे ओठ तिला ऐकायला तयार नव्हते. "मला चांगली झोप लागली."

"तर ते सोळा आहेत," शांतपणे बोलण्याचा सार्जंट-मेजर पराकाष्ठेने प्रयत्न करत होता, म्हणून तो प्रत्येक शब्दावर

वजन देत होता. "सोळा सबमशिनगन म्हणजे मोठी बाब आहे. तिला समोरासमोर थोपवणं शक्य नाही. आणि न थांबवणंही शक्य नाही. मला वाटतं, आणखी तीन तासात ते इथं येतील."

ओस्यानीनाची कोमेल्कोवाशी नेत्रपल्लवी झाली, गूर्विचने गुडघ्यांवर स्कर्ट नीट केला आणि चेत्वेर्तािक डोळयांच्या पापण्या न मिटता त्याच्याकडे टक लावून पहात राहिली. आत्ता घडत असलेल्या सर्व गोष्टी कमांडंटच्या ध्यानात आल्या होत्या, त्याने सर्व पाहिले आणि ऐकले होते. पण तरीही तो नुसता धूम्रपान करत राहिला, स्वतःच्या सिगारेटकडे पहात राहिला.

"ब्रीच्कीनाला मी आपल्या तळावर पाठवलंय. रात्रीपर्यंत तरी आपल्याला मदतीची आशा नाही. आणि जर आपण लढाई सुरू केली, तर रात्रीपर्यंत टिकाव धरणं आपल्याला शक्य नाही. आपण कोणताही मोर्चा लगवू शकणार नाही, कारण त्यांच्यापाशी सोळा सबमशिनगन आहेत."

"मग काय? ते जात असताना आपण नुसतं बघत बसायचं?" ओस्यानीनाने संथपणे विचारले.

"नाही, आपण त्यांना डोंगर ओलांडू द्यायचा नाही," तो उत्तरला. "आपण त्यांची वाट चुकवायची. लेगोन्तोवो सरोवराला त्यांना वळसा घालायला लावायचं. पण कसं? हाच प्रश्न आहे. सरळ लढून? ते शक्य नाही. तेव्हा तुमच्या कल्पना मला सांगा."

त्याची स्वतःची गोंधळलेली मनःस्थिती त्यांच्या ध्यानात येईल, त्याला काय जाणवले हे त्यांना समजेल, ह्याचीच सार्जंट-मेजरला सर्वांत जास्त धास्ती वाटत होती. तसे घडले तर सारेच संपले. त्याच्या वरिष्ठतेची अखेर, कमांडर म्हणून



त्याच्या इच्छेची अखेर आणि त्याबरोबरच त्याच्यावरील त्यांच्या विश्वासाची अखेर. म्हणून तो शांतपणे, साधेपणाने बोलत होता, आवाज चढवत नव्हता आणि जणू काही खेड्यातल्या शेजाऱ्यांना सहज भेटायला जावे तशा थाटात सिगारेट फुंकत होता. पण हा सारा वेळ त्याचा भक्कम मेंदू विचारांनी बुजबुजला होता, प्रत्येक शक्यता जोखून पहात होता. आरंभ म्हणून त्याने मुलींना न्याहरी करण्याचा हुकूम दिला. त्या विरोध करू लागल्या तेव्हा त्याने तुटकपणे त्यांना थांबवले आणि आपल्या पडशीमधून डुकराच्या खारवलेल्या मांसाचा तुकडा बाहेर काढला. त्या मुलींवर मांसाचा अगर त्याच्या तुटक शब्दांचा, कशाचा अधिक प्रभाव पडला कोण जाणे, पण लौकरच त्या चघळण्यात गुंतल्या होत्या. आणि ह्यावेळी फेदोत एवग्राफीच मनात हळहळला की, घाई-गडबडीत त्याने लीझा ब्रीच्कीनाला उपाशीपोटीच दूरच्या प्रवासाला धाडले होते.

न्याहरीनंतर कमांडंटने गार पाण्यानेच काळजीपूर्वक दाढी घोटली. अद्याप त्याच्यापाशी त्याच्या वडलांचा वस्तरा होता, सर्वोत्तम वस्तरा होता, पण तरीही दोन जागी त्याने स्वतःला कापून घेतले. वर्तमानपत्राच्या तुकड्यांनी त्याने जखमा टिपल्या आणि कोमेल्कोवाने स्वतःच्या पडशीतून सुगंधी पाण्याची बाटली काढून आपल्या हातांनी त्याच्या जखमा जंतुविरहीत केल्या.

हे सर्व त्याने संथपणे पार पाडले, पण वेळ धावत होता आणि उथळ पाण्यात छोटे मासे सूरकांड्या मारतात त्याप्रमाणे त्याचे विचार इतस्ततः धावत होते. त्या विचारांना एकत्र करणे त्याला अशक्य ठरले. हाती कुऱ्हाड घेऊन सर्पणासाठी लाकडे फोडता येत नव्हती ह्याचा त्याला खेद वाटत होता—

तसे केले असते म्हणजे विचारांची एकाग्रता घडवणे त्याला जमले असते, मनाला नको असलेल्या गोष्टी वगळून टाकता आल्या असत्या आणि परिस्थितीमधून बाहेर पडण्याची वाट दिसली असती.

अर्थात जर्मन तेथे लढण्यासाठी जमले नव्हते हे त्याला समजत होते. जंगलाच्या दाट भागात ते लपूनछपून जात होते, सावधगिरी बाळगत होते, खूप आधी टेहळे पाठवत होते. कशासाठी टेहळे? त्यांचा सुगावा कुणालाही लागू नये म्हणून. अशा रीतीने सर्व अडथळयांना गुपचूप पार करून मुख्य उद्दिष्टापर्यंत त्यांना पोहोचता यावे म्हणून. जर असे असेल तर त्याने त्यांच्या नजरेस पडणे आवश्यक होते व त्याचवेळी त्याचे त्यांच्याकडे लक्ष न गेल्याचा बहाणा करायला हवा होता... त्यामुळे कदाचित त्यांना स्वतःचा मार्ग बदलणे भाग पडले असते व दुसरा रस्ता धुंडाळावा लागला असता. लेगोन्तोवो सरोवराला वळसा घालण्यावाचून दुसरा पर्याय नव्हता—आणि त्याचा अर्थ आणखी २४ तासांची वाटचाल.

पण जर्मनांच्या नजरेला कुणाला पाडायचे? चार मुली आणि तो स्वतः? ठीक आहे, कदाचित ते थांबतील, शोध लावण्यासाठी टेहळेसुद्धा पाठवतील. केवळ पाचच माणसे आहेत हे जर्मनांच्या ध्यानात येईपर्यंत तो शोध टिकला असता. पुढे काय?.. आणि कॉम्रेड सार्जंट-मेजर वास्कोव, ते कुठंही माघार घेणार नाहीत. एकही गोळी न झाडता त्याला ते घेरतील. फक्त पाच खंजिरांच्या साह्याने त्या पाचजणांचा ते निकाल लावतील. चार मुली व एक पिस्तूलधारी सार्जंट-मेजरला घाबरून जायला ते काही मूर्ख नव्हते. ते पळून जाणार नव्हते, तर त्यासाठी जंगलात लपून राहणार होते.

फेदोत एवग्राफीचने स्वत:चे विचार ओस्यानीना, कोमेल्कोवा आणि गूर्विचला बोलून दाखवले. चेत्वेर्ताकने झोप पुरी झाल्यावर पहाऱ्याचे काम पत्करले होते. काहीही लपवून न ठेवता त्याने त्यांना सर्व सांगून टाकले व तो पुढे म्हणाला: "जर पुढच्या तासा-दीड तासात आपण काही ठरवलं नाही, तर मी जसं सांगितलं, तस्संच सारं घडत जाईल. तेव्हा तयार रहा."

तयार रहा... कसली तयारी करायची? दुसऱ्या जगात जायची? तसे असेल तर लौकरात लौकर घडणे इष्ट...

त्याने स्वत:ची पूर्वतयारी केली. पडशीमधून त्याने हातबाँब बाहेर काढला, पिस्तूल साफ केले आणि फिन्निश बनावटीचा सुरा दगडावर घासून त्याला धार काढली. बस्स, त्याची पूर्वतयारी संपली होती. पण त्याच्या मुलींपाशी तेवढेही साहित्य नव्हते. त्याच्यापासून थोड्या अंतरावर बसून दबत्या आवाजात त्यांचा विचारविनिमय चालू होता. शेवटी त्या सगळ्याजणी एकत्रपणे त्याच्यापाशी आल्या व म्हणाल्या: "कॉम्रेड सार्जंट-मेजर, समजा, त्यांची काही लाकूडतोड्यांशी अचानक गाठ पडली?"

वास्कोव गोंधळला. कुठले लाकूडतोडे, कुठे?.. युद्धाचे दिवस होते, जंगलांमध्ये कुणीही नव्हते, खुद्द त्यांनी स्वत: पाहिले होते. त्या खुलासा करू लागल्या आणि वास्कोवला कल्पना सुचली. मामला अगदी सोपा होता. कोणत्याही लष्करी तुकडीचे ठराविक मर्यादित क्षेत्र असते. त्यांना आपले शेजारी कोण ते ठाऊक असते आणि प्रत्येक फाट्यावर पहाऱ्याची चौकी असते. पण लाकूडतोड्यांची गोष्ट वेगळी. लाकूडतोडे जंगलात कुठेही असू शकतात. प्रत्येक पथक अलगपणे काम करत असते. त्या सर्वांना कुठे शोधत बसणार? जर्मन त्यांना

शोधणार? शक्यता नव्हती – तसे करणे धोक्याचे होते. जर्मनांनी सावधगिरी बाळगली नाही, तर कुणीतरी त्यांना पाहिले असते व अधिकाऱ्यांना वर्दी दिली असती. तेथे लाकूडतोडे किती असतील, अथवा ते कुठे असतील आणि त्यांचा कुणाशी संपर्क असेल, ह्याबाबत खात्रीपूर्वक सांगणे कुणालाच शक्य नव्हते.

"वा पोरींनो, तुम्ही अगदी गरुडासारख्या हुशार आहात!"

त्यांच्या राखीव जागेच्या पिछाडीला एक छोटा उथळ, पण खळखळणारा पाण्याचा प्रवाह वाहात होता. त्याच्या दुसऱ्या तीरापासूनच जंगल सुरू होत होते. अॅस्पच्या आणि फरच्या झाडांचे ते दाट अरण्य होते. वाऱ्याने पाडलेली काही झाडे तेथे होती. दोन पावलांपलिकडे नजर गेली तर झाडोऱ्याची हिरवी भिंत डोळ्यांना अडवत होती. कोणतीही झेईस बनावटीची दुर्बीण येथे उपयोगाची नव्हती. झाडांच्या दाटीमधून न्याहाळणे, सतत बदलणारे दृश्य समजून घेणे अथवा त्याचा थांग लावणे अशक्य होते. फेदोत एवग्राफीचने जेव्हा मुलींची योजना स्वीकारली, तेव्हा हे स्थळ त्याच्या मनात होते.

जर्मनांचे हमखास लक्ष जाईल अशा अगदी ऐन मध्यभागी त्याने चेत्वेर्ताक व गूर्विच यांना ठेवले. त्याने त्यांना शेकोट्या पेटवायला सांगितले आणि जास्तीत जास्त धूर करा, जंगल दणाणून जाईल असा आरडाओरडा करत एकमेकींना हाका मारा, अशी सूचना केली. पण त्यांनी स्वत: झुडूपांमधून बाहेर पडायचे नव्हते, कुणाच्या दृष्टीला पडायचे नव्हते. त्यांनी थोडीशी इकडेतिकडे धावपळ करायची होती, पण अतिरेक मात्र करायचा नव्हता. त्यांना त्याने पायातील बूटही काढून टाकायला सांगितले – बूट, टोप्या आणि पट्टे अशा ठळकपणे लष्कराशी संबंधित असणाऱ्या वस्तू काढून टाकायला लावल्या.

ह्या विशिष्ट स्थळामुळे जर्मनांना शेकोट्या टाळण्यासाठी फक्त एकच वाट होती – डावीकडे. कारण उजवीकडे थेट पाण्यापासून कडे उभे होते व तेथून जायला सोयीस्कर रस्ता नव्हता. तरीही, सुरक्षितता म्हणून वास्कोवने तेथे ओस्यानीनाला ठेवले. त्याने तिला तोच हुकूम दिला: पळापळ करायची, खूप गोंगाट करायचा आणि शेकोट्या पेटवायच्या. सर्वांत मोक्याच्या जागेचे – डाव्या फळीचे – रक्षण त्याने स्वत:कडे आणि कोमेल्कोवाकडे घेतले. ही जागा फार महत्त्वाची होती, कारण नदीचे वळण तेथून स्पष्ट दिसत होते. जर्मनांनी नदी ओलांडायचे ठरवले तर! मग ह्या जागेतून त्यांच्यापैकी दोघा-तिघांना ठार मारण्याची त्याला संधी मिळेल व दरम्यान मुलींना पळून जाणे शक्य होईल.

वेळ फार कमी उरला होता. वास्कोवने आणखी एकीला पहाऱ्यावर बसवले व तो स्वत:, ओस्यानीना आणि कोमेल्कोवा घाईघाईने पूर्वतयारी करू लागले. दोन मुली झाडोरा गोळा करत होत्या, तोवर तो कुऱ्हाडीने झाडे तोडू लागला – अगदी उघडपणे. खुशाल त्यांना ऐकू जाऊं दे! खुशाल त्यांना आधी इशारा मिळूं दे! सर्वांत जास्त आवाज करतील अशी उंच झाडे त्याने निवडली. तो अशा रीतीने घाव घालत होता, की नंतर नुसता साधा धक्का मारला तरी झाड कोसळावे व नंतर पुढच्या झाडाकडे वळत होता. घामाच्या धारा त्याच्या डोळ्यांमध्ये पडत होत्या, डास त्याला कडकडून चावत होते, पण तो सतत कुऱ्हाड चालवत राहिला, अधूनमधून श्वास घेण्यासाठी तोंड उघडत राहिला. शेवटी गूर्विच स्वत:च्या चौकीवरून धावत आली. प्रवाहाच्या दुसऱ्या बाजूने तिने हात हालवून त्याला इशारा केला: "ते येत आहेत!"

"आपापल्या जागा घ्या," वास्कोव म्हणाला. "मुलींनो, आपापल्या जागांवर जा आणि कृपा करून ध्यानात ठेवा— अगदी सावध रहा. खुशाल तुम्हाला ते पाहोत, पण झाडां-मध्ये, झुडुपात नाही. आणि जेवढं ओरडता येईल तेवढं ओरडा..."

त्याचे सैनिक विखुरले; फक्त गूर्विच आणि चेत्वेर्ताक दुसऱ्या किनाऱ्यावर रेंगाळत राहिल्या. पायाला तात्पुरता बूट बांधलेल्या कापडाच्या पट्ट्या सोडणे चेत्वेर्ताकला काही केल्या जमेना. वास्कोव तिच्यापाशी चालत गेला आणि म्हणाला: "थांब, मी तुला उचलून नेतो."

"इश्श, कॉम्रेड..."

"थांब म्हणून सांगितलं ना! पाणी बर्फासारखं गार आहे आणि तुझी प्रकृती अजून बरी नाही." एक नजर टाकून त्याने तिच्या देहाचा अंदाज घेतला व आपल्या सैनिकाला त्याने हातांवर उचलले (शंभर पौंडसुद्धा तिचे वजन नव्हते). त्याच्या मानेभोवती हातांचा विळखा घालताना ती मुलगी अकारण लाजली. पार मानेपर्यंत तिच्या लज्जेची लाली पसरली आणि ती म्हणाली: "तुम्ही मला एखाद्या लहान मुलीसारखं वागवताय..."

वास्कोवला विनोद करण्याची हुक्की आली—तो काही लाक-डाचा ओंडका उचलून नेत नव्हता—पण प्रत्यक्षात तो वेगळेच बोलला:

"आणि तिथं ओलीत पळू नकोस..."

पाणी जवळजवळ गुडघाभर खोल होते आणि भयंकर थंड होते. स्वतःचा स्कर्ट वर धरून गूर्विच चालत होती. तिचे किरकोळ पाय शुभ्र चकाकत होते आणि तोल राखण्यासाठी

ती बुटांना हेलकावे देत होती. मागे वळून पहात ती म्हणाली: "पाणी गोठवणारं आहे," आणि पटकन तिने स्कर्ट खाली सोडला, स्कर्टची किनार पाण्यात भिजू दिली. वास्कोव रागाने तिच्यावर ओरडला: "तुझा स्कर्ट वर उचलून घे!"

ती एकदम थबकली आणि स्मित करून उत्तरली: "लष्करी नियमात तसं काही नाही, सार्जंट-मेजर..."

अजून जर त्या विनोद करू शकत होत्या, तर परिस्थिती तितकीशी वाईट नव्हती! वास्कोवला ही गोष्ट मनापासून आवडली. जेव्हा तो स्वतःच्या चौकीवर पोहोचला तेव्हा त्याची मनःस्थिती छान होती. कोमेल्कोवा शेकोटचा पेटवण्यात गुंतली होती. जास्तीत जास्त मोठ्यांदा त्याने आरोळी ठोकली: "ए पोरींनो, कामं करा बिगीबिगी!"

दूरून ओस्यानीनाने साद घातली:

"ए हे-है!.. इवान इवानीच, घोड्याची गाडी आण लौकर!.."

त्यांनी आरोळ्या ठोकल्या, अर्धवट तोडलेली झाडे पाडली, एकमेकांना सादी घातल्या, शेकोटचा पेटवल्या. जर्मनांच्या कानी पुरुषाचाही आवाज जावा म्हणून वास्कोवही अधूनमधून ओरडत होता. पण बहुतेक सर्व वेळ प्रवाहासमोरच्या झुडूपांना न्याहाळत तो लव्हाळ्यांच्या दाटीत लपून राहिला.

बराच वेळपर्यंत त्याला काहीही दिसले नाही. एव्हाना त्याच्या मुली आरोळ्या ठोकून दमल्या होत्या. त्याने अर्धवट तोडून ठेवलेली सगळी झाडे पाडण्याचे काम ओस्यानीनाने व कोमेल्कोवाने पार पाडले होते. सूर्य जंगलाच्या माथ्यावर उंच तळपत होता, पाणी चमकत होते, पण दुसऱ्या तीरावरची झुडूपे गप्प आणि स्तब्ध होती.

"कदाचित, निघून गेले?.." कोमेल्कोवा त्याच्या कानात कुजबुजली.

कदाचित ते निघून गेलेही असतील, सैतानालाच माहीत! वास्कोव म्हणजे काही भरीव घन-दर्शक यंत्र नव्हता. त्याच्या नजरेतून ते हुकलेही असतील आणि एव्हाना तीरापर्यंत सरपटत गेले असतील. ते अनुभवी लोक होते–अशा कामगिरीसाठी कुणा सोम्यागोम्याची निवड करणे अशक्य होते.

वास्कोवच्या मनात हे सगळे विचार आले, पण प्रत्यक्षात तो अवघा एकच शब्द बोलला:

"थांब."

पुन्हा एकदा त्याने झुडूपांवरून नजर फिरवली. शेवटच्या डहाळीपर्यंत परिचित बनलेले ते दृश्य त्याने बारकाईने न्याहाळले. त्याने एवढे रोखून पाहिले की त्याचे डोळे दुखू लागले. त्याने डोळ्यांची उघडझाप केली, त्यांना हाताने चोळले व परत पाहिले. त्याच्या अगदी समोरच पैलतीरावर आल्डरची पाने हलली, विलग झाली आणि तांबूस दाढीच्या खुंटांनी झाकलेला एक तरुण चेहरा त्या विलग जागेतून बाहेर डोकावला.

मागे न वळता वास्कोवने आपला हात मागे नेला, कोमेल्कोवाचा वाटोळा गुडघा त्याच्या हाती सापडला व त्याने तो आवळला.

कोमेल्कोवा कुजबुजली: "मला तो दिसतोय."

आणखी खालच्या तीराला त्याला दुसरा एक जर्मन ओझरता दिसला. पडशा बाजूला ठेवून, हातात सबमशिनगन जय्यत तयार राखून, ते दोघे किनाऱ्याकडे येत होते. अजूनही आरोळ्यांनी घुमणाऱ्या विरुद्ध किनाऱ्यावरून त्यांनी डोळे फिरवले.

वास्कोवचे काळीज लकाकले. ही टेहळणी तुकडी होती!

म्हणजे याचा एकमेव अर्थ होता की, जंगल तपासायचे, लाकूडतोड्यांची संख्या मोजायची आणि त्यांच्यातून वाट काढून जायचे, असे जर्मनांनी ठरवले होते. म्हणजे सगळा सत्यानाश घडणार होता–एवढी प्रदीर्घ योजना, त्यांचे ओरडणे, धुमसणाऱ्या शेकोट्या आणि तोडलेली झाडे–सगळे वाया जाणार होते. जर्मन घाबरले नव्हते. ते पाण्याचा प्रवाह ओलांडणार होते, झुडूपांमधून सटकणार होते; मुलींच्या आवाजांनुसार, शेकोट्यांनुसार आणि गोंगाटानुसार लपतछपत, सरपटत जाणार होते. मग एका हाताच्या बोटांवर त्यांनी त्यांना मोजले असते... अंदाज करणार होते... आणि त्यांचा माग लागल्याचे त्यांच्या ध्यानात येणार होते...

एकही फांदी हलणार नाही अशा बेताने वास्कोवने सावकाशपणे, हलकेच आपले पिस्तूल बाहेर काढले. हे दोघे प्रवाह ओलांडत असताना, अधिक जवळ यायच्या आतच त्यांचा निकाल लावायचा त्याने निर्णय घेतला होता. अर्थात इतरांनी सबमशिनगनांच्या साह्याने नंतर त्याची चाळण उडवली असती, पण तोवर आपल्या पोरी पळू शकतील, अथवा लपून बसू शकतील, अशी त्याला आशा वाटत होती. फक्त कोमेल्कोवाला तेथून हुसकून लावणे आवश्यक होते...

त्याने मागे वळून पाहिले. त्याच्या पाठीशीच कोमेल्कोवा खाली वाकली होती, स्वतःचा कुडता घाईघाईने अंगातून खेचून काढत होती. तिने कुडता जमिनीवर फेकला व लपण्याचा प्रयत्न न करता उडी मारून ती उभी झाली.

"थांब! .." सार्जंट-मेजरने दबत्या आवाजात आज्ञा केली.

"राया, वेरा, या ग सगळ्या पोहायला! .." कोमेल्कोवाने खणखणीत आवाजात साद घातली व झुडूपे बाजूला सारत

ती पाण्याच्या दिशेने निघाली. काय करत आहोत ह्याचे भान न राहून वास्कोवने तिचा कुडता उचलला आणि छातीशी गच्च दाबून धरला. दरम्यान ती सुंदर आकृती सूर्यप्रकाशित नदीच्या गोटयांनी भरलेल्या तीरापर्यंत पोहोचली होती.

शेवाळी आकृती जेथे अदृश्य झाल्या होत्या, तेथे समोरच्या तीरावर झुडूपे हेलकावत होती. झेन्याने सावकाशपणे स्वत:चा स्कर्ट काढून टाकला, अंतर्वस्त्र उतरवून टाकले आणि काळी चड्डी हातांनी सारखी करत अचानक टिपेच्या आवाजात गाणे गायला आरंभ केला:

आला बहर सफरचंदाला नि नासपातीला
धुक्यानं घातला विळखा नदीला...

त्या क्षणी ती किती मोहक दिसत होती! तिचा उंच, सडपातळ, शुभ्रकांती देह सबमशिनगनांपासून अवघ्या दहा मीटर अंतरावर उभा होता. गाणे अर्धवट थांबवून तिने पाण्यात पाय घातले व उडचा मारत, पाणी उडवत ती आनंदाचे चीत्कार काढू लागली. तिच्या रेखीव, उबदार देहावरून निथळणारे पाण्याचे थेंब उन्हात चमकत होते. दरम्यान, कोणत्याही क्षणी गोळयांची फैर उडणार अशा धास्तीने श्वास रोधून सार्जंट-मेजर वाट पहात होता. आत्ता फैर उडणार, तिच्या देहाची चाळण उडणार, ती एक गटांगळी खाणार, तिचे हात एकदम पसरणार आणि...

झुडूपे गप्प होती.

"ए पोरींनो, पोहायला या ग! .." पाण्यात नाचत कोमेल्कोवाने आनंदी आवाजात आरोळी ठोकली. "आणि इवानलाही बोलवा! ए इवान... तू कुठं आहेस? .."

वास्कोवने तिचा कुडता खाली टाकला, पिस्तूल चामडी आवरणात खुपसले आणि अंग चोरत तो झाडीत धावला. पाईनच्या एका झाडावर त्याने जोरात कुऱ्हाडीचा घाव घातला. "हे, ऐकलं का, मी आलोच!" तो ओरडला व त्याने कुऱ्हाड आणखी एकदा झाडावर आदळली. "आम्ही आलोच! जरा थांब! ऐकलं का...!"

सबंध जन्मात एवढ्या वेगाने त्याने कधीही झाडे पाडली नव्हती. असे बळ आपल्या अंगी कोठून आले ह्याचे त्याला स्वतःलाच आश्चर्य वाटत होते. त्याने खांद्याने रेटा देऊन पाईनच्या एका झाडाला फरच्या काही वाळक्या झाडांवर आडवे पाडले. त्याचा खूप मोठा आवाज झाला. धापा टाकतच परत तो आपल्या पूर्वीच्या लपण्याच्या जागी धावला व त्याने डोकावून पाहिले.

कोमेल्कोवा आता किनाऱ्यावर परतली होती व त्याच्या आणि जर्मनांच्या दरम्यान तिरपी उभी होती. तिने शांतपणे डोक्यावरून तलम अंतर्वस्त्र अंगात घातले. रेशीम तिच्या देहाला चिकटले. सूर्याच्या तिरप्या किरणांमधून ओले, पारदर्शी शरीर दिसत होते. अर्थात स्वतःच्या देखण्या रूपाची तिला चांगली जाणीव होती. म्हणूनच ती संथपणे सगळ्या हालचाली करत होती. चपळपणे तिने आपल्या केसांना खांद्यावर मोकळे सोडले. पुन्हा एकदा भयानक धास्तीने वास्कोवला घेरले. झुडूपांमागून आता आगीचा वर्षाव होणार व ह्या चमकत्या तरुण देहाची चाळण करणार असे त्याला सतत वाटत होते.

स्वतःच्या शुभ्र कांतीचे ओझरते दर्शन घडवून कोमेल्कोवाने रेशमी अंतर्वस्त्राखालून ओली चड्डी काढून टाकली, तिच्यातले पाणी पिळून काढले आणि जवळच्या खडकावर तिला वाळत

टाकले. ती खाली बसली, तिने पाय पसरले आणि पार जमिनीपर्यंत लोळणाऱ्या आपल्या केसांना ती उन्हात वाळवू लागली.

समोरचा तीर गप्प होता आणि गप्पच राहिला. एकही झुडूप हलले नाही. वास्कोवने खूप रोखून पाहिले, पण जर्मन तेथे होते अथवा नव्हते हे त्याला समजू शकले नाही. कोडे सोडवत बसायला सवड नव्हती. त्याने भर्रदिशी अंगातला कुडता काढला, विजारीच्या खिशात पिस्तूल कोंबले आणि जोराने फांद्या तुडवीत तो किनाऱ्याकडे धावला: "ए, तू कुठे आहेस?"

आनंदाने ओरडण्याची त्याची इच्छा होती, पण जमले नाही. घशात काहीतरी अडकल्याचा त्याला भास झाला. आता तो थेट उघडयावर आला होता. भीतीपायी त्याच्या फासळ्या मोडून काळीज बाहेर फुटते काय, असे त्याला वाटत होते. कोमेल्कोवापाशी चालत येत तो म्हणाला: "आत्ताच त्यांचा शहरातून फोन आला होता, कोणत्याही क्षणाला इथं लॉरी येईल, तेव्हा तुझं ऊन खाणं पुरे झालं. झटपट कपडे घाल."

देखाव्यासाठी तो हे शब्द ओरडला, पण तिचे उत्तर त्याने मुळीच ऐकले नाही. झुडूपात दडलेल्या जर्मनांच्या अस्तित्वाच्या जाणीवेने त्याच्या नसा पराकोटीच्या ताणलेल्या होत्या. त्याच्या संवेदना एवढया तरल बनल्या होत्या की, एका पानाची जरी किंचित हालचाल घडली असती, तरी तात्काळ त्याने खडकापाठी उडी मारली असती व पिस्तूल काढले असते. पण काहीही हालचाल झाली नाही.

कोमेल्कोवाने त्याचा हात खेचून त्याला स्वत:शेजारी बसवले. अचानक त्याच्या ध्यानात आले की, तिच्या मुद्रेवर स्मित

असले, तरी डोळ्यांमध्ये भीती दाटली होती. पाऱ्याप्रमाणे ती भीती जिवंत आणि दाट होती.

"कोमेल्कोवा, इथून जा," स्मित करण्याचा आटोकाट प्रयत्न करत वास्कोव म्हणाला.

ती अजूनही बोलत होती, हसतसुद्धा होती, पण वास्कोवला काहीही ऐकू येत नव्हते. झुडूपांमध्ये तिला तात्काळ घेऊन जायला हवे होते, कोणत्याही क्षणी जर्मन तिला ठार मारतील अशी त्याला भीती वाटत होती. पण जर्मनांना फसवण्यासाठी काहीतरी बहाणा करणे आवश्यक होते.

"ठीक आहे, मी तुला बऱ्या बोलानं सांगतो तरी तू ऐकत नसलीस, तर बाकीच्या पोरांना मी तुझं आत्ताचं दर्शन घडवतो!" अचानक तो ओरडला व खडकावरचे तिचे कपडे त्याने पटकन उचलले. "पकड मला!"

अपेक्षेनुसार कोमेल्कोवाने एक नाजुक चीत्कार काढला व उडी मारून ती त्याचा पाठलाग करू लागली. प्रथम तिला हुलकावण्या देत वास्कोव किनाऱ्यालगत धावला आणि मग झुडूपात घुसून जेथे दाट झाडी सुरू होत होती, तेथे थांबला.

"घाल कपडे! आणि विस्तवाशी खेळणं पुरे! पुरे!! .."

तिच्याकडे न पाहता त्याने तिच्या हाती तिचा स्कर्ट दिला. कोमेल्कोवाने तो घेतला नाही आणि त्याचा हात अधांतरी राहिला. शिव्या हासडण्याची त्याला जबर इच्छा झाली, पण त्याने मागे वळून पाहिले तेव्हा हातांमध्ये तोंड लपवलेली प्रायव्हेट कोमेल्कोवा जमिनीवर ओणवी बसलेली त्याला आढळली. तिच्या अंतर्वस्त्राच्या अरुंद पट्ट्यांखालील तिचे गोलाकार खांदे गदगदत होते...

नंतर मात्र त्या सगळ्या खूप हसल्या. नंतर—जर्मनांनी

प्रत्यक्षात माघार घेतली होती हे त्यांना समजले तेव्हा. ओरडून ओरडून स्वतःचा घसा बसवून घेणाऱ्या ओस्यानीनाला त्या हसल्या, स्कर्टला आगीमुळे भोक पाडून घेतलेल्या गूर्विचला हसल्या, काजळीने माखून घेतलेल्या चेत्वेर्ताकला आणि जर्मनांना चकवणाऱ्या कोमेल्कोवाला त्या हसल्या व खुद्द सार्जंट-मेजर वास्कोवलाही त्या हसल्या. डोळ्यांमधून पाणी वाहीपर्यंत त्या हसल्या, हसून हसून दमल्या आणि तोसुद्धा आपण सार्जंट-मेजर आहोत हे क्षणभर विसरून हसला. त्यांनी जर्मनांना चांगलेच चकवले होते, तसे करताना खूप धाडस दाखवले होते, आता जर्मन खूप घाबरले होते व लेगोन्तोवो सरोवराला वळसा घालून जाण्यासाठी आता त्यांना आणखी चोवीस तास जादा पायपीट करावी लागणार होती ह्याची त्याला आठवण होताच वास्कोव उद्गारला:

"बरं, आता पुरे! पोरींनो आता बास्स! इथून पुढं त्यांची सुटका नाही – अर्थात ब्रीच्कीना वेळेवर पळत गेली तर!"

"काळजी करू नका, ती नक्की जाईल," घोगऱ्या आवाजात ओस्यानीना म्हणाली. तिचा आवाज एवढा चमत्कारिक वाटत होता की, प्रत्येकजण परत हसू लागली. "ती पळण्यात पटाईत आहे."

"तसं असेल तर, हा प्रसंग एकेक छोटा घुटका मारून साजरा करू या," जपून ठेवलेला शिसा बाहेर काढत वास्कोव म्हणाला. "तिच्या चपळ पायांसाठी आणि पोरींनो, तुमच्या चतुर डोक्यांसाठी!"

झटपट सगळेजण कामाला लागले. दगडावर त्यांनी रुमाल अंथरला, पावाचे व डुकराच्या खारवलेल्या चरबीचे तुकडे

केले, मासे साफ केले. आणि बायकांची कामे करण्यात त्या गुंतल्या होत्या तोवर सार्जंट-मेजर पुरुषाला शोभेशा रीतीने थोड्या दूर अंतरावर बसून सिगारेट ओढत होता, त्याला त्या जेवायला केव्हा बोलावतात ह्याची वाट पहात होता आणि थकल्या मनाने स्वत:ला समजावत होता की सर्वांत मोठे संकट आता टळून गेले होते...

७

लीझा ब्रीच्कीना स्वतःची सगळी १९ वर्षे उद्याची अपेक्षा बाळगून जगली होती. प्रत्येक सकाळी ती अत्यंत आतुरतेने अमाप सुखाच्या आगमनाची वाट पहायची, पण तात्काळ तिच्या आईचा दमछाक करणारा खोकला मध्येच अडथळा आणायचा व सुखाशी होणारी गाठभेट दुसऱ्या दिवसापर्यंत लांबणीवर पडायची. तिच्या अपेक्षा त्या खोकल्याने नष्ट केल्या नव्हत्या, रद्द केल्या नव्हत्या – फक्त लांबणीवर टाकल्या होत्या.

"आई फार दिवस जगणार नाही," वडिलांनी कठोरपणे लीझाला इषारा दिला होता.

पाच वर्षे, प्रत्येक दिवशी, ह्या शब्दांनी त्यांनी तिचे स्वागत केले होते. लीझा घराभोवतालच्या आवारात जायची व डुकराला, मेंढ्यांना आणि म्हाताऱ्या घोड्याला खाऊ घालायची. तो घोडा तिच्या वडिलांना कामासाठी देण्यात आला होता. मग ती आईला स्वच्छ करायची, कपडे घालायची व जेवण भरवायची. ती दुपारचे जेवण शिजवायची, घर साफ करायची व सर्वांत जवळच्या खेड्यातील दुकानातून पाव घेऊन यायची. वडिलांच्या जंगल खात्यातील विभागांची तपासणी करण्याचे कामही ती करायची. इतर मुलींनी, तिच्या मैत्रि-

णींनी, शाळा पूर्ण केली होती. त्यांच्यापैकी काहीजणी इतरत्र कुठेतरी पुढे शिकत होत्या, काहींचे विवाह झाले होते, पण लीझा मात्र खाऊ घालणे, धुणे, घासणे आणि पुन्हा खाऊ घालणे ह्या चक्रात गुंतली होती. स्वतःच्या तेजस्वी उद्याची वाट पहात होती.

ही तेजस्वी उद्या तिच्या आईच्या मृत्यूशी कधीही निगडित नव्हती. एव्हाना तिला तिची निकोप आई आठवतच नव्हती. शिवाय लीझामध्ये एवढे विलक्षण चैतन्य खेळत होते की, मृत्यूच्या विचाराला तिच्या मनात थाराच नव्हता.

तिचे वडील जरी तिला सातत्याने दुःखद मृत्यूची आठवण करून देत होते, तरी त्या कल्पनेचा लीझाला स्पर्श घडत नव्हता. उलट जीवनाची संकल्पना तिला वास्तव आणि ठळक जाणवायची. जीवन कुठेतरी वैभवशाली उद्यामध्ये सामावलेले होते आणि जरी ह्या जीवनाने अद्यापपर्यंत जंगल-विभागाला टाळले होते, येथून कोठेतरी कित्येक मैल अंतरावर ते दूर होते, तरी लीझाची खात्री होती की जगण्यायोग्य जीवन अस्तित्वात आहे, त्या जीवनात तिचा वाटा आहे, तो वाटा तिच्या हातून सुटण्याची शक्यता नाही. त्याचप्रमाणे तिची उद्या तिच्या हातून हुकणार नाही. आणि वाट बघण्याचे तंत्र लीझाला अवगत होते.

वयाच्या चौदाव्या वर्षापासून वाट पाहण्याची ही बायकांची महान कला ती आत्मसात करत होती. आईच्या आजारपणापायी शाळा सोडावी लागल्यानंतर, परत वर्गात केव्हा बसू ह्याची तिने प्रथम वाट पाहिली होती; मग आपल्या मैत्रिणींच्या भेटीची तिने वाट पाहिली होती; त्यानंतर, क्लबासमोरच्या हिरवळीवर तिला घालवता येणाऱ्या, क्वचित लाभणाऱ्या

मोकळ्या संध्याकाळींची वाट पाहिली होती आणि नंतर...

नंतर अचानक असे आढळले की, वाट पाहण्यासारखे काही उरलेच नव्हते. तिच्या मैत्रिणी अद्याप शिकत होत्या अथवा एव्हाना नोकऱ्या करत होत्या. आता त्या तिच्यापासून खूप दूरवर रहात होत्या, स्वतःच्या उद्योगांमध्ये पूर्णतया गुंतल्या होत्या. त्यांच्या त्या उद्योगांमध्ये आपणही सहभागी आहोत असे इतःपर तिला वाटत नव्हते. क्लबात ज्या मुलांबरोबर पूर्वी वेळ घालवणे आणि सिनेमाच्या खेळापूर्वी थट्टामस्करी करणे तिला सहज-सोपे वाटत होते, ती मुले आता वेगळी भासत होती, तिच्यापासून परकी बनली होती व तिची टवाळी करत होती. लीझा आता त्यांची संगत टाळू लागली होती, त्यांच्या हजेरीत गप्प रहात होती, त्यांच्या आनंदी घोळक्या-पासून दूर राहण्याचा प्रयत्न करत होती. नंतर तर तिने क्लबात जाणेच बंद केले.

तिचे बालपण संपले आणि त्याचबरोबर तिच्या जुन्या मैत्रीही संपल्या. आता तिला कुणीही स्नेही उरले नव्हते, कारण तिच्या घरातल्या तेलाच्या दिव्याच्या उजेडापायी जंगलखात्यातल्या अट्टल माणसांशिवाय दुसरे कुणीही इतःपर आकर्षित होत नव्हते. लीझा दुःखी-कष्टी बनली होती, घाबरली होती, कारण तिच्या बालपणाच्या जागी काय येणार होते ह्याची तिला कल्पना नव्हती, गोंधळाच्या आणि कसल्यातरी अज्ञात हुरहुरीच्या भावनेतच लीझाने हिवाळा घालवला व वसंतामध्ये तिचे वडील एका शिकाऱ्याला सांगाती घेऊन आले.

"आपल्याबरोबर रहायची त्याची इच्छा आहे," वडील आपल्या मुलीला म्हणाले. "पण आपण त्याला ठेवणार कुठं? आई तर मरणाच्या पंथाला लागलीय."

"गवताच्या पडवीत?" पाहुण्याने सुचवले.

"अजून थंडी आहे," लीझा भीत भीत म्हणाली.

"बकरीच्या कातडीचा कोट द्याल?.."

वडील आणि पाहुणा बराच वेळपर्यंत स्वयंपाकघरात वोदका पीत बसले. फळीच्या आडोशाच्या दुसऱ्या बाजूला आई खोकल्याने हैराण झाली होती. लीझाने पळत जाऊन कोठीच्या खोलीतून खारवलेला कोबी आणला. तिने अंडी तळून दिली व पुरुषांच्या गप्पा ती ऐकत बसली.

तिचे वडीलच बहुतेक वेळ बोलत होते. वोदकाचे प्याल्या-मागून प्याले ते घशात रिचवत होते, बोटांनी खारवलेला कोबी उचलत होते व स्वतःच्या दाढीभरल्या तोंडात कोंबत होते. आणि तोंडात बकाणा भरलेला असताना ते सतत बोलत होते: "पोरा, जरा थांब, एवढी घाई करू नको. आयुष्य जंगलासारखं आहे, छाटावं लागतं, स्वच्छ करावं लागतं, तणापासून मुक्त ठेवावं लागतं ना? जरा थांब. खूप सुकलेली, आजारी झाडं आहेत, खुरटी झुडूपं आहेत, होय ना?"

"स्वच्छ केलं पाहिजे हे खरं," पाहुण्याने दुजोरा दिला. "छाटायला नको, फक्त तण काढून टाकलं पाहिजे – तणाची दयामाया ठेवायची नाही."

"अगदी बरोबर," लीझाचे वडील म्हणाले. "मान्य आहे. पण घाई नको. आम्हा जंगलच्या अधिकाऱ्यांना जंगलाचं काय करायचं ते माहीत असतं. जंगलशी संबंधित प्रत्येक गोष्ट दिवसाच्या उजेडासारखी स्पष्ट समजते. पण जीवनाशी संबंधित? काहीतरी उबदार आणि श्वासोच्छ्वास करणारी, फिरणारी आणि ओरडणारी?"

"उदाहरणार्थ, लांडगा..."

"लांडगा?" वडील संतापले. "लांडग्यानं तुझं काय वाकडं केलंय? लांडग्यांविरुद्ध तुझा आकस का? सांग?"

"कारण त्याला सुळे आहेत," शिकारी स्मित करत म्हणाला.

"तो लांडगा म्हणून जन्मला हा त्याचा दोष काय? त्याला दोषी ठरवायचं? नाही पोरा, आपणच त्या लांडग्यांना बदनाम करतो. आणि त्यांच्याशी ह्याबाबत सल्ला-मसलत न करताच आपण हे केलंय. न्याय्य आहे का असं वागणं?"

"हे बघ, पेत्रोविच, लांडगा आणि न्याय ह्या दोन अगदी वेगळ्या गोष्टी आहेत. त्यांची तुलनाच होऊ शकत नाही."

"तुलना होऊ शकत नाही?.. मग लांडगा आणि ससा ह्यांचं काय–त्यांची तुलना होते? दात विचकू नकोस. लांडगे माणसांचे शत्रू आहेत असं मानायला आपल्याला शिकवण्यात आलंय–तसा हुकूम आहे. म्हणून आपण उठलोय आणि सर्व लांडगे ठार मारतोय, सगळ्या रशियाभरचे. अगदी एकूण एक. ह्यातून निष्पत्ती काय निघणार?"

"निष्पत्ती?" शिकारी स्मित करत म्हणाला. "आपल्याला भरपूर शिकार मिळेल."

"अगदी चूक!" वडील गरजले आणि केसाळ मूठ त्यांनी दाणदिशी मेजावर आदळली. "मी सांगतो तुला, आपल्याला अजिबात शिकार मिळणार नाही! आपण ज्यांची शिकार करतो ते सगळे प्राणी निकोप धावते राखणं आवश्यक आहे. पोरा, धावते, तू ऐकलंस? आणि त्यांना धावतं राखण्यासाठी त्यांना भेदरवून टाकलं पाहिजे, कोणत्याही क्षणी त्यांचा फन्ना उडेल अशी त्यांना भीती वाटली पाहिजे. अर्थात, आयुष्य फक्त एकाच रंगात रंगवता येत नाही. तसं शक्य आहे. पण आपण तसं करायचं? कशासाठी–संघर्षाविना त्याला बनवण्या-

साठी? मग काय राहणार आपल्यापाशी? लठ्ठ आणि आळशी ससे! लांडग्यांच्या गैरहजेरीत स्वतःच्या कर्तव्याकडे दुर्लक्ष करणारे! मग काय? त्यांना सडपातळ राखण्यासाठी आपण लांडग्यांची नवी पिढी निर्माण करणार अथवा परदेशातून काही आयात करणार?"

"तुला कधी कुलक म्हणून तर कुणी मानलं नाही ना, इवान पेत्रोविच?" पाहुण्याने अचानक शांतपणे विचारले.

"मी आणि कुलक?" जंगल अधिकाऱ्याने सुस्कारा टाकला. "काय मालमत्ता आहे माझ्यापाशी? माझे हे दोन कुलक [ रशियनमध्ये कुलक शब्दाचे दोन अर्थ आहेत: श्रीमंत जमीनदार आणि मूठ—अनु. ], माझी बायको आणि मुलगी. मला कुलक म्हणणं फायद्याचं नाही त्यांच्या!"

"त्यांच्या?"

"ठीक आहे—आमच्या!.." वडिलांनी प्याल्यांमध्ये आणखी वोदका ओतली व पाहुण्याच्या प्याल्याशी आपला प्याला टकरावला. "भल्या माणसा, मी काही लांडगा नव्हे, मी एक ससा आहे." प्याल्यात जे काही उरले होते ते त्यांनी एका घोटात संपवले. वेड्यावाकड्या रीतीने, एखाद्या अस्वलाप्रमाणे ते उठले. जाताना दारात थांबून ते म्हणाले: "मी झोपतो. माझी मुलगी तुला रस्ता दाखवील."

लीझा मुकाटपणे कोपऱ्यात बसून होती. शिकारी शहरचा माणूस होता, तरुण होता. त्याचे शुभ्र दात बळकट होते आणि काहीसा व्यग्र होता. भारावून ती त्याला पहात होती. मात्र जेव्हा जेव्हा तो तिच्याकडे पहायचा, तेव्हा तेव्हा स्वतःची नजर दुसरीकडे वळवण्याची काळजी ती घेत होती. त्याच्या डोळ्यांना डोळे भिडवण्यास ती भीत होती. तो काहीतरी

बोलेल आणि तिला उत्तर देणे कठीण जाईल, अथवा ती मूर्खासारखे काहीतरी बोलेल, अशी तिला भीती वाटत होती.

"तुमचे वडील फार बेसावध बोलतात."

"ते लाल पार्तिझान* होते," ती घाईघाईने उत्तरली.

"हे आम्हाला ठाऊक आहे," माणसाने स्मित केले व तो उठला. "माझी झोपायची जागा दाखवा, लीझा."

कोठारात तळघराप्रमाणे अंधार होता. लीझा दारात किंचित घुटमळली. मग पाहुण्याच्या हातातील अवजड मेंढकातडी कोट व गुठळ्यांची उशी घेत ती म्हणाली: "थांबा इथं."

डगमगत्या शिडीवरून ती गवताच्या गंजीवर चढली, भोवतालचे गवत चाळवून तिने उशी खाली फेकली. आता शिडीवरून खाली उतरून ती पाहुण्याला हाक मारू शकली असती. पण त्याऐवजी गुडघ्यांवर रांगत तिने अंधारातच गेल्या वर्षीचे मऊ गवत अधिक आरामशीर रीतीने रचले. हा सारा वेळ तिचे कान टवकारलेले होते. त्याच्या पावलांखाली शिडी करकर वाजलेली ऐकायची तिची इच्छा होती, त्या अंधारातील घाईघाईची वेडीवाकडी जवळीक तिला हवीशी वाटत होती; त्याचा श्वास, त्याचा अस्पष्ट उद्‌गार, त्याचा रांगडा स्पर्श अनुभवण्याची तिची इच्छा होती. पण कोणत्याही परिस्थितीत ह्याची स्वतःशी कबुली द्यायला ती तयार नव्हती. तिच्या मनात पापी विचार नव्हते. फक्त तिची इच्छा होती की, तिच्या काळजाची जास्तीत जास्त जोराने धडधड व्हावी, काहीतरी अस्पष्ट, गरम आणि जळत्या अशा कशाचीतरी जाणीव व्हावी, क्षणात खुणावणारे आणि क्षणात नाहीसे

---

*पार्तिझान – गनिमी सैनिक – अनु.

होणारे असे काहीतरी अनुभवावे. पण शिडीचा करकर आवाज आला नाही आणि लीझा खाली गेली. पाहुणा दारात धूम्रपान करत होता. त्याने गवताच्या कोठारात मुळीच धूम्रपान करू नये, असे तिने तुटकपणे त्याला सांगितले.

"मला माहीत आहे," तो म्हणाला आणि सिगारेटचे थोटूक त्याने बुटाखाली चिरडले. "शुभरात्री!"

तो झोपायला गेला आणि लीझा भांडी धुवायला घराकडे धावली. प्रत्येक बशी ती नेहमीपेक्षा अधिक काळजीपूर्वक आणि खूप सावकाशपणे स्वच्छ करत होती. तो सारा वेळ तिच्या मनात धास्तावली आशा धुगधुगत होती की, तो पुरुष तिच्या खिडकीवर टकटक वाजवील. पण परत एकदा तिचा अपेक्षाभंग झाला. लीझाने दिवा मालवला व अंथरुणावर अंग टाकले. आईचा परिचित खोकला ती ऐकत राहिली. तिच्या वडिलांनी आज जरा जास्त घुटका मारल्यामुळे ते जोरजोरात घोरत होते.

पाहुणा रोज सकाळी गुडुप व्हायचा आणि रात्री खूप उशीरा भुकेला व थकला-भागला यायचा. लीझा त्याला खाऊ घालायची. तो घाईघाईने खाई, पण त्यात आधाशीपणा नसे. लीझाला हे आवडले होते. जेवणानंतर पाहुणा ताबडतोब गवताच्या गंजीकडे निघून जाई, तर लीझा घरातच थांबून राही, कारण त्याचा बिछाना तिने बनवून देण्याची इतःपर गरज नव्हती.

"तुम्ही शिकारीहून परतताना बरोबर काहीच कसं आणत नाही?" एकदा तिने धीर एकवटून त्याला विचारले.

"नशीब नाही," त्याने स्मित केले.

"तुम्ही हडकला आहात," त्याच्याकडे न पाहता ती पुढे म्हणाली. "ह्याला तुम्ही सुटी म्हणता?"

"लीझा, माझी सुटी फार छान चालली आहे," पाहुणा उसासा टाकत म्हणाला. "दुर्दैवाने ती संपत आलीय. उद्या मी जातोय."

"उद्या? .." कमालीच्या निराश आवाजात लीझाने पुनरुच्चार केला.

"होय, सकाळी. आणि एकही शिकार न करता मी चाललोय. गंमत आहे की नाही?"

"होय, गंमतच आहे," खिन्नपणे ती म्हणाली.

त्यांचे एवढेच बोलणे झाले. पण ज्या क्षणी तो घरातून बाहेर पडला, त्याच क्षणी लीझाने झटपट स्वयंपाकघरातील पसारा आवरला व ती आवारात सटकली. बराच वेळपर्यंत ती गवताच्या पडवीभोवती घिरट्या मारत राहिली. तो माणूस उसासत होता व घसा खाकरत होता. तिने नखे चावली व पडवीचा दरवाजा पटकन आणि गुपचूपपणे उघडला. जणू आपले मन बदलेल अशी तिला भीती वाटली होती. शिडी चढून ती वर गेली.

"कोण आहे?" त्याने शांतपणे विचारले.

"मी," लीझा उत्तरली. "तुमचा बिछाना घालून देऊ? .."

"नको," तो तुटकपणे म्हणाला. "झोपायला जा."

लीझा गप्प होती. गवताच्या गंजीमधील घुसमटणाऱ्या अंधारात त्याच्या अगदी शेजारी बसून होती. आपला श्वास रोधून धरण्याचा ती प्रयत्न करत होती, पण त्याला तिचा धपापता ऊर ऐकू येत होता.

"काय, कंटाळा येतो?"

"होय," जेमतेम ऐकू जाईल अशा स्वरात ती उत्तरली.

"तरीसुद्धा मूर्खपणानं वागू नये."

तो स्मित करत होता असे लीझाला जाणवले. तिला स्वत:चा तिटकारा आला, स्वत:वर आणि त्याच्यावर ती चिडली होती. ती तशीच बसून राहिली. तेथे ती का आली होती हे जसे ती सांगू शकली नसती, त्याचप्रमाणे तेथे ती का थांबून होती, ह्याचा खुलासा करणे तिला जमले नसते. सबंध आयुष्यभर तिला एकलेपणा जाणवला होता, फार क्वचित कधी ती रडली होती, एकाकीपणाची तिला सवय झाली होती, पण ह्या क्षणाला तिला सर्वाधिक गरज होती कुणाच्यातरी सहानुभूतीची. प्रेमळ शब्द ऐकावे, कुणीतरी आपल्या केसांवरून प्रेमाने हलकेच हात फिरवावा, कुणीतरी सांत्वन करावे, असे तिला तीव्रतेने वाटत होते. तिने स्वत:शी खचितच कबूल केले नसते—पण तिचे कुणीतरी चुंबन घ्यावे असे तिला फार फार वाटत होते. पण हे ती कसे कबूल करणार? —शेवटच्या वेळी तिचे चुंबन घेतले गेले होते पाच वर्षांपूर्वी. तिच्या आईकडून. आणि आता तिला चुंबन हवे होते त्या अद्भुत उद्याची ग्वाही मिळावी म्हणून. ज्याच्यासाठी ती जगत होती.

"झोपायला जा," तो म्हणाला. "मी दमलोय. मला सकाळी लौकर निघायचंय."

त्याने जांभई दिली. ज्याला तिची फिकीर नव्हती अशा माणसाची प्रदीर्घ आणि आवाज करणारी जांभई. ओठ चावत लीझा झपझप शिडी उतरली. तिचा गुडघा आपटला आणि तिच्या मस्तकापर्यंत कळ गेली. पण तरीही ती तशीच आवाराकडे धावली. जाताना तिने धाडदिशी दरवाजा आपटला.

दीमोक घोड्याला वडील गाडीला जुंपत असल्याचा आवाज लीझाने सकाळी ऐकला. पाहुणा तिच्या आईचा निरोप घेत

असल्याचे तिने ऐकले. फाटकाची करकर तिने ऐकली. पण ती झोपेचे सोंग करून बिछान्यात पडून राहिली. तिच्या बंद पापण्यांआडून आसवांच्या धारा मंदपणे झिरपत होत्या.

दुपारच्या जेवणाच्या वेळी वडील जरासे झिंगूनच आले. टोपीमधून त्यांनी साखरेचे काही निळसर खडे मेजावर ओतले. त्यांचा खडखड आवाज झाला. ते म्हणाले: "आपला पाहुणा — फार मोठा माणूस आहे! आपल्याला साखर द्यावी असा त्यानं हुकूम केला. आणि आपल्याला तर गेल्या वर्षभरात साखरेचं दर्शन घडलेलं नाही. चक्क तीन किलो साखर मिळाली! .."

मग ते गप्प बसले, बराच वेळपर्यंत खिसे चाचपत राहिले आणि शेवटी तंबाखूच्या बटव्यामधून एक चुरगळलेला कागद बाहेर काढत म्हणाले:

"घे!"

"लीझा, तू शिकले पाहिजे. असे जंगलातच राहिलीस तर रानटी बनशील. ऑगस्टमध्ये इकडे ये आणि तंत्रविद्यालयात तुला प्रवेश मिळवून द्यायला मी मदत करीन. वसतीगृहात तुझी सोय लावून देईन."

चिठ्ठीखाली सही व पत्ता होता. बाकी काहीही नव्हते. साधा नमस्कारसुद्धा.

एक महिन्यानंतर तिची आई वारली. बहुतेक वेळ घुमे आणि उदास असणारे तिचे वडील आता खरेच तापट बनले व अखंड मद्यपान करू लागले. लीझा पूर्वीप्रमाणेच अद्भुत उद्या उजाडण्याची वाट पहात होती, पण वडिलांच्या दारुड्या सोबत्यांपासून बचाव करण्यासाठी रात्रीच्या वेळी दाराची कडी लावून घेण्याची खबरदारी मात्र घेत होती. इत:पर तिची वैभवशाली उद्या ऑगस्ट महिन्याशी घट्टपणे निगडित होती.

भिंतीच्या दुसऱ्या बाजूकडून येणारे दारुडे आवाज ऐकता ऐकता लीझाने ती छोटी चिठ्ठी निदान हजारदा तरी पुनः-पुन्हा वाचली होती. एव्हाना चिठ्ठीचा कागद झिरझिरीत बनून फाटायला आला होता.

मग युद्ध पेटले आणि शहरात जाण्याऐवजी लीझा तटबंदीच्या कामात गुंतली. आख्खा उन्हाळाभर ती खंदक खणण्याच्या आणि रणगाडाविरोधी चर खणण्याच्या कामात अडकली होती. पण जर्मनांनी त्यांना शिताफीने टाळण्याची खबरदारी घेतली. इतरांबरोबर तीसुद्धा जर्मनांच्या वेढ्यात सापडली, पण मोठ्या शिताफीने निसटली आणि परत खंदक खणू लागली. हळू हळू ती पूर्वेकडे सरकत होती. शरदाच्या शेवटी शेवटी ती कुठेतरी वाल्दायच्या टेकड्यांपलिकडे होती. मग ती विमान-विरोधी तोफखान्यात दाखल झाली आणि म्हणून आता स्टेशन क्र. १७१ कडे ती धावत होती...

लीझाला वास्कोव पहिल्याच भेटीत आवडला होता. अद्याप पेंगुळल्या डोळ्यांची मिचमिच करत त्यांच्या रांगेसमोर उभे राहून स्वतःला सावरण्याचा प्रयत्न करणाऱ्या वास्कोवला तिने प्रथम पाहिले होते तेव्हाच. तो मोजकेच बोलणारा, कधीही घाई न करणारा माणूस होता. हे त्याचे उपजत गुण होते. होय, तो अस्सल शेतकरी कुळातील होता. बायकांना नेहमी आवडणारा पुरुषी रांगडेपणा आणि खात्रीशीरपणाही त्याच्या ठायी होता. कौटुंबिक सुखाची ग्वाही बायकांना त्यातून मिळत असते. पण सगळ्याच मुली कमांडंटची टवाळी करू लागल्या–तो सर्वांचा एक चाळाच बनला. लीझा त्यात भाग घेत नव्हती. पण सर्वज्ञानी कीर्यानोवाने जेव्हा हसत हसत सांगितले की, कमांडंट त्याच्या देखण्या घरमालकिणीच्या

सौंदर्यावर भाळला होता, तेव्हा लीझा अचानक लालेलाल बनली होती व उद्गारली होती : "खोटं आहे!"

"प्रेमात पडलीस काय त्याच्या?" कीर्यानोवा आनंदाने चीत्कारली होती. "पोरींनो, आपली ब्रीच्कीना प्रेमात कोसळलीय! सैन्याला तिचं काळीज शरण गेलंय!"

"बिच्चारी लीझा!" नाटकी उसासा टाकत गूर्विच म्हणाली.

एकच धमाल उडाली होती. सगळ्याजणी बडबडत होत्या व हसत होत्या. दरम्यान लीझाला रडू कोसळले आणि ती रानात पळाली. झाडाच्या खुंटाशी बसून ती आसवे ढाळत राहिली. शेवटी रीता ओस्यानीनाने तिला शोधून काढले.

"ए, बस्स झाला मूर्खपणा. असं अस्वस्थ नाही व्हायचं! आयुष्य येईल तसं घ्यावं, समजलीस?"

पण लीझाला ते जमले नव्हते. आत्यंतिक लाजाळूपणापायी तिच्या मनाचा कोंडमारा घडत होता, तर कमांडंट सतत आपल्या कामांमध्ये गुंतलेला होता. जर हा असा योगायोग आला नसता, तर त्या दोघांचे एकमेकांकडे सखोल लक्ष कधी गेलेच नसते. म्हणूनच, जणू पंख लावल्याप्रमाणे लीझा आत्ता रानातून धावत होती.

"नंतर आपण एकत्र गाणं गाऊ, लीझावेता," सार्जंट-मेजर म्हणाला होता. "आपण आपली कामगिरी पार पाडू आणि मग गाऊ..."

त्याच्या शब्दांना मनात घोळवताना लीझाने स्वत:शीच स्मित केले. वारंवार तिच्या अंतरंगात उमाळून येणाऱ्या त्या जबरदस्त, गूढ भावनेमुळे ती शरमली. तिची लज्जा अधून-मधून तिच्या गालांवर लालीच्या रूपाने उमटत होती. ह्याच

नादात ती पाईनचे झाड ओलांडून गेली; तिचा खुणेचा टप्पा पार करून गेली. जेव्हा ती दलदलीपाशी पोहोचली, तेव्हा कुठे तिला काठीची आठवण झाली. पण माघारी न फिरण्याचा तिने निर्णय घेतला. तेथे जमिनीवर अनेक पडलेली झाडे होती. तिने पटकन एक फांदी निवडली.

दलदल ओलांडायला आरंभ करण्यापूर्वी ती थबकली व तिने कानोसा घेतला. मग पटकन आपला स्कर्ट अंगापासून विलग केला व काठीच्या टोकाशी बांधला. तिने सदरा व पट्टा ठाकठीक केले, निळ्या तुमानीला वर खेचून घेतले आणि दलदलीत पाऊल टाकले.

ह्यावेळी चिखलातून वाट दाखविणारे कुणीही नव्हते.

ओला, चिकट गाळ तिच्या नितंबांना चिकटत होता, तिच्या पाठोपाठ फरफटत जात होता. लटपटत आणि धापा टाकत लीझा मुंग्रीच्या गतीने पुढे सरकत होती. बर्फाळ थंड पाण्यामुळे गोठली होती. छोटया बेटावरील पाईनच्या दोन खुंटांकडे तिचे डोळे रोखलेले होते.

पण ना चिखल, ना थंडी, ना पायांखालचा सजीव, श्वासोच्छ्वास करणारा गाळ तिला भेडसावत होता. तिला भयानक वाटत होती काळ्या, दुष्ट दलदलीवर रेंगाळणारी एकाकी, मरण:प्राय शांतता. लीझाला अक्षरश: प्राण्याच्या भीतीने घेरले होते. दर पावलागणिक ह्या भीतीची तिच्यावर अधिकच गच्च पकड बसत होती. ती अगतिकपणे आणि केविलवाणेपणे थरथर कापत होती. मागे वळून पाहण्याची, अनावश्यक हालचाल करण्याची अगर खोल श्वास घेण्याचीही तिची हिंमत होत नव्हती.

बेटापर्यंत ती कशी पोहोचली हे तिचे तिलाच आठवत

नव्हते. भक्कम जमिनीवर हाता-पायांनी रांगत गेली, कुजणाऱ्या गवतावर पालथी पडली व तिला रडू फुटले. ती हुंदके देत होती, स्वत:च्या गुबगुबीत गालांवरील आसवे पुसत होती; थंडीमुळे, एकटेपणामुळे आणि भयानक भीतीमुळे तिच्या देहाचा थरकाप उडाला होता.

ती उठून उभी राहिली तरी तिच्या डोळयांमधून आसवे ओघळणे थांबले नव्हते. नाकाने सुरसुर आवाज करत तिने ते छोटे बेट ओलांडले, पुढील मार्गाचा अंदाज घेतला व अजिबात विश्रांती न घेता, पुन्हा ताकद गोळा करण्याची तसदीही न घेता, तिने चिखलात पाय घातला.

आरंभी फार खोल नव्हते. त्यामुळे शांत होण्यास आणि आशावादी बनण्यास लीझाला थोडी सवड मिळाली. आता ती प्रवासाच्या शेवटच्या टप्प्यात होती आणि तो कितीही कठीण असला, तरी अखेरीस ती कोरडया, घट्ट जमिनीवर चालणार होती. तिला परिचित असलेल्या गवतांच्या आणि झाडांच्या भूमीवरून चालणार होती. आंघोळीबाबतचे विचार लीझाच्या मनात घोळू लागले. मनातल्या मनात तिने आठवणाऱ्या सर्व निर्झरांची उजळणी केली. एवढेच नव्हे तर आंघोळीबरोबरच आपले कपडे धुवून टाकावेत, अथवा स्टेशनवर पोहोचल्यानंतर ते काम उरकावे, याबाबत मनाशी तिने वाद घातला. कारण आता अंतर काही फार दूर नव्हते, सर्व वळणांसकट रस्ता तिला चांगला आठवत होता आणि आणखी तासा-दीडतासाच्या अवधीत ती आपल्या माणसांमध्ये असणार होती ह्याची तिला चांगली खात्री वाटत होती.

चालणे फारच अवघड बनले होते. गुडघाभर खोल पाणथळ चिखलातून ती वाट काढत होती. प्रत्येक पाऊल तिला पैलती-

राच्या अधिक जवळ नेत होते. त्यावेळी सार्जंट-मेजरने ज्या झाडाच्या खुंटापासून चिखलात झेप घेतली होती, त्या खुंटाची चीर न चीर आता तिला ठळकपणे दिसत होती. किती विचित्रपणे, गबाळेपणाने तो झेपावला होता—त्याचा जवळजवळ तोलच गेला होता.

परत एकदा वास्कोवविषयीचे विचार लीझाच्या मनात घोळू लागले. आता तिची मुद्रा हसरी बनली होती. कामगिरी पार पाडून कमांडंट स्टेशनवर परतला म्हणजे त्यांची गाणी-बजावणी झडणार होती, ह्याबद्दल तिची खात्री झाली होती. फक्त तिने जरा धूर्तपणाने वागायला हवे होते. संध्याकाळच्या वेळी त्याला एकट्यालाच संगती घेऊन रानात जायला हवे होते. मग... मग कोण जिंकणार ते स्पष्ट झाले असते—ती स्वत: अगर त्याची घरमालकीण. एकाच छपराखाली ती घरमालकीण व तो रहात होते, एवढी एकच जमेची बाजू त्या घरमालकिणीपाशी होती.

तिच्या अगदी पुढ्यातच तांबूस रंगाचा महाप्रचंड बुडबुडा फुस्स आवाज करत फुटला. हे एवढे अचानक, एवढे नजीक घडले, एवढ्या वेगाने तो फुगा वर येऊन फुटला, की किंचाळी फोडण्याआधीच लीझा स्वाभाविकपणे बाजूला सरकली. अवघे एकच पाऊल ती बाजूला सरकली होती, पण तिच्या पायाखालचा आधार एकदम निसटला. कुठल्यातरी अस्थिर पोकळीत आता ती अधांतरी तरंगत होती व रेंदाळ चिखलाने तिच्या मांड्यांना मऊ विळखा घातला. तिच्या मनाच्या कोपऱ्यात कुठेतरी वाढत जाणाऱ्या भीतीने आता तिचा पूर्ण कबजा घेतला. भीती तिच्या काळजावर झेपावू लागली. पायांना आधार मिळावा व वाट सापडावी म्हणून ती हातातील काठीवर

जोरात रेलली. कोरडे लाकूड काडकन तुटले आणि थंड, पातळ चिखलात लीझा तोंडावर उपडी पडली.

पायांखाली भक्कम भूमी नव्हती. तिचे पाय अत्यंत सावकाशपणे, भयानक सावकाशपणे खाली ओढले जात होते. तिचे हात अगतिकपणे चिखल मळत होते. त्या पातळ रेंदाळात ती धडपडत होती, तिचा जीव घुसमटत होता. वाट कुठेतरी जवळच होती; एक किंवा अर्धा पाऊल अंतरावर होती, पण आता अर्धा पाऊल पलिकडे जाणेही तिच्या कुवतीबाहेरचे ठरले होते.

"धावा! .. मदत करा! .. धावा! .."

भेदरलेला एकाकी आवाज घुमला आणि त्या उदासीन, बुडबुडे उमटणाऱ्या दलदलीवर बराच वेळपर्यंत त्याचा प्रतिध्वनी येत राहिला. पाईन वृक्षांच्या शेंड्यांपर्यंत तो फडफडत गेला, आल्डरच्या कोवळ्या झाडीतून धडपडत गेला, घोगऱ्या अस्पष्ट हुंकारात तो विरला आणि परत एकदा जोर करून त्याने मे महिन्यातील निरभ्र आकाशापर्यंत भरारी मारली.

सुंदर निळ्या आकाशाकडे लीझा खूप वेळपर्यंत पहात होती. घुसमटत आणि चिखल थुंकत आकाशाकडे वरती जाण्याची तिची पराकाष्ठा चालली होती. ती जोर लावत होती, निराश होण्याची तिची तयारी नव्हती.

सूर्य सावकाशपणे झाडांच्या माथ्यांवर चढला, त्याचे किरण दलदलीपर्यंत येऊन टेकले आणि सूर्याच्या उबदार, असह्य तेजस्वी प्रकाशाची लीझाला अखेरची जाणीव झाली. भाग्यशाली उद्यासारखा तो प्रकाश तिला भासला. शेवटच्या क्षणी तिला खात्री वाटली की, तिच्यासाठीसुद्धा उद्या उगवणार आहे...

हसत हसत जोवर त्यांनी फराळ केला (अर्थात अन्न शिजवण्याचा प्रश्नच नव्हता), तोवर शत्रू बराच दूरवर गेला होता. अथवा अधिक सोप्या रीतीने सांगायचे तर गोंगाटाने भरलेल्या किनाऱ्यापासून, खेड्यातील बडबड्या बायकांपासून आणि अदृश्य पुरुषांपासून घाबरून शत्रूचे शिपाई जीव घेऊन पळाले होते. जणू काही कधी ते अस्तित्वातच नव्हते अशा रीतीने जंगलात गुडुप झाले होते.

वास्कोवला हे अजिबात आवडले नव्हते. त्याला केवळ युद्धाचाच अनुभव नव्हता, तर शिकारी म्हणूनही अनुभव होता. शत्रूवर अथवा अस्वलावर कायम नजर ठेवावी लागते हे त्याला ठाऊक होते. जर्मनांच्या मनात काय होते, ते कुठे वळतील अथवा टेहळणीचे मोर्चे कुठे लावतील ह्याची कुणाला कल्पना? वाईट शिकारीप्रमाणे ही परिस्थिती होती. कोण कुणाचा पाठलाग करीत आहे ह्याची माहिती नसते तेव्हा: अस्वल तुमच्यापाठी अथवा तुम्ही अस्वलापाठी. अशी परिस्थिती टाळण्यासाठी सार्जंट-मेजरने मुलींना किनाऱ्यावरच मागे ठेवले व तो स्वत: आणि ओस्यानीना टेहळणीसाठी निघाले.

"माझ्या अगदी पाठोपाठ रहा, मार्गारीता. जेव्हा मी थांबेन—तू थांब, जर मी खाली आडवा झालो—तर ताबडतोब तू तसंच कर. जर्मनांशी लपंडाव खेळणं म्हणजे मरणाशी लपंडाव खेळण्यासारखं आहे, तेव्हा सर्वांगानं ऐकता आलं पाहिजे. कान आणि डोळे सावध पाहिजेत."

एका झुडूपापासून दुसऱ्या झुडूपापर्यंत, एका दगडापासून दुसऱ्या दगडापर्यंत, तो वाट काढत होता. डोळे दुखेपर्यंत

तारवटून पहात होता. जमिनीला कान लावून पहात होता. हवा हुंगून पहात होता. कोणत्याही क्षणी उडू शकणाऱ्या टाईम-बाँबप्रमाणे तो सज्ज होता. प्रत्येक गोष्ट तपासून पाहिल्यानंतर आणि कानात गुणगुण सुरू होईपर्यंत ऐकून झाल्यानंतर त्याने हाताची हलकीशी हालचाल केली. ओस्यानीना तात्काळ त्याच्या जवळ आली. डहाळी तुटल्याचा आवाज ऐकण्यासाठी, मूर्ख नीलकण्ठ पक्ष्याकडून एखादा इषारा ऐकण्यासाठी, दोघेजण मुकाटपणे कान देऊन ऐकत राहिली. मग नवा आडोसा घेण्यासाठी एखाद्या सावलीप्रमाणे पटकन अंग चोरून सार्जंट-मेजर पुढे सरकला, तर रीता होती त्याच जागी थांबून त्या दोघांसाठी सावधपणे ऐकत राहिली.

अशा रीतीने त्यांनी डोंगर ओलांडला, मुख्य जागेपर्यंत पल्ला गाठला व नंतर पाईनच्या छोटया राईपर्यंत मजल मारली. त्या सकाळी ह्याच ठिकाणाहून जर्मनांची नजर चुकवून ब्रीच्कीना जंगलात पसार झाली होती. अजूनपर्यंत तरी सर्व काही शांत-निवांत होते. जणू जगात शत्रू अस्तित्वात नव्हता. पण फेदोत एवग्राफीचने स्वतःला अथवा कनिष्ठ सार्जंटला ह्या विचाराच्या आहारी जाऊ दिले नाही.

पाईनच्या छोटया राईपलिकडे लेगोन्तोवो सरोवराचा किंचित उताराचा शेवाळभरला किनारा होता. किनाऱ्यावर मोठमोठे पाषाण विखुरले होते. मुख्य जंगल किंचित दूरवर उंचवटया-पासून सुरू होत होते. जंगलापर्यंतच्या वाटेवर वाकलेल्या भोजाच्या झाडांचा पुंजका व फरची विरळ बुटकी झाडे उभी होती.

येथे सार्जंट-मेजर थांबला. दुर्बीणीमधून त्याने झुडूपांना न्याहाळले, काही वेळपर्यंत कान टवकारून ऐकले आणि नंतर सरोवराच्या गुळगुळीत आरशाच्या दिशेने वाहणाऱ्या वाऱ्याच्या

हलक्या झुळूकेला हुंगून पाहिले. रीता आज्ञाधारकपणे त्याच्या शेजारी आडवी पडून होती. ओलसर शेवाळयामुळे तिचे कपडे हळूहळू भिजून चिंब होत होते व ह्याची तिला चीड येत होती.

"पकडलंस?" सार्जंट-मेजरने तिला हळूच विचारले आणि तो स्वत:शीच हसला. "जर्मन संस्कृतीनं त्यांना तोंडघशी पाडलं. ते कॉफी बनवताहेत!"

"का तुम्हाला असं वाटतंय?"

"मला वास येतोय. त्यांची न्याहरी चाललीय. फक्त सगळे सोळा जमलेत काय?"

क्षणभर विचार केल्यानंतर त्याने आपली रायफल पाईनच्या बुंध्याला टेकवून उभी केली,. पट्टा अधिक घट्ट आवळला आणि रीतापाशी तो खाली बसला.

"आपण त्यांना मोजलं पाहिजे, सगळेजण इथंच आहेत किंवा नाहीन ते पाहिलं पाहिजे. हे बघ, जर गोळीबार सुरू झाला, तर तू ताबडतोब इथून पळायचं, अगदी ताबडतोब. पोरींना बरोबर घ्यायचं आणि पूर्वेला थेट कालव्यापर्यंत जायचं, तिथं जर्मनांची वर्दी द्यायची. मला वाटतं तोवर त्यांना माहीत झालं असावं, कारण लीझा ब्रीच्कीना आता कोणत्याही क्षणी स्टेशनवर पोहोचेल. सगळं स्पष्ट समजलं?"

"नाही," रीता म्हणाली. "आणि तुम्ही?"

"ओस्यानीना, तू हे डोक्यातून काढून टाक," सार्जंट-मेजरने तिचे बोलणे तोडले. "आपण काही अळंब्या अथवा बेरी गोळा करायला बाहेर पडलो नाही. जर त्यांनी मला पाहिलं, तर ते मला जिवंत सोडणार नाहीत. हे नक्की. म्हणून तू ताबडतोब माघारी गेलं पाहिजे. माझा हुकूम स्पष्ट समजला?"

रीता गप्प राहिली.

"ओस्यानीना, तू काय उत्तर दिलं पाहिजेस?"

"स्पष्ट समजलं, असं उत्तर दिलं पाहिजे."

सार्जंट-मेजरने हास्य केले व खाली वाकून सर्वांत जवळच्या दगडाच्या दिशेने तो निघाला.

रीता त्याला निरखून पहात होती, पण जेव्हा तो अदृश्य झाला तेव्हाचा क्षण नेमका तिच्याकडून हुकला. शेवाळ वाढलेल्या राखाडी पाषाणांमध्ये तो अक्षरशः विरघळून गेला. तिचा स्कर्ट व तिच्या कुडत्याच्या बाह्या भिजून चिंब झाल्या होत्या. सरपटत माघारी जाऊन झाडाच्या एका खुंटावर ती बसली आणि जंगलची शांत कुजबूज कान देऊन ऐकू लागली.

काहीही घडणार नाही अशा ठाम खात्रीने ती शांतपणे वाट पहात होती. केवळ आनंददायी शेवटच घडणार असे तिला कायम शिकवण्यात आले होते. कोणत्याही कामगिरीच्या यशाबाबत शंका बाळगणे म्हणजे विश्वासघातच करण्यासारखे होते, अशी तिच्या पिढीला शिकवण मिळाली होती. अर्थात भीती आणि अनिश्चितता म्हणजे काय ह्याची तिला जाणीव होती. पण प्रत्यक्ष परिस्थितीपेक्षा यशाबाबतचा आंतरिक विश्वास नेहमीच अधिक बळकट होता.

जरी ती कानात प्राण आणून ऐकत होती, सावधपणे ऐकत होती, तरी फरच्या काही फांद्या किंचित थरथरल्या व सार्जंट-मेजर अचानक, आवाज न करता तिच्यासमोर अवतरला. मुकाटपणे त्याने स्वतःची रायफल उचलली, मानेने तिला खूण केली व दाट झाडीत तो शिरला. सुळक्यांपर्यंत पोहोचल्यानंतरच तो थांबला.

"ओस्यानीना तू वाईट सैनिक आहेस. अगदी भिकार."

तो हे रागाने म्हणाला नाही, उलट त्याच्या चेहऱ्यावर चिंता होती. रीताला त्यामुळे हसू आले.

"का?"

"भरपूर पिल्लं भोवती बागडत असलेल्या एखाद्या रानकोंबडीप्रमाणं ऐटीत खुंटावर बसून होतीस. खाली पडून राहण्याचा तुला हुकूम होता."

"पण तिथं ओलं होतं."

"ओलं..." सार्जंट-मेजर गुरगुरला. "ते कॉफी पीत आहेत हे तुझं नशीब, नाहीतर तुझा अवतार संपला असता."

"म्हणजे तुमचा अंदाज बरोबर?"

"मी भविष्य सांगणारा ज्योतिषी नाही आणि अंदाज करत बसण्याची ही वेळ नाही. दहा माणसं खात बसली आहेत—मी पाहिलं. दोघं पहारा देत आहेत—त्यांनाही पाहिलं. बाकीचे दुसऱ्या बाजूला पहारा देत असणार. त्यांनी मुक्काम टाकलाय—शेकोटीवर मोजे वाळवताहेत. आपल्या जागा बदलण्याची हीच वेळ आहे. ह्या दगडांमध्ये मी जागा शोधेपर्यंत तू बाकीच्यांना इथं घेऊन ये. आणि त्यांना घेऊन येताना काळजी घे—एकीच्याही तोंडून खिदळण्याचा आवाज बाहेर पडता कामा नये!"

"समजलं."

"आणखी एक: बाहेर मी तंबाखू वाळत टाकलीय, ती घेऊन ये, शहाणी मुलगी तू. आणि अर्थात, माझ्या इतर वस्तूसुद्धा."

"आणत्ये, फेंदोत एवग्राफीच."

ओस्यानीना बाकीच्या मुलींना आणायला गेली होती तोवर सार्जंट-मेजरने पोटावर सरपटत जवळचे व दूरचे असे सगळे

पाषाण तपासून पाहिले. त्याने आपल्या डोळ्यांना, कानांना आणि नाकाला जास्तीत जास्त ताण दिला. पण जर्मनांचा त्याला कुठेही मागमूस लागत नव्हता. आता त्याला किंचित हुरूप वाटू लागला. त्याच्या अंदाजानुसार लीझा ब्रीच्कीना स्टेशनच्या जवळ असायला हवी होती, आता कोणत्याही क्षणी तिने वर्दी दिली असती व जर्मन आक्रमकांभोवती अदृश्य जाळे पडले असते. संध्याकाळी – उशीरात उशीरा पहाटेच्या दरम्यान – त्याच्या मदतीला माणसे आली असती. पुरुषांना त्याने योग्य दिशेला धाडले असते व आपल्या मुलींना सुळक्यांच्या आडो-शाला सुरक्षिततेसाठी नेले असते. घाणेरड्या भाषेपासून त्यांनी दूर राहणेच इष्ट होते. हातघाईची झुंज होते तेव्हा नेहमीच शिव्यांना पूर येत असतो.

त्याच्या मुली दूर अंतरावर असतानाच परत एकदा त्याला त्यांच्या आगमनाची चाहूल लागली. तसे म्हटले तर कोणताही आवाज झाला नव्हता अथवा कुजबूज नव्हती, किंवा धातूच्या वस्तू आपटल्याचा आवाजही झाला नव्हता. पण त्या दूर अंतरावर असतानाच त्याला त्यांची चाहूल लागली होती एवढे मात्र खरे. कदाचित त्यांचा जड श्वासोच्छ्वास असावा अथवा त्या वापरत असलेल्या यू-द-कोलोनचा वास असावा, पण काहीही असले तरी जर्मनांमध्ये पट्टीचा शिकारी नव्हता, ह्याबद्दल सार्जंट-मेजरने स्वतःच्या नशीबाचे आभार मानले.

धूम्रपानासाठी त्याचा जीव अगदी तळमळत होता. दोन तासांपेक्षा अधिक काळ तो त्या प्रदेशात पोटावर सरपटत फिरत होता आणि मोह होऊ नये म्हणून आपली तंबाखू त्याने वरती मुलींपाशी ठेवून दिली होती. आता त्यांची भेट झाल्या-

नंतर त्याने त्यांना गप्प राहण्याची ताकीद दिली व तंबाखूच्या बटव्याबाबत विचारणा केली. ओस्यानीना एकदम हात पसरून घाबरावल्या आवाजात म्हणाली :

"अगबाई! विसरलेच मी! .."

सार्जंट-मेजरने चिडून घशातल्या घशात आवाज केला. साली ही बायकांची जात, वेळेवर कधी कसली आठवण ठेवत नाही! त्याचे सैनिक पुरुष असते तर किती सोपे झाले असते सगळे काही! त्याने त्यांना भरपूर शिव्या हासडल्या असत्या आणि बटव्यासाठी परत धाडले असते. पण त्याऐवजी आता तो बळेच स्मित करत म्हणाला :

"ठीक आहे, काही बिघडत नाही. माझ्या पडशीत काही-तरी असणार... ती तर विसरला नाहीत ना?"

त्याची पडशी त्याच्या हवाली करण्यात आली. तंबाखूपेक्षा बटवा गमावल्याचे सार्जंट-मेजरला जास्त दुःख झाले होते, कारण त्याला तो भेट म्हणून देण्यात आला होता व त्यावर अक्षरे विणली होती : "आपल्या मायभूमीचे रक्षण करणाऱ्या लाडक्यास." स्वतःची निराशा त्याने पुरती लपविण्यापूर्वीच गूर्विच मागे धावली.

"मी आणत्ये! तो कुठं आहे ते मला ठाऊक आहे."

"कुठं निघालीस गूर्विच? मागं फीर, कॉम्रेड दुभाषी..."

पण त्याचे ओरडणे व्यर्थ गेले—फक्त घाईघाईने जाणारी अवजड पावले ऐकू आली...

अवजड असण्याचे कारण सोन्या गूर्विचने पूर्वी कधीही उंच बूट वापरले नव्हते आणि अननुभवापायी तिने स्वतःची जोडी दोन नंबरांनी मोठी निवडली होती. सैन्यातील कुणाही अनुभवी माणसाला माहीत असते की, बूट पायांपेक्षा फार मोठे असले,

तर त्या[illegible] भयानक आवाज होतो. सोन्याचे कुटुंब मुळीच लष्करी नव्हते, त्यांच्या घरात कधीही उंच बूट नव्हते आणि तसले बूट कसे वापरायचे ह्याची तिच्या वडिलांनासुद्धा क्वचितच माहिती असावी...

नेमिगा नदीच्या पैलतीरावरील त्यांच्या छोट्या घराच्या दारावर एक तांब्याची पाटी होती: "सालोमोन आरोनोविच गूर्विच, औषधांचे डॉक्टर." जरी तिचे वडील सामान्य तालुक्याचे डॉक्टर होते आणि वैद्यकशास्त्राची जरी त्यांना पदवी नव्हती, तरी दारावर ती पाटी तशीच राहिली होती, कारण तिच्या आजोबांनी ती भेट म्हणून दिली होती व स्वतःच्या हातांनी त्यांनी त्या पाटीला दारावर ठोकून बसवले होते. त्यांनी असे करण्याचे कारण त्यांचा मुलगा सुशिक्षित होता व ही वस्तुस्थिती संपूर्ण मिन्स्क शहराला समजावी अशी त्यांची इच्छा होती.

दाराशेजारी दाराच्या घंटीची मूठ होती व घंटी वाजविण्यासाठी तिला जोरात खेचावे लागे. त्या अधीर घंटानादाच्या संगतीतच सोन्याचे संपूर्ण बालपण गेले होते–रात्रंदिवस, हिवाळा अथवा उन्हाळा. कोणतेही हवामान असो, कोणतीही वेळ असो, तिचे वडील आपली डॉक्टरी बॅग उचलायचे आणि पायी चालत निघायचे. कारण घोड्यांच्या बग्गीचे भाडे देण्याची त्यांची ऐपत नव्हती. घरी परतल्यानंतर आपल्या हलक्या आवाजात ते क्षयाबद्दल, घशातल्या गाठींबद्दल अथवा मलेरियाबद्दल बोलत रहायचे. दरम्यान आजी त्यांना घरात बनवलेले चेरीचे पेय ग्लासभर द्यायची.

त्यांचे कुटुंब मोठे आणि एकत्र होते: मुले, चुलत भावंडे, आजी, आईची अविवाहित बहीण आणि आणखी कुणी दूरची

नातेवाईक बाई—घरात असा एकही बिछाना नव्हता ज्यावर कुणी एकटे झोपत होते आणि काही बिछान्यांवर तर तीन-तीन झोपत.

विद्यापीठात शिकत असतानासुद्धा सोन्या आपल्या मोठ्या वहिणींचे जुने कपडे वापरायची. त्यांचा रंग बहुतेकदा भुरा असायचा, गळ्यापाशी शिवण उंच असायची आणि लोखंडी चिलखताप्रमाणे ते कडक असायचे. बराच काळपर्यंत त्यांच्या वजनाची तिने फिकीर बाळगली नव्हती, कारण नाचायला जाण्याऐवजी बहुतेकदा ती वाचनालयात जायची अथवा मॉस्को आर्ट थिएटरकडे धावायची—किमान वरच्या सज्जातील एखादे तिकीट मिळण्याचे भाग्य लाभले तर. मात्र तिच्याबरोबरच शिकणारा तिचा चष्मेवाला शेजारी केवळ योगायोगाने तिच्या पाठोपाठ वाचनालयात येत नव्हता हे जेव्हा तिला समजले, तेव्हा तिला आपल्या कपड्यांबाबत चिंता वाटू लागली. पण ही गोष्ट विद्यापीठात प्रवेश केल्यानंतर एक वर्ष उलटल्यावर, उन्हाळ्यात गोर्की पार्कमध्ये तिने त्याच्याबरोबर एक अविस्मरणीय संध्याकाळ घालवली, त्याने तिला ब्लोकच्या कवितांचे एक छोटेसे पुस्तक भेट म्हणून दिले व त्यानंतर पाच दिवसांनी तिला समजले की, सैन्यात स्वेच्छेने भरती होऊन तो युद्धआघाडीवर निघून गेला होता.

होय, विद्यापीठातसुद्धा सोन्या आपल्या वडील बहिणींचे जुने कपडे वापरत होती. तिचे कपडे लांब असत आणि लोखंडी चिलखताप्रमाणे—बोजड असत...

पण तिने ते फार काळ वापरले नाहीत. फक्त एक वर्ष. त्यानंतर ती लष्करी गणवेष आणि उंच बूट वापरू लागली—दोन नंबरांनी मोठे.

तिच्या स्वतःच्या तुकडीत तिला कुणीही ओळखत नव्हते. ती ठळकपणे नजरेत भरणारी नव्हती, स्वतःचे काम निमूटपणे करायची. केवळ योगायोगाने तिला विमानविरोधी तोफखान्यात भरती केले होते. त्यांच्या आघाडीवर लढाई नव्हती आणि संरक्षक मोर्चांवर त्यांना ठेवले होते. दुभाषी खूप होते, पण विमानविरोधी तोफांच्या गोलंदाजांची तूट होती. म्हणून मेस्सेरश्मिटांविरुद्धच्या त्या लढाईनंतर तिला व झेन्या कोमेल्कोवाला विमानविरोधी तोफखान्याच्या गटात पाठवण्यात आले होते. कदाचित, इतर मुलींना तिची फारशी ओळख नव्हती म्हणून की काय, फक्त सार्जंट-मेजरला तिच्या आवाजाचा ध्वनी नेमका ऐकू आला.

"गूर्विचचा आवाज काय हा?"

त्या सगळयाजणींनी कान टवकारले, पण डोंगरात पूर्ण शांतता होती. फक्त वाऱ्याची हळुवार शीळ वाजत होती.

"नाही," रीता म्हणाली. "तुम्हाला भास झाला असावा."

तो उसाशापेक्षा फारसा जड नसलेला दूरचा अस्फुट आवाज परत ऐकू आला नाही. पण तरीही सार्जंट-मेजर पुनःपुन्हा ऐकण्याचा प्रयत्न करत राहिला. मग हळू हळू त्याची मुद्रा दगडासारखी कठीण बनली. तो विलक्षण उद्‌गार जणू त्याच्या अंतरात अडकून बसला होता, त्याच्या कानांमध्ये परत परत घुमत होता आणि त्याचा अर्थ जेव्हा त्याच्या ध्यानात आला, तेव्हा तो थिजला. त्याने मुलींकडे पाहिले, पण त्याला त्या दिसत नव्हत्या. विचित्र आवाजात तो म्हणाला:

"कोमेल्कोवा, माझ्यापाठी चल. बाकीच्या इथंच थांबा."

सावलीप्रमाणे झटपट हालचाली करीत तो पुढे जात होता.

झेन्या धापा टाकत होती, त्याच्या गतीशी जुळवून घेणे तिला जड जात होते. एवढे खरे, सार्जंट-मेजरला वजनाचा भार वाहावा लागत नव्हता, पण त्याउलट तिच्या हाती रायफल होती, तिचा स्कर्ट तिच्या हालचालींना अडथळा आणत होता, ती धावत होती तेव्हा तो खूपच अरुंद भासत होता. पण मुख्यत: आवाज न करता हालचाली करण्यात झेन्याची सगळी ताकद खर्ची पडत होती आणि दुसरे काही करण्यास तिच्यापाशी बळ उरले नव्हते.

वास्कोवने ऐकलेल्या त्या अस्फुट किंकाळीवर त्याचे सर्व अवधान एकवटले होते. ती एकच एक, जवळजवळ ध्वनी-विहीन किंकाळी नेमकी त्याला ऐकू गेली होती, त्याने ती ओळखली होती व तिचा अर्थ त्याला समजला होता. पूर्वी त्याने अशा किंकाळ्या ऐकलेल्या होत्या; सर्व काही पुसून टाकणाऱ्या, सर्व काही अदृश्य करणाऱ्या किंकाळ्या. त्यांचा आवाज तुमच्या कानात सतत घुमत राहतो, तुमच्या डोक्यात घणघणत राहतो, एकदा ऐकल्यानंतर हा आवाज तुम्ही कधीही विसरू शकत नाही. हा आवाज तुम्हाला थिजवतो, त्याच्या पकडीत धरून ठेवतो, तुमच्या काळजाला खेचत राहतो—म्हणूनच तो घाईने धावत होता.

आणि म्हणूनच जणू भिंत आडवी यावी तसा तो एकदम थांबला. त्याच्या मागून धावत येणाऱ्या झेन्याच्या रायफलीची नळी त्याच्या खांद्याच्या हाडावर आपटली. पण तो पटकन खाली बसला आणि त्याने जमिनीवर हात टेकवला—पायाच्या ठशाशेजारी.

तो खूप रुंद ठसा होता व बुटाच्या तळव्यावरील रेषा स्पष्ट दिसत होत्या.

"जर्मन? ..." झेन्याचा श्वासोच्छ्वास गरम आणि आवाजविहीन येत होता.

सार्जंट-मेजरने उत्तर दिले नाही. त्याने पाहिले, ऐकले व हुंगले. त्याने हाताची मूठ एवढी गच्च आवळली की, नखे पांढरीफटक पडली. झेन्याने समोर नजर टाकली. नुकत्याच विसकटल्या गेलेल्या जमिनीवर काही काळसर शिंतोडे तिला दिसले. सार्जंट-मेजरने काळजीपूर्वक एक गोटा उचलला. त्यावर एखाद्या सजीव गोष्टीप्रमाणे एक दाट काळा थेंब होता. झेन्या झटकन मागे सरली. तिला आरोळी मारावीशी वाटली, पण ती आरोळी तिच्या घशातच अडकली.

"अजागळ," सार्जंट-मेजर हळूच पुटपुटला आणि परत म्हणाला: "अजागळ..."

त्याने हळुवारपणे गोटा खाली ठेवला आणि नुकताच येथें प्रसंग कसा घडला असावा ह्याची कल्पना करण्यासाठी सभोवार नजर टाकली. मग सुळक्याच्या दुसऱ्या बाजूला त्याने एक पाऊल टाकले. त्याच्या अपेक्षेप्रमाणे सोन्या गूर्विच कपारीत वेडीवाकडी पडली होती. तिच्या जळक्या स्कर्टमधून तिचे ओबड-धोबड उंच बूट बाहेर डोकावत होते. तिला उचलता यावे म्हणून सार्जंट-मेजरने तिच्या कमरपट्ट्याला धरून हलकेच तिला वर खेचले. काही पावले त्याने तिला वाहून नेले व पाठीवर झोपवले.

सोन्याचे अर्धवट मिटलेले डोळे आकाशाकडे मंदपणे टक लावून पहात होते. तिच्या कुडत्याची पुढची बाजू रक्ताने भिजली होती. सार्जंट-मेजरने काळजीपूर्वक तिच्या कुडत्याची बटणे मोकळी केली व तिच्या काळजावर कान लावला. त्याने आवश्यक तो वेळ घेतला, दरम्यान झेन्या त्याच्या पाठीशी

उभी होती. आवाज न करता ती हुंदके देत होती, तिचे सारे शरीर गदगदत होते. वळलेली मूठ चावत ती अश्रूंना थोपवण्याचा प्रयत्न करत होती. थोड्या वेळानंतर सार्जंट-मेजर परत ताठ उभा राहिला. रक्ताने चिकट बनलेले सोन्याच्या स्तनावरील अंतर्वस्त्र त्याने हळुवारपणे नीट केले. तेथे दोन अरुंद छिद्रे होती. एक छिद्र तिच्या डाव्या स्तनात घुसले होते. दुसरे, किंचित खाली, तिच्या काळजात.

"म्हणून तू किंचाळलीस," सार्जंट-मेजर पुटपुटला. "म्हणून तुला ओरडता आलं–त्यानं माणसाला ठार मारायला घाव घातला होता. पहिल्यांदा तुझ्या काळजापर्यंत पोचला नाही... स्तन आडवा आला..."

त्याने तिच्या कुडत्याची सर्व बटणे परत लावली आणि कॉलर नीट केली. त्याने तिच्या हातांची घडी घातली व तिचे डोळे मिटवण्याची त्याची इच्छा होती, पण ते त्याला जमले नाही. फक्त तिच्या पापण्या रक्ताने माखल्या गेल्या. तो उठला:

"थोडा वेळ इथंच पडून रहा, सोनेच्का!"

त्याच्या पाठीशी झेन्याने शहारणारा हुंदका दिला. सार्जंट-मेजरने पापण्यांखालून तिच्याकडे एक कठोर नजर टाकली:

"नाक सुरसुरत बसायला सवड नाही, कोमेल्कोवा."

ओणवे होऊन तो झपाट्याने पुढे निघाला. पावलांच्या रेघारेषांच्या पुसट ठशांचा माग घेत जाऊ लागला...

## ९

सोन्याची वाट पहात जर्मन दबा धरून बसले होते, अथवा योगायोगाने तिची त्यांच्याशी टक्कर झाली होती? दोनदा

पायांखाली घातलेल्या वाटेवरून कसलाही विचार न करता ती धावत होती, त्रिवार नतद्रष्ट असलेली तंबाखू वास्कोवला आणून देण्यासाठी घाई करत होती. अत्यंत उत्साहाने ती पळत होती आणि अचानक तिच्या कृश खांद्यांवर पडलेले घामट अवजड ओझे म्हणजे काय होते हे तिला कधी समजलेच नाही, अथवा तिच्या काळजात धारदार, घेरी आणणारी वेदना चरचरा कापत का गेली, हेही तिला समजले नाही... नव्हे, जाणीव होण्यापुरता तिला अवधी मिळाला होता, तिला जाणीव झाली आणि तिने किंकाळी फोडली, कारण सुऱ्याचा पहिला घाव तिच्या काळजापर्यंत पोहोचला नव्हता – तिचा स्तन वाटेत आडवा आला होता. तिचा उभार, घट्ट स्तन.

अथवा असे घडलेच नव्हते? कदाचित ते तिची वाट पहात दबा धरून बसले होते? कदाचित जर्मनांनी त्या सर्वांवर मात केली होती? अनुभव नसलेल्या मुलींवर आणि खुद्द त्याच्यावर? उत्तम टेहळणी केल्याबद्दल सन्मानपदक मिळवलेल्या आणि सैन्यात परत दाखल झालेल्यावर? कदाचित तो त्यांच्या मागावर नव्हता, तर ते त्याच्या मागावर होते? एव्हाना त्यांनी सगळा अंदाज घेतला होता, प्रत्येक गोष्टीचा व्यवस्थित आडाखा बांधला होता आणि केव्हा कोण कुणाला संपवणार हे ठरवून टाकले होते?

पण वास्कोवच्या मनात आत्ता भीती नव्हती, तर सूडाचा संताप थैमान घालत होता. विलक्षण संतापाने त्याने आपले दात कराकरा रगडले. एकच इच्छेने तो पेटून निघाला होता – त्यांना गाठायचे. त्यांना गाठायचे आणि मग...

"माझ्या हाती तुला ओरडायला अवसर मिळणार नाही... नाही... ओरडायचा नाहीस..."

अस्पष्ट ठसे अजूनही अधूनमधून त्याला आढळत होते. तेथे दोन जर्मन असल्याचे त्याला स्पष्ट समजत होते. पुन्हा एकदा त्याने स्वतःला दोष दिला. तो स्वतःला माफ करू शकत नव्हता आणि आता त्याला दुःख होत होते, कारण सर्व शत्रूंवर नजर ठेवणे त्याला जमले नव्हते; कारण त्याला वाटले होते की, न दिसलेले जर्मन शेकोटीच्या दुसऱ्या बाजूला होते आणि मुलींच्या बाजूला आले नव्हते. होय, स्वतःची दुभाषी गमावल्याचा दोष त्याच्याच माथी होता. आदल्याच रात्री त्याने तिच्याबरोबर एका डब्यातली खीर वाटून खाल्ली होती. ही जाणीव त्याला चैन पडू देत नव्हती, आक्रंदून उठत होती त्याच्या अंतरंगात ठसठसत होती आणि केवळ एकच गोष्ट त्याला शांत करू शकली असती – त्याने जर्मनांना गाठायला हवे होते. इतर कोणत्याही गोष्टीचा विचार करण्याची त्याची इच्छा नव्हती. कोमेल्कोवा त्याच्या पाठीमागून येत होती अथवा नाही, हेसुद्धा त्याने मागे वळून पाहिले नाही.

ते कुठे आणि कशासाठी धावत होते, ह्याची झेन्याला जाणीव होती. सार्जंट-मेजरने तिला काहीही सांगितले नव्हते, तरीही तिला ठाऊक होते. तिला माहीत होते आणि भीती वाटत नव्हती. तिच्यात सर्व काही अचानक थिजले होते, त्यामुळे ना वेदना होती, ना रक्तस्राव. जणू काही तिच्या अंतरंगातील ती ज़खम तिला वेदना देण्यासाठी तिच्या परवानगीची वाट पहात होती. पण ती परवानगी देत नव्हती, त्यामुळे तिचे चित्त याक्षणी विचलित होणे शक्य नव्हते. ही भावना यापूर्वी तिने एकदा अनुभवली होती. १९४१ च्या

उन्हाळ्यात, जवळ जवळ एक वर्षापूर्वी, एस्तोनियन बाईने तिला लपवून ठेवले होते त्या वेळेला...

सार्जंट-मेजरने हात वर केला आणि ती तात्काळ थांबली, तिला लागलेली धाप दाबण्याचा प्रयत्न करू लागली...

"सावकाश, दम पकड," जेमतेम ऐकू जाईल अशा आवाजात तो म्हणाला. "ते इथंच कुठंतरी आहेत. अगदी जवळ."

झेन्याने रायफलवर आपला भार टाकला व कॉलर मोकळी केली. तिला खोल श्वास घ्यायचा होता, स्वतःच्या फुफ्फुसांमध्ये ताजी हवा भरून घ्यायची होती. पण त्याऐवजी तिने सावकाशपणे, आवाज न करता श्वास सोडला. तिचें काळीज जोरात धडधडले.

"ते पहा..." सार्जंट-मेजर म्हणाला.

दगडांमधल्या अरुंद फटीतून तो पहात होता. झेन्याने वर नजर टाकली. पर्णहीन भोजाच्या राईमधील सडपातळ शेंडे हलत होते.

"ते आपल्याला ओलांडून जाणार आहेत," मागे वळून न पाहता सार्जंट-मेजर पुढे बोलू लागला. "तू इथंच थांब. जेव्हा मी बदकाच्या आवाजाचा इषारा देईन तेव्हा तू काहीतरी आवाज कर. एखादा खडा फेक किंवा रायफलचा दस्ता आपट, त्यांनी तुझ्याकडं पहावं म्हणून, पण नंतर मात्र आवाज करू नकोस, अगदी चूप रहा. समजलं?"

"समजलं," झेन्या म्हणाली.

"लक्षात ठेव, बदकाचा इषारा, त्याआधी नाही."

त्याने जोरदार, खोल श्वास घेतला, दगडावरून उडी मारली आणि जर्मनांची वाट ओलांडून भोजाच्या राईत तो घुसला.

महत्त्वाचा मुद्दा होता त्याने सूर्याच्या बाजूने त्यांच्यावर

झेपावण्यात, म्हणजे थरथरत्या ऊन-सावलीच्या नाचात त्यांच्या दृष्टीला तो पडला नसता ; मग त्यांच्यापैकी एकाच्या पाठीवर उडी घालायची, त्याला चिरडायचे, खाली पाडायचे, घाव घालायचा आणि त्याला ओरडायला वाव द्यायचा नाही. किंचित-ही आवाज न करता त्याला ठार मारायचे... पाण्यात मारतात तसे...

त्याने उत्तम जागा निवडली होती. जर्मन हमखासपणे त्या वाटेवरून जाणार होते. आणि तो त्यांच्या दृष्टीला न पडताही ते मात्र उघड्यावर येणार होते, कारण त्याच्या पुढ्यातच भोजाच्या झाडांमध्ये थोडी मोकळी जागा होती. अर्थात जेथे तो होता, तेथून नेम न चुकता त्याने सहज त्यांना गोळ्या घातल्या असत्या. पण त्याच्या गोळीबाराचे आवाज जर्मनां-च्या मुख्य गटाला ऐकू गेले असते – आणि त्याला असे घडायला नको होते. म्हणून त्याने तात्काळ पिस्तूल परत चामडी पिश-वीत घातले एवढेच नव्हे तर पिशवीवरील बटण लावून टाकले. आपला फिन्निश बनावटीचा खंजीर म्यानातून चटकन बाहेर येतो अथवा नाही, ह्याची त्याने चाचणी घेतली.

ह्या क्षणाला भोजांच्या बुंध्यांमधून जर्मनांचे प्रथम दर्शन घडले. भोजांना वसंताची पालवी नुकतीच फुटत होती. वास्कोव-च्या अपेक्षेप्रमाणे दोन जर्मन होते. पहिला चांगलाच गुबगुबीत होता आणि त्याच्या उजव्या खांद्यावर सबमशिनगन लटकत होती. किती सहजतेने वास्कोव आपल्या पिस्तूलाने त्यांचा निकाल लावू शकला असता. पण त्याने परत हा विचार डोक्यातून काढून टाकला. गोळीबाराचे आवाज होतील म्हणून ह्यावेळी तो घाबरला नव्हता, तर सोन्याची त्याला आठवण झाली होती आणि त्यांना सहज मरण देण्याची त्याची मुळीच

इच्छा नव्हती. डोळ्याला डोळा, सुऱ्याला सुरा—केवळ हा एकच मार्ग होता.

जर्मन सहजपणे, फारशी सावधगिरी न बाळगता चालत होते. दुसरा तर बिस्कीट चघळत होता आणि मिटक्या मारत ओठ चाटत होता. सार्जंट-मेजरने त्यांच्या पावलांच्या लांबीचा अंदाज घेतला, अंतर जोखले आणि कोणत्या क्षणी त्याच्या पुढ्यातून ते जातील हे पाहिले, खंजीर म्यानातून उपसला व पहिला जर्मन एका उडीच्या अंतरावर असताना दोन तुटक बदकाचे आवाज काढले. दोघाही जर्मनांनी वर पाहिले, पण तेवढ्यात कोमेल्कोवाने रायफलीचा दस्ता दगडावर आपटला आणि आवाजाच्या दिशेने ते गर्रकन फिरले—आणि वास्कोवने झडप घातली.

त्याची उडी मोजून-मापून पडली होती. क्षण अगदी अचूक होता, अंतर निर्दोषपणे मापलेले होते. जर्मनाच्या पाठीवर त्याची उडी पडली. आपल्या गुडघ्यांमध्ये त्याने जर्मनाचे हातांचे कोपर अडकवले आणि जर्मनाने श्वास घ्यायच्या अथवा दचकायच्या आतच वास्कोवने त्याचे डोके मागे खेचले व धारदार खंजीराने त्याची ताणलेली मान चिरली.

सार्जंट-मेजरने नेमकी अशीच योजना केली होती. जर्मनाने ओरडू नये म्हणून अक्षरशः बकऱ्याप्रमाणे त्याची मान कापण्यात आली. रक्ताचा लोंढा बाहेर उसळला तेव्हा त्याने फक्त घशात घरघर आवाज केला. जर्मन जसा खाली कोसळू लागला, तसा वास्कोव उडी मारून बाजूला झाला व त्याने दुसऱ्यावर झेप घेतली.

हे सगळे घडण्यास अवघा एक क्षण लागला. फक्त एक क्षण. दुसऱ्या जर्मनाची ह्या दृश्याकडे अद्याप पाठ होती. पण

एक तर वास्कोवपाशी दुसरी उडी मारण्याची शक्ती उरली नव्हती, अथवा त्याने मौलिक क्षण वाया घालवला होता. दुसऱ्या जर्मनावर खंजीराचा वार करण्यात त्याला अपयश आले. हाताचा फटका मारून त्याने सब-मशिनगन उडवून लावली, पण त्या धांदलीत त्याचा खंजीरही खाली पडला. रक्ताने माखल्यामुळे तो साबणासारखा बुळबुळीत बनला होता.

मूर्खपणा घडला होता: लढाईऐवजी बुक्क्यांची मारामारी सुरू झाली होती. जर्मन जरी फार उंच नसला, तरी चांगला पिळदार अंगाचा होता. त्याचा पराभव करणे सोपे नव्हते आणि वास्कोवला त्याच्यावर कुरघोडी करणे जमेना. दगड आणि भोजाच्या झाडांदरम्यान शेवाळमाखल्या जमिनीवर एकमेकांना घट्ट पकडून ते गडाबडा लोळत होते, झटापट करत होते. पण आत्तापर्यंत जर्मनाने तोंडातून एकही आवाज बाहेर काढला नव्हता. एक तर सार्जंट-मेजरवर मात करण्याची त्याला आशा वाटत होती, अथवा स्वतःची ताकद ओरडण्यात वाया घालवण्याची त्याची इच्छा नव्हती.

वास्कोवने दुसरी चूक केली; जर्मनाला घट्ट मिठीत पकडून ठेवण्याच्या प्रयत्नात त्याने त्याला निसटू दिले होते व स्वतःचा सुरा उपसायला संधी दिली होती. वास्कोवला त्या सुऱ्याची भयंकर दहशत वाटत होती. त्यामुळे त्याची काही मौल्यवान शक्ती व अवधान वाया गेले. शेवटी जर्मनाने त्याला कैचीत पकडले व आपल्या अवजड पायांनी खाली दाबले. पोलादी पाते धरणारा हात आता वर उगारला होता व सार्जंट-मेजरच्या नरडीचा घोट घेऊ पहात होता. अजूनपर्यंत तरी वास्कोवने जर्मनाचे मनगट घट्ट पकडून धरले होते, अजून त्याने त्याचा हात थोपवला होता, पण जर्मनाला स्वतःच्या वजनाचा व

दाबाचा फायदा मिळत होता. आता फक्त काही वेळाचा मामला होता हे वास्कोवच्या ध्यानात आले. जर्मनाच्याही हे ध्यानात आले होते. त्याने डोळे आकुंचित केले व दात विचकले.

दुसऱ्याच क्षणी त्याचा सबंध देह एखाद्या रिकाम्या पोत्या-सारखा खाली कोसळला. आरंभी वास्कोवला ह्याचे कारण उमगले नाही. जर्मनाला मिळालेला पहिला तडाखा त्याने ऐकला नव्हता. पण दुसरा मात्र त्याने ऐकला. झाडाच्या कुजलेल्या बुंध्यावर प्रहार करावा तसा मंद खट्ट आवाज झाला होता. त्याच्या तोंडावर रक्ताच्या उबदार चिळकांड्यांचा स्पर्श जाणवला. आणि वाकड्या आ वासलेल्या तोंडाने श्वास घेण्याचा प्रयत्न करणारा जर्मन खाली कोसळू लागला. त्याचे धूड सार्जंट-मेजरने शेवटी स्वतःच्या अंगावरून बाजूला ढकलले, त्याचा सुरा हिसकावून घेतला आणि खच्‌दिशी त्याच्या काळ-जात खुपसला.

मगच त्याने मागे वळून पाहिले. प्रायव्हेट कोमेल्कोवा त्याच्या पुढ्यात उभी होती. रायफलची नळी तिने सोट्यासारखी धरली होती. दस्ता रक्ताने माखला होता.

"शाबास कोमेल्कोवा..." तीनदा धापा टाकत सार्जंट-मेजर कसाबसा म्हणाला. "...तुझा आभारी आहे... शिफारस करतो..."

उठून उभे राहण्याची त्याची इच्छा होती, पण तसे करणे त्याला जमले नाही. तो जमिनीवरच बसून राहिला व हवा छातीत भरून घेण्यासाठी माशाप्रमाणे तोंडाची उघडझाप करत राहिला. पहिल्या जर्मनाला पाहण्यासाठी त्याने सभोवार नजर टाकली. एखाद्या रेड्यासारखा मजबूत बांध्याचा होता तो

जर्मन. त्याचे शरीर अजूनही आचके देत होते. तो अद्याप घरघर आवाज करत होता व रक्ताचा पूर वाहात होता. दुसरा जर्मन इतःपर हालचाल करत नव्हता. मृत्यूने निश्चित केलेल्या अनैसर्गिक अवस्थेत तो पडून होता. काम पार पडले होते.

"तर झेन्या," वास्कोव हळूच म्हणाला, "आता त्यांच्यातले दोघं कमी झाले..."

अचानक झेन्याने रायफल खाली टाकली व धावतच ती झुडूपांकडे धावली. एखाद्या झिंगलेल्या माणसाप्रमाणे तिचा तोल जात होता. ती गुडघ्यांवर खाली बसली, भडाभडा ओकली, तिने हुंदके दिले व कुणाच्या तरी नांवाने हाक मारली... बहुधा आईच्या...

सार्जंट-मेजर पायांवर लटपटत उभा राहिला. अजूनचे त्याचे गुडघे थरथरत होते आणि त्याला पोटात मळमळत होते. पण आता अधिक वेळ वाया घालवणे धोक्याचे होते. त्याने कोमेल्कोवाला हाक मारून बोलावले नाही. हातघाईच्या झुंजीचा प्रथम अनुभव घेतल्यानंतर कुणाचीही प्रतिक्रिया तिच्या-मारखीच होते, ह्याची त्याला पुरेपूर जाणीव होती. "तू कुणाला ठार मारू नकोस" हा खुद्द जीवनाइतकाच स्वाभाविक कायदा प्रथम मोडल्यानंतर असा धक्का बसणे अपरिहार्य असते, ह्याची त्याला उत्तम माहिती होती. ह्या गोष्टीची सवय व्हावी लागते, काळीज घट्ट करावे लागते. झेन्यापेक्षा खूपच जास्त सामर्थ्यवान पुरुषांना व सैनिकांनासुद्धा हे अवघड जाते. स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीची खात्री पटवेपर्यंत त्यांना अतोनात यातना होतात. इथे तर एक स्त्री होती, कदाचित भावी माता होती, जिचा मूलभूत स्वभाव कोणत्याही प्रकारच्या हत्येविरुद्ध होता.

तरीही एका मानवी जीवावर आघात करून तिने त्याला मरणाच्या वाटेला लावले होते, रायफलच्या दस्त्याने त्याची कवटी फोडली होती. सार्जंट-मेजरच्या लक्षात आले की, ज्यांनी मानवजातीच्या नियमांचे उल्लंघन केले होते व त्यामुळे जे स्वतःच त्या नियमाच्या मर्यादेपलिकडे गेले होते, अशा जर्मनांविरुद्ध तिने हात उगारला होता. म्हणूनच, त्यांच्या अद्याप उबदार असलेल्या शरीरांची तपासणी करताना त्याच्या मनात त्यांच्याविषयी केवळ घृणा होती. जणू उकीरडा हाताळावा तशी किळस होती...

त्याला हवी ती वस्तू मिळाली: त्याचा तंबाखूचा बटवा. नुकत्याच मेलेल्या व आता मुकाट पडलेल्या धिप्पाड जर्मनाच्या खिशात त्याला तो सापडला. त्याचा स्वतःचा तो बटवा होता व त्यावर अक्षरे विणलेली होती: "आपल्या मायभूमीचे रक्षण करण्याऱ्या लाडक्यास." तो बटवा त्याने पंजात घट्ट दाबला. ज्या बटव्यासाठी सोन्या धावली होती व तिला आपल्या प्राणांची किंमत मोजावी लागली होती... वाटेत आडव्या येणाऱ्या केसाळ हातावर त्याने लाथ मारली व तो झेन्यापाशी गेला. अर्धवट हुंदकत आणि अर्धवट घुसमटत अजूनही ती उकीडवी बसून होती.

"जा इथून..." ती म्हणाली.

त्याने आपल्या उघडया पंजात तंबाखूचा बटवा धरून तिच्या डोळयांसमोर आणला. झेन्याने पटकन मान वर उचलली— तिने बटवा ओळखला.

"ऊठ, झेन्या."

त्याने तिला उठायला मदत केली. मोकळया जागेत तिला

परत घेऊन जाण्याचा त्याचा इरादा होता. झेन्याने एक पाऊल उचलले, ती थबकली आणि तिने मानेने नकार दिला.

"पुरे झालं," तो म्हणाला. "पोटभर रडून घेतलंस, आता खूप झालं. एक गोष्ट समजून घेतली पाहिजे. ते माणसं नाहीत–जनावरंसुद्धा नाहीत. ते नुसते फॅसिस्ट आहेत, कॉम्रेड कोमेल्कोवा. म्हणून त्यांच्यावर एकदा नजर टाक."

झेन्याने त्यांना पाहण्यास नकार दिला व सार्जंट-मेजरनेही कार्मे ताणून धरले नाही. त्याने त्यांच्या सबमशिनगन व काडतूसांचा कबजा घेतला, त्यांच्या कुप्या घेण्याचाही त्याचा इरादा होता; पण कोमेल्कोवाकडे नजर टाकल्यावर त्याने इरादा बदलला. मरोत त्या कुप्या–दोन कुप्यांमुळे असे काय कल्याण होणार होते? आणि कोमेल्कोवाला ह्या प्रसंगाची आठवण देणाऱ्या वस्तू जेवढ्या कमी, तेवढे अधिक बरे होते.

मुडदे लपवून न ठेवण्याचा त्याने निर्णय घेतला. त्या छोट्या मोकळ्या जागेत सांडलेले सगळे रक्त खरवडून स्वच्छ करणे शक्य नव्हते. मग काय उपयोग? संध्याकाळ जवळ येत होती आणि लौकरच त्यांना कुमक लाभणार होती. जर्मनांपाशी आता थोडा अवधी उरला होता आणि हा उरलेला अवधी त्यांना जास्तीत जास्त खडतर जावा, अशी सार्जंट-मेजरची इच्छा होती. खुशाल जर्मनांना चिंता करूं देत; त्यांचे टेहळे कुणी ठार मारले याबद्दल खुशाल त्यांना तर्क करूं देत आणि धुंडाळू देत; प्रत्येक आवाजाची, प्रत्येक सावलीची खुशाल त्यांच्या मनात धडकी भरूं देत.

वाटेत भेटलेल्या पहिल्याच पाण्याच्या डबक्याशी (पिंगटकेशा मुलीच्या तोंडावर जेवढे ठिपके होते, तेवढी तेथे पाण्याची डबकी पसरलेली होती) सार्जंट-मेजरने हात-तोंड धुतले,

कुडत्याची कॉलर ठाकठीक केली व तो येवगेनियाला म्हणाला :

"हवं तर तोंड धुवून घे !"

तिने डोके हलवले. अजूनही ती धक्क्यातून सावरली नव्हती हे स्पष्ट होते व त्याचा कोणताही प्रयत्न तिला ठिकाणावर आणण्यास यशस्वी ठरत नव्हता... सार्जंट-मेजरने उसासा टाकला.

"आपल्या पोरींपाशी स्वत:च जाशील, का मी तुझ्याबरोबर येऊ ?"

"मी एकटी जाईन."

"तर मग जा. सोन्यापाशी या सगळ्याजणी. म्हणजे तिथं... एकटीला जायची भीती वाटत नाही ना ?"

"नाही."

"तरीही सावध रहा. समजतं ना ?

"समजतं."

"जा, पळ. तिथं वेळ दवडू नका. शोक नंतर करू."

त्यांची ताटातूट झाली. दृष्टीआड होईपर्यंत सार्जंट-मेजर पाठमोऱ्या झेन्याला पहात राहिला. तिची जाण्याची तऱ्हा त्याला आवडली नव्हती. ती केवळ स्वत:ला ऐकत होती, तिच्या अंतरंगात जे चालू होते ते ऐकत होती, पण शत्रूचा तिला विसर पडला होता. छे:, काय पण सैनिक मिळाले होते...

अर्धमिटले डोळे आकाशाकडे रोखलेला सोन्याचा देह पडून होता. सार्जंट-मेजरने त्या डोळ्यांना पूर्ण मिटवण्याचा परत एकदा अयशस्वी प्रयत्न केला. सोन्याच्या कुडत्याच्या खिशांची बटणे उघडून तिचे 'कम्सामोल' कार्ड, अनुवादक-विद्यालयाचा कागद, दोन पत्रे आणि एक फोटो एवढ्या वस्तू त्याने बाहेर

काढल्या. नागरी पोषाखातील लोकांचा तो सामूहिक फोटो होता, पण मध्यभागी कोण होते हे सार्जंट-मेजरला सांगता आले नसते, कारण सोन्याला ठार करणाऱ्या सुऱ्याने त्या ठिकाणी छिद्र पाडले होते. तरीही, त्याने त्या फोटोत सोन्याला ओळखून काढले. रुंद कॉलरचा, लांब बाहृयांचा फ्रॉक घातलेली सोन्या त्या गटाच्या एका टोकाला उभी होती आणि तिची नाजुकुळी मान जोखडामधून बाहेर यावी तशी त्या कॉलरमधून वर डोकावत होती. त्याला आदल्या दिवशीचे संभाषण आठवले, सोन्याचे दुःख आठवले आणि सोन्याच्या, प्रायव्हेट सोफिया सालोमोनोवना गूर्विचच्या, शूर मरणाबाबत लिहायला कुणीही नव्हते ह्याची त्याला विषादपूर्वक जाणीव झाली. त्याने सोन्याचा छोटा हातरुमाल उचलला, आपल्या ओठांनी ओला केला, तिच्या मृत पापण्यांवरील रक्त पुसून काढले आणि तिचा चेहरा झाकून टाकला.

तिचे दस्तऐवज त्याने स्वतःच्या छातीवरील डाव्या खिशात ठेवले—स्वतःच्या पक्षाच्या सदस्यत्वाच्या कार्डाशेजारी. तो सोन्याशेजारी बसला आणि तीनदा आठवण काढलेल्या बटव्या-मधून तंबाखू घेऊन स्वतःसाठी सिगारेट वळू लागला.

त्याचा संताप विरला होता, त्याच्या अंतःकरणामधील वेदनाही शमली होती. आता फक्त दुःखाने, विषण्णतेने त्याला घेरले होते. शोकाने तो घुसमटला होता. पण आता विचार करायला, निरवानिरव करायला आणि पुढच्या गोष्टी ठरवा-यला सवड होती.

जर्मन टेहळ्यांना ठार मारून त्याने स्वतःचे अस्तित्व उघड-कीला आणले होते, ह्याचा त्याला खेद वाटत नव्हता. काळ त्याच्या बाजूने होता. आता त्याने मुख्य ठाण्याला वर्दी मिळे-

पर्यंत वाट पहायची होती. परिस्थितीचा उत्तम परामर्श घ्यायला एका तुकडीला लौकरच हुकूम मिळणार होता. तीन तासपर्यंत, कदाचित जास्तीत जास्त पाच तासपर्यंत, चौदा जर्मनांना थोपवून धरण्याचे काम त्या चौघांना पार पाडायचे होते व ही कामगिरी ते पेलू शकतील ह्याची त्याला खात्री होती. विशेषत: आता जर्मनांना त्यांनी मुख्य रस्ता बदलायला लावला होता व लेगोन्तोवो सरोवराला वळसा घालायला लावला होता, त्यामुळे त्याचे काम थोडे सोपे बनले होते. जर्मनांना तब्बल चोवीस तास आणखी पायपीट करावी लागणार होती.

सर्व वस्तू बरोबर घेऊन त्याच्या मुली आता त्याच्यापर्यंत येऊन ठेपल्या होत्या. दोघीजणी गैरहजर होत्या – भिन्न पद्धतीं-नी – पण त्यांच्या वस्तू गटापाशी होत्या. सधन कुटुंबाप्रमाणे ह्या गटापाशी भरपूर साठा जमला होता. सोन्याचा देह पाहताच गाल्या चेत्वेर्ताक थरथर कापू लागली आणि किंकाळी फोडण्याच्या बेतात होती, पण ओस्यानीनाने कठोर आवाजात तिला हुकूम केला :

"आता इथं तमाशा नको!"

गाल्या चूप झाली. सोन्याच्या डोक्यापाशी गुडघे टेकून बसली व मूकपणे रडू लागली. रीताचा श्वासोच्छ्वास मोठ्यांदा चालला होता. तिचे डोळे कोरडे असले, तरी धगधगत्या निखाऱ्यांप्रमाणे ते भासत होते.

"आता आवश्यक ते करा," सार्जंट-मेजर म्हणाला.

त्याने कुऱ्हाड उचलली. अशा आणीबाणीला स्वत:पाशी फावडे नसल्याबद्दल त्याला मनाशी हळहळ वाटत होती. थडग्यासाठी योग्य जागा तो शोधू लागला. सगळीकडे खडक होते आणि खणायला मातीच सापडत नव्हती. शेवटी त्याला

जमिनीत एक खळगा आढळला. काही फांद्या तोडून त्याने त्या खळग्याच्या तळापाशी पसरल्या आणि तो परत गेला.

"उत्तम मार्क मिळवायची," ओस्यानीना म्हणाली. "शाळेत आणि विद्यापीठात, दोन्ही ठिकाणी तिला उत्तम मार्क मिळाले होते."

"होय," सार्जंट-मेजर म्हणाला, "कविता वाचायची."

पण स्वत:शी तो म्हणाला: ही गोष्ट महत्त्वाची नव्हती. महत्त्वाची गोष्ट म्हणजे सोन्याला मुले झाली असती, त्या मुलांना पुढे मुले झाली असती आणि वंश चालत राहिला असता. पण आता तो वंश, तो धागा, तुटला होता. मानवजातीच्या अखंड वस्त्रामधील एक छोटा धागा सुऱ्याने तोडून टाकण्यात आला होता.

"उचला तिला," तो म्हणाला.

कोमेल्कोवाने आणि ओस्यानीनाने मृत सोन्याचे खांदे धरले व चेत्वेर्ताकने पाय पकडले. अडखळत व हेलकावे खात त्या सोन्याचा देह वाहून नेत होत्या. तात्पुरत्या बनवलेल्या पादत्राणांपायी चेत्वेर्ताक फारच अडखळत होती. सोन्याचा ओव्हरकोट हाती धरून सार्जंट-मेजर त्यांच्या पाठीमागून चालत होता. खळग्यापाशी आल्यावर तो म्हणाला:

"आता थांबा. क्षणभर तिला इथं ठेवा."

थडग्याच्या काठाशी त्यांनी सोन्याचा देह ठेवला. जमीन उंच-सखल असल्यामुळे तिचे डोके डुगडुगत राहिले. शेवटी कोमेल्कोवाने सोन्याच्या गालाखाली तिची टोपी आधाराला ठेवली. सार्जंट-मेजरने क्षणभर विचार केला व तो जे काही करणार होता ते त्याला स्वत:लाच अप्रिय वाटत असल्यामुळे ओस्यानीनाकडे न पाहताच तो तिच्यावर खेकसला:

"तिच्या पायांशी धरा."

"कशाला?"

"सांगतो तसं करा! आणि तिथं नाही—गुडघ्यांपाशी."

त्याने एक बूट तिच्या पायामधून उपसला.

"कशाला?" ओस्यानीना ओरडली. "हिंमत कशी झाली?"

"त्यांची अधिक गरज असलेली कुणीतरी व्यक्ती आपल्यात आहे हे दिसत नाही काय?"

"नाही... नाही... नाही!.." मागे सरत चेत्वेर्ताकि भ्रमिष्टाप्रमाणे उद्गारली.

सार्जंट-मेजरने उसासा टाकला. "पोरींनो, आपण इथं खेळ खेळत नाही. जिवंत माणसांबद्दल आपल्याला विचार करायला हवा—युद्धाचा हा कायदा आहे. धर, ओस्यानीना, हा माझा हुकूम आहे."

त्याने दुसरा बूट खेचून काढला व तो गाल्या चेत्वेर्ताककडे वळला.

"त्यांना पायात चढव आणि मूर्खपणा पुरे! तुझ्या भावना जाणून घ्यायची माझी इच्छा नाही. जर्मन आपल्यासाठी वाट पहात थांबणार नाहीत."

त्याने थडग्यात उडी टाकली, सोन्याला उचलले, तिच्या ओव्हरकोटात तिला गुंडाळले व खळग्यात खाली ठेवले. मुलींनी दिलेल्या दगडांनी त्याने थडगे बुजवले. वेळ वाया न घालवता मुकाटपणे त्यांनी काम उरकले. लौकरच तेथे एक उंचवटा उभा झाला. त्याच्या माथ्यावर सार्जंट-मेजरने सोन्याची टोपी ठेवली व वजनासाठी टोपीवर एक खडा ठेवला. कोमेल्कोवाने एक हिरवी डहाळी तेथे वाहिली.

"आपण नकाशावर ह्या जागेची खूण करून ठेवू," तो

म्हणाला. "युद्ध संपल्यानंतर इथं तिचं स्मारक उभारू."

नकाशावर त्याने ती जागा शोधून काढली व तेथे एक फुली केली. त्याने वर नजर टाकली तेव्हा चेत्वेर्तािकचा एक पाय अद्याप फडक्यांमध्येच गुंडाळलेला त्याला आढळला.

"प्रायव्हेट चेत्वेर्तािक, काय झालं? बूट का घातले नाहीत?"

चेत्वेर्तािक थरथर कापू लागली. "नाही! .. नाही, नाही, नाही! तसं चांगलं नाही! वाईट असतं! मला माहीत आहे, माझी आई वैद्यकीय खात्यात काम करते..."

"पुरे झाल्या तुझ्या थापा," ओस्यानीना एकदम संतापून म्हणाली. "बस्स! तुला आई नाही. आणि कधीही नव्हती! तू टाकून दिलेली होतीस आणि उगीच मनात रचून गोष्टी सांगू नकोस."

गाल्याला रडू कोसळले. खेळणे मोडल्यानंतर लहान मुलाच्या डोळ्यांमधून जशी दुःखाची, दुखावल्याची आसवे ओघळतात, तशी आसवे ती ढाळू लागली.

## १०

"कशाला असं, कशाला?" तिटकाऱ्याने झेन्या म्हणाली व चेत्वेर्तािकला तिने मिठी घातली. "आपण असा दुष्टावा बाळगून चालणार नाही. एरवी जर्मनांप्रमाणंच आपणसुद्धा पाशवी बनू..."

ओस्यानीना गप्प राहिली.

गाल्या खरोखरीच टाकून दिलेले मूल होती आणि तिचे 'चेत्वेर्तािक' हे आडनांवसुद्धा [चतकोर–अनु.] तिला अनाथा-

श्रमात देण्यात आले होते—कारण ती उंचीने सर्वांत लहान होती, एक-चतुर्थांशाने कमी होती.

एका माजी मठात मुलांचा अनाथाश्रम होता. मठाच्या गोलाकार, उंच, आवाज घुमणाऱ्या छतावरून लठ्ठ, राखाडी रंगाच्या वाळव्या खाली पडायच्या. घाईघाईने सफेती केलेल्या भिंतींवरून दाढीवाल्या संतांच्या आकृती पूर्णपणे पुसल्या गेलेल्या नव्हत्या. ते संत डोळे वटारून मुलांकडे पहात आहेत असे भासायचे. मठातील गुंफा तळघरांप्रमाणे थंडगार गोठवणाऱ्या होत्या.

वयाच्या दहाव्या वर्षी गाल्याने एक अचाट उद्योग करून प्रसिद्धी मिळवली होती. मठ स्थापन झाल्यापासून त्या वास्तूला अशी घटना कधी माहीत नव्हती. एके रात्री मोरीवर जाण्यासाठी म्हणून गाल्या बिछान्यामधून उठली व नंतर आपल्या भेदक किंकाळयांनी तिने सबंध अनाथाश्रमाला जागे केले. झोपेतून धडपडत उठून आलेल्या कर्मचाऱ्यांना अर्धवट अंधाऱ्या कॉरीडॉरच्या फरशीवर गाल्या आढळली. गाल्याने त्यांना व्यवस्थित स्पष्टपणे समजावून सांगितले की, एका दाढीवाल्या म्हाताऱ्या माणसाने स्वतःच्या भूमिगत गुंफेत तिला खेचून नेण्याचा प्रयत्न केला होता.

"हल्ल्याच्या खटल्याचे" कामकाज सुरू झाले. त्या सबंध पेठेत एकही दाढीवाला म्हातारा नव्हता ह्या वस्तुस्थितीमुळे भलताच अवघड पेच निर्माण झाला होता. चौकशीसाठी बाहेरून आलेल्या लोकांनी आणि स्थानिक शेरलॉक होम्सनी गाल्याला चिकाटीने प्रश्न विचारले होते व दरवेळी गाल्या नवनव्या तपशीलांची भर टाकत होती. शेवटी अनाथाश्रमाच्या वडीलधाऱ्या कोठीवाल्याने शोधून काढले की, संपूर्ण प्रसंग

गाल्याने स्वतःच्या कल्पनेतून निर्माण केलेला होता. गाल्याची त्याच्याशी विशेष मैत्री होती आणि त्यानेच तिचे नादमय आडनांव शोधून काढले होते.

इतर मुलांच्या चेष्टेचे आणि खोडयांचे सतत लक्ष्य बनलेल्या गाल्याने स्वसंरक्षणार्थ अखेरीस ती काल्पनिक कथा रचली होती व त्या कथेची नायिका ती स्वतः बनली होती. तिची कथा खूपशी 'करंगळीएवढया मुला' च्या गोष्टीसारखी होती. पण पहिली बाब म्हणजे मुख्य पात्र मुलगा नसून मुलगी होते आणि दुसरी गोष्ट म्हणजे दाढीवाले म्हातारे व भयाण गुफांची त्यात महत्त्वाची भूमिका होती. त्या गोष्टीने गाल्याला प्रसिद्धी मिळाली, पण लोकांना हळूहळू त्या गोष्टीचा कंटाळा आला, तशी गाल्याची लोकप्रियता ओसरली. नवी गोष्ट रचण्याचा नाद गाल्याने सोडून दिला, पण कशा कुणास ठाऊक, संन्याशांनी लपवून ठेवलेल्या खजिन्यांबद्दलच्या अफवा अनाथाश्रमात हळूहळू पसरू लागल्या. मुलांमध्ये ह्या अफवेचा झपाट्याने फैलाव झाला आणि थोडयाच काळात मठाभोवतालचे सर्व आवार खणलेल्या खड्डयांनी भरून गेले. ही भानगड अनाथाश्रमाच्या अधिकाऱ्यांनी मिटवली न मिटवली, तोच नवी भानगड उपस्थित झाली: तळघरांमधून पांढऱ्या झग्यांमधील भुते वावरू लागली. अनेकांना त्या भुतांचे दर्शन घडले होते आणि लहान मुले तर रात्रीची बिछाना सोडेनाशी झाली होती. त्यामुळे पुढच्या भानगडी निस्तराव्या लागत होत्या. मोठे संकट उपस्थित होईपर्यंत ह्या भानगडीने विराट रूप धारण केले व शिक्षकांना गुप्तपणे भुतांचा शोध घेणे भाग पडले. सर्वांत पहिले भूत पकडण्यात आले – बिछान्यावरील पांढरी चादर अंगाभोवती गुंडाळून घेतलेली ती गाल्या चेत्वेर्ताक होती.

त्यानंतर गाल्या निवली. ती कसून अभ्यास करायची, लहान मुलांच्या देखभालीत मदत करायची आणि गानवृंदात भाग घ्यायलाही ती तयार झाली. वस्तुतः फक्त मुख्य गायिका म्हणून कार्यक्रम करायचे, सुंदर सुंदर सायंकालीन पोषाख घालायचे आणि सार्वत्रिक कौतुकाचा विषय व्हायचे, अशी तिने सर्व आयुष्यभर स्वप्ने पाहिली होती. त्याच सुमाराला ती प्रथमच प्रेमात पडली. स्वतःच्या सर्व कृतींना गूढतेचे वलय देण्याचा तिला नाद असल्यामुळे, लौकरच सर्व अनाथाश्रमभर छोटचा चिठ्ठ्या, पत्रे, रडारड आणि संकेतभेटींचा धुमाकूळ माजला. परत एकदा तिचे इच्छित तिला लाभत होते. अनाथाश्रमाच्या अधिकाऱ्यांनी तिची ब्याद घालवून देण्याचे ठरवले आणि ग्रंथपालन-विद्यालयात तिची पाठवणी केली, तिला भरपूर विद्यावेतनही देऊ केले.

युद्ध सुरू झाले तेव्हा गाल्या तिसऱ्या वर्षाचा अभ्यासक्रम पूर्ण करत होती. युद्धाच्या पहिल्याच सोमवारी तिचा संपूर्ण गट स्थानिक सैनिकभरती केंद्रावर हजर झाला. गटाला भरती करण्यात आले, पण गाल्याला नकार मिळाला. तिची उंची आणि तिचे वय, ह्या दोन्ही बाबतीत ती कमी पडत होती. गाल्याला स्वस्थ बसणे मानवण्यासारखे नव्हते. लष्करी अधिकाऱ्यांना ती सतत सतावत राहिली. निर्लज्जपणे ती थापा मारू लागली. अनेक रात्रींच्या जागरणामुळे डोके ठिकाणावर नसलेल्या एका कर्नलला चकवण्यात शेवटी तिला यश आले. त्याने गाल्याच्या बाबतीत अपवाद केला व विमानविरोधी तोफखान्याच्या तुकडीत तिची पाठवणी केली.

जे स्वप्न वास्तव बनते, त्यातील रोमांचकता वास्तव घडण्याच्या प्रक्रियेत नेहमीच नाहीशी होत असते. वास्तवता

कठोर आणि क्रूर ठरली व शौर्यशाली प्रयत्नांऐवजी लष्करी नियमांचे काटेकोर पालन करणे आवश्यक बनले. हवेत तरंगण्याची आणि नाविन्याची भावना लौकरच अदृश्य झाली. रोजच्या कामांना गाल्याच्या युद्धआघाडीविषयक कल्पनांमध्ये कुठेच स्थान मिळेना. गाल्या गोंधळून गेली, तिचा उत्साह ओसरला आणि अनेकदा इतरांपासून लपवून ती रात्रीची रडत असे. पण मग झेन्या उगवली आणि परत एकदा आयुष्यात रंगीबेरंगी धागे गुंफू लागले.

पण खोटे न बोलणे गाल्याच्या कुवतीबाहेरचे होते. प्रत्यक्षात तो खोटेपणा नव्हता, तर इच्छांना वास्तवरूप देण्याचा तो प्रयत्न होती. अशातूनच तिने वैद्यकीय खात्यात काम करणारी स्वतःची आई निर्माण केली होती आणि ह्या आईच्या अस्तित्वावर खुद्द गाल्याचाही विश्वास बसू लागला होता...

त्यांच्याकडून बराच वेळ गमावला गेला होता आणि सार्जंट-मेजरच्या मनात भीतीची भावना डोकावू लागली होती. ह्या जागेतून त्यांनी लौकरात लौकर बाहेर पडायला पाहिजे होते, जर्मनांचा ठावठिकाणा शोधायला हवा होता, त्यांच्या पाठी मसेमिरा लावायला हवा होता व नंतर स्वतःच्या टेहळयांच्या गोधात त्यांना हैराण करायला हवे होते. तरच सार्जंट-मेजरचा जर्मनांवर वरचष्मा राहिला असता. त्यांना हव्या त्या पद्धतीने तो नाचवू शकला असता आणि वाट पहात राहिला असता... कुमक येण्याची आणि जर्मनांना वेढा घालण्याची.

होय... त्यांचा खूप वेळ गमावला होता. सोन्याचा दफनविधी, चेत्वेर्ताकची समजूत पटवणे... ह्या सगळयात वेळ गेला होता. दरम्यान सार्जंट-मेजरने सबमशिनगन तपासल्या,

दोन जादा रायफली दडवून ठेवल्या आणि काडतूसे वाटली. ओस्यानीनाला त्याने विचारले :

"सबमशिनगन झाडली आहेस कधी?"

"फक्त सोविएत बनावटीची."

"आता जर्मन वापर. तुला जमेल असं वाटतं." त्याने तिला सबमशिनगन कशी हाताळायची ते समजावून सांगितले आणि इशारा दिला: "लांब फैरी उडवू नकोस–त्यामुळं नळी वर होते. छोटचा फैरी झाड."

सरतेशेवटी सुदैवाने ते निघाले... प्रथम सार्जंट-मेजर, चेत्वेर्ताक आणि कोमेल्कोवा मध्यभागी आणि शेपटाला ओस्यानीना. सावधपणे ते आवाज न करता जात होते, पण तरीही स्वतःच्या विचारांमध्ये ते गुंतले असावेत, कारण जर्मनांशी त्यांची चक्क टक्कर घडणे थोडक्यात हुकली. तो एक चमत्कारच झाला.

सुदैवाने सार्जंट-मेजरने जर्मनांना प्रथम पाहिले. दोन जर्मन थेट त्यांच्या दिशेने येत होते व बाकीचे त्यांच्यामागून येत होते. सार्जंट-मेजरला जर सात पावलांनी उशीर झाला असता, तर त्यांची लष्करी सेवा निकालात निघाली असती–दोन मस्त फैरी पुरेशा होत्या.

पण त्याने ती सात पावले उचलली होती व सर्व काही आता त्याच्या पथ्यावर पडणारे होते. मागे लपायला आणि मुलींना विखुरण्याचा इशारा द्यायला त्याला अवसर मिळाला; खिशातून ग्रेनेड उपसायला त्याला सवड मिळाली. सुदैवाने ग्रेनेड कृतीसाठी सज्ज होता आणि दगडाआडून त्याने तो भिरकावला. स्फोटानंतर ताबडतोब त्याने सबमशिनगनची एक फैर जर्मनांवर उडवली.

लष्करी नियमावलीत अशा लढाईला "समोरासमोरच्या झटापटी" म्हणतात. त्यांचे वैशिष्टय म्हणजे शत्रूला तुमच्या बळाचा अंदाज नसतो—तुम्ही टेहळे आहात अथवा आघाडीचे पथक आहात ह्याचा निर्णय करणे शत्रूला कठीण जाते. त्याला सतत तर्कात अडकवून ठेवणे, भानावर यायला सवड न देणे, हे महत्त्वाचे असते.

अर्थात सार्जंट-मेजरने जाणीवपूर्वक ह्या मुद्द्यांचा विचार केला नव्हता—त्याच्या स्मरणशक्तीवर ते कोरले गेले होते, आयुष्यभरासाठी कोरले गेले होते आणि क्षणभर त्याच्या मनात एकच विचार आला की, त्याने गोळ्या झाडायला पाहिजे होत्या. मग त्याला स्वत:बरोबरच्या मुलींची आठवण झाली. त्यांना आडोसा घेणे जमले होते का? मोर्चा धरणे जमले होते का? अथवा त्या नुसत्याच पळून गेल्या होत्या?

कानठळ्या बसवणारा आवाज घुमत होता, कारण तो टिपला होता त्या दगडाच्या दिशेने सर्व प्रभावी सबमशिनगनां-मधून जर्मन गोळीबार करत होते. दगडाच्या कपचांनी त्याच्या तोंडावर जखमा झाल्या, धुळीने त्याचे डोळे भरून गेले आणि डोळ्यातून वाहणारे पाणी पुसण्यास त्याला अवसर नसल्यामुळे काहीही पाहणे त्याला शक्य होईना.

त्याच्या शस्त्राचा खटका नुसताच वाजला. काडतूसे संपली होती. त्याला ह्याच गोष्टीची भीती वाटत होती, कारण परत काडतूसे ठासण्यात मौलिक क्षण जाणार होते आणि ते क्षण त्यांना जीवन अथवा मृत्यू यांचा कौल देणारे होते. गप्प पडलेल्या सबमशिनगनच्या दिशेने जर्मन झेपावू शकले असते; सुमारे दहा मीटर अंतर त्यांनी कापले असते आणि मग त्याचा निकाल लागला असता.

पण जर्मन कधीच पुढे सरसावले नाहीत. त्यांनी डोकी-सुद्धा वर उचलली नव्हती, कारण दुसऱ्या सबमशिनगनने – ओस्यानीनाच्या – त्यांना दाबून धरले होते. ती काळजीपूर्वक, अगदी जवळ नेम धरून छोट्या फैरी झाडत होती व वास्कोव-ला मौलिक क्षणांचा लाभ करून देत होती. अशा क्षणांबद्दल तुमच्या उपकारकर्त्याला आयुष्यभर वोदका पाजायची परंपरा आहे.

लढाई किती वेळ चालली हे नंतर कुणीच सांगू शकले नाही. सेकंद आणि मिनिटांमध्ये हिशोब केला असता, तर ती अगदी ओझरती झटापट होती, नियमावलीत नमूद केलेल्या कोणत्याही "समोरासमोरच्या झटापटी" सारखी. पण शारीरिक सामर्थ्य, मानसिक ताण आणि संभाव्य धोक्याचा विचार केल्यास माणसा-च्या आयुष्याचा एक भला मोठा भाग तिच्यात खर्ची पडला होता व काहींचे तर संपूर्ण आयुष्यच.

गाल्या चेत्वेर्ताक एवढी घाबरली होती, की एकही गोळी झाडणे तिला जमले नाही. एका आडोशाच्या दगडामागे कानां-वर हात ठेवून ती पालथी पडून राहिली होती. तिची रायफल तिच्याशेजारी तिने टाकून दिलेली होती. झेन्या पटकन सावरली होती – अनमानधपक्याने ती रायफल झाडत होती. नेम धरायला सवडच नव्हती. तेथे काही निशाणबाजीचे मैदान नव्हते. कुणालातरी गोळी बसेल, एवढीच आशा बाळगून ती रायफल झाडत होती .

दोन सबमशिनगन आणि एक रायफल, एवढीच शस्त्रे वापरण्यात आली होती, पण तरीही जर्मनांनी माघार घेतली. ते घाबरले होते म्हणून मुळीच नव्हे. पण त्यांना चित्र सुस्पष्ट नव्हते. म्हणून गोळीबाराला थोडा वेळ गोळीबाराने प्रत्युत्तर

देऊन त्यांनी माघार घेतली होती – गोळीबाराचा आडोसा न घेता, आडोशाची तुकडी न बाळगता, त्यांनी थेट जंगलात माघार घेतली होती.

अचानक गोळीबार थांबला होता. फक्त कोमेल्कोवा अजूनही रायफल झाडत होती. दरवेळी रायफलीच्या धक्क्याने तिचे शरीर हादरत होते. काडतूसे संपली तेव्हा तीसुद्धा थांबली. जणू काही हवा खायला आत्ताच वर यावे अशा रीतीने तिने सार्जंट-मेजरकडे कटाक्ष फेकला.

"संपलं..." वास्कोवने सुस्कारा टाकला.

शांतता एवढी नीरव होती की, कानात ती घुमत असल्याचे जाणवत होते. बंदुकीच्या दारूचा, दगडाच्या धुळीचा आणि धुराचा दर्प सुटला होता. सार्जंट-मेजरने हातांनी स्वतःचा चेहरा पुसला. त्याला हातांवर रक्त आढळले – त्याच्या चेहऱ्या-वर दगडाच्या कपचांमुळे जखमा झाल्या होत्या.

"जखमी झालात काय?" ओस्यानीनाने अस्पष्ट आवाजात विचारले.

"नाही," सार्जंट-मेजर उत्तरला. "तुझी तिकडं बारीक नजर राहूं दे ओस्यानीना."

दगडावरून डोकावण्यासाठी तो हळूच वर उठला – गोळीबार झाला नाही. त्याने भोवती पाहिले. राईशेजारच्या भोजाच्या झाडीत शेंडे हलत होते. पिस्तूल हातात पकडून तो पुढे सरला आणि धावत दुसऱ्या दगडामागे जाऊन लपला. त्याने परत डोकावून पाहिले – ग्रेनेडच्या स्फोटाने चिंध्या झालेल्या शेवाळावर रक्ताचे काळसर डाग होते. खूप रक्त सांडलेले होते, पण मुडदे मात्र कुठेच दिसत नव्हते. त्यांनी प्रेतांना बरोबर नेले असावे.

दगडांमधून आणि झुडूपांमधून टेहळणी केल्यानंतर सार्जंट-मेजरने निष्कर्ष काढला होता की, जर्मनांनी माघारी आडोशाची तुकडी ठेवलेली नव्हती. तो ताठ उभा राहिला व शांत मनाने मुलींपाशी परतला. मात्र त्याच्या चेहऱ्याला झोंबणाऱ्या वेदना होत होत्या आणि तो कमालीचा थकला होता. धूम्रपान करण्याचीसुद्धा त्याला इच्छा होत नव्हती. नुसते स्वस्थ पडून रहावे, निदान दहा मिनिटे स्वस्थ पडावे, असे त्याला वाटत होते. पण मुलींपाशी तो पोहचायच्या आधीच ओस्यानीनाने अचानक त्याला प्रश्न केला:

"तुम्ही कम्युनिस्ट आहात, कॉम्रेड सार्जंट-मेजर?"

"मी बोल्शेविक पक्षाचा सभासद..."

"आमच्या कम्सामोल बैठकीचं तुम्ही अध्यक्षपद घ्यावं अशी विनंती करतो आहोत."

सार्जंट-मेजरचा स्वत:च्या कानांवर विश्वास बसेना.

"बैठक?"

एकदम त्याने पाहिले की, चेत्वेर्ताकिचे डोळे रडून रडून सुजले होते आणि बंदुकीच्या दारूच्या भुकटीने चेहरा काळवंडलेली, जिप्सीप्रमाणे भासणारी कोमेल्कोवा क्रुद्ध नजरेने फिस्कारत होती:

"भेकड!"

एकूण प्रकार त्याच्या ध्यानात आला.

"बैठक? छान!" संतापाचा पारा चढत असलेला सार्जंट-मेजर बोलू लागला. "फार उत्तम—बैठक. तर आता आपण बैठक घेणार, कॉम्रेड चेत्वेर्ताकिच्या वर्तनाची चर्चा करणार, ती लायक नसल्याबद्दल तिचा धिक्कार करणार आणि सर्व गोष्टींची व्यवस्थित नोंद करणार—हेच पाहिजे ना तुम्हाला?"

कुणीही त्याला उत्तर दिले नाही. गाल्या चेत्वेर्ताकिसुद्धा ाडायची थांबली व त्याचे बोलणे ऐकू लागली.

"आणि मग जर्मन त्यावर सह्या करतील. हेच हवंय तुम्हाला? नाही, आपल्याला हे नकोय! म्हणून, तुमचा सार्जंट-मेजर आणि एक कम्युनिस्ट ह्या नात्यानं, सर्व बैठकांवर मी तात्पुरती बंदी घालतोय. सध्याची परिस्थिती काय आहे ती ऐका: जर्मन राईत परतलेत. ग्रेनेड फुटला तिथं खूप रक्त सांडलंय—म्हणजे कुणीतरी ठार झालाय. आता त्यांचे १३ आहेत असं आपण गृहीत धरू शकतो—हा पहिला मुद्दा. दुसरा मुद्दा म्हणजे माझ्यापाशी काडतूसांची एक पूर्ण माळ आहे. ओस्यानीना, तुझ्यापाशी?"

"दीड आहे."

"ठीक. आता भित्रेपणाविषयी—भित्रेपणा घडला नाही. पोरींनो, दुसऱ्या लढाईत भित्रेपणा असू शकतो—पहिल्या लढाईत त्याला गोंधळ म्हणतात. अनुभव नसल्यापायी असं घडतं. बरोबर ना, प्रायव्हेट चेत्वेर्ताक?"

"हो..."

"नसं असेल तर मी हुकूम करतो की, तुझे डोळे आणि वाहणारं नाक पूस. ओस्यानीनानं पुढं जायचं आणि राईवर नजर ठेवायचं. बाकीच्यांनी खायला आणि शक्य तेवढी विश्रांती घ्यायला हरकत नाही. काही प्रश्न आहेत?.. कामाला लागा."

त्यांनी मुकाटपणे खाल्ले. सार्जंट-मेजरला खाण्याची अजिबात इच्छा होत नव्हती. फक्त पाय पसरून बसावे असे त्याला वाटत होते. तरीही त्याने निकराने चर्वण केले, कारण त्याला ताकदीची गरज होती. त्याचे सैनिक मात्र भुकेपायी भराभरा

खात होते, भक्कम तरुण दातांनी चावत होते, एकमेकांच्या नजरा टाळत होते. त्याला हे पाहूनही बरे वाटले–अजून त्यांचा धीर खचला नव्हता, अजून त्या तग धरून होत्या.

एव्हाना सूर्य क्षितिजावर खाली झुकला होता आणि जंगलाची रेषा जसजशी अधिकाधिक काळवंडत जाऊ लागली, तसतशी सार्जंट-मेजरची चिंता वाढत चालली होती. कुमक यायला उशीर होत होता आणि धुवट संधिप्रकाशाचा फायदा घेऊन जर्मनांनी एक तर त्याच्यावर झडप घातली असती, सरोवरांदरम्यानच्या जमिनीच्या चिंचोळया पट्ट्यातून पुढची वाट काढली असती, अथवा जंगलात ते अदृश्य झाले असते. मग त्यांना शोधणार कुठे आणि कसे? त्याने आत्ताच शोध सुरू करायला हवा होता; खऱ्या परिस्थितीला जाणून घ्यायचे असले तर त्याला त्यांच्यापाठी आत्ताच जायला हवे होते. त्याने तसे करायला हवे होते, पण त्याच्यात बळ उरले नव्हते.

होय, त्याच्या इच्छेप्रमाणे गोष्टी घडल्या नव्हत्या. त्याने एक सैनिक गमावला होता व स्वतःची जागा जर्मनांना दाखवली होती. त्याच्या पथकाला विश्रांतीची गरज होती. आणि मदतीचे पथक कुठे होते?

असे होते तरी, ओस्यानीना खात होती तेवढाच वेळ सार्जंट-मेजरने स्वतः विश्रांती घेतली. मग तो उठला व कमरपट्टा घट्ट आवळत कठोर आवाजात म्हणाला: "प्रायव्हेट चेत्वेर्ताक माझ्याबरोबर टेहळणीच्या कामगिरीवर जाईल. ओस्यानीना इथली प्रमुख. व्यवस्थित अंतर राखून तुम्ही आमच्यापाठी यायचं हे तुझं काम. गोळीबार ऐकला, तर लपायचं. हा हुकूम आहे. लपून रहा आणि आम्ही परतेपर्यंत वाट पहा. जर आम्ही परत आलोच नाही, तर मुकाट माघार घ्या.

अगदी चूपचाप. पश्चिमेकडच्या आपल्या पूर्वीच्या जागांमधून... कुणीतरी भेटेपर्यंत... आणि मग सांगा सगळी हकीकत."

अशा कामगिरीवर चेत्वेर्ताकिला त्याने संगती घेऊ नये हा विचार त्याच्या मनाला शिवून गेला होता. कोमेल्कोवा ह्या कामाला अगदी योग्य होती—ती खात्रीशीर कॉम्रेड होती, एका दिवसात दोनदा ती कसोटीला उतरली होती. अशा कसोटचा दिल्याची बढाई एखाद्या पुरुषाला क्वचितच मारता आली असती. तरीही, त्यांचा वरिष्ठ ह्या नात्याने केवळ लष्करी नेता म्हणून त्याला वागता येत नव्हते; त्यांचा शिक्षक म्हणूनही त्याला काम करणे भाग होते. तेसुद्धा लष्करी नियमांना धरून होते.

आणि सार्जंट-मेजरला लष्करी नियमांबद्दल विलक्षण आदर होता. त्याला ते तोंडपाठ होते. त्यांचे तो काटेकोर पालन करत होता. म्हणूनच आता तो गाल्याला म्हणाला: "तुझी पडशी आणि ओव्हरकोट इथं ठेव. माझ्या पावलांवर पाऊल ठेवून यायचं आणि मी काय करतो त्यावर सतत नजर ठेव. आणखी एक गोष्ट—काहीही घडलं, तरी तोंडातून ब्र काढायचा नाही, किंचाळायचं नाही. आणि रडणं एकदम विसरून जायचं!"

चेत्वेर्ताकिने घाईघाईने मान डोलावली. तिच्या डोळ्यांमध्ये भीती दाटली होती...

## ११

जर्मनांनी का बरे लढाई टाळली होती? आपला प्रतिस्पर्धी किती भक्कम (खरे म्हणजे, दुबळा) होता ह्याची त्यांच्या हुशार कानांना कल्पना आली असणार, तरीसुद्धा का?

हे नुसते रिकामपणी सुचलेले विचार नव्हते आणि सार्जंट-मेजर केवळ कुतूहलापायी त्या प्रश्नांचे कोडे सोडवण्याचा प्रयत्न करत नव्हता. तुमच्या शत्रूला तुम्ही जोखले पाहिजे. त्याची प्रत्येक कृती, त्याची प्रत्येक हालचाल तुम्ही पूर्णतया स्पष्ट जाणली पाहिजे. तो स्वत:बद्दल काय विचार करत असावा हे जेव्हा तुम्हाला स्पष्ट समजते, तेव्हाच तुम्ही त्याच्यासारखा विचार करू लागता. सरतेशेवटी, युद्ध म्हणजे कोण कुणाला आधी गोळ्या घालतो, असे नव्हे. युद्ध म्हणजे कोण कुणावर बुद्धीने मात करतो. तुम्हाला स्वतंत्रपणे विचार करणे शक्य व्हावे, खूप आधी विचार करता यावा, दुसऱ्या बाजूइतपत, तुमच्या शत्रूसाठी विचार करता यावा, अशा उद्देशाने नियम आखलेले असतात.

पण सार्जंट-मेजरने मनातल्या मनात घडलेल्या प्रसंगांचा कितीही उलट-सुलट विचार केला, तरी एक गोष्ट स्पष्ट दिसत होती — जर्मनांना त्याच्या गटाची माहिती नव्हती. ह्याचा अर्थ, त्याने ठार मारलेले दोन जर्मन आघाडीच्या पथकातील नव्हते, तर टेहळे होते व त्यांच्या पाठीमागून मुख्य पथक स्वत:च्या भवितव्याला न जाणता येत होते. वास्कोवने हा निष्कर्ष काढला होता, पण त्यापासून कोणता फायदा तो उठवू शकला असता हे मात्र अद्याप स्पष्ट झाले नव्हते.

मेंदू फुटेपर्यंत तो विचार करत होता, पत्त्यांचा डाव पिसावा त्याप्रमाणे वस्तुस्थितीला पिसून काढत होता, पण मुख्य समस्येवर त्याने सतत लक्ष ठेवले होते. अजिबात आवाज न करता तो अक्षरश: तरंगत जात होता, प्रत्येक गोष्टीबाबत सजग होता आणि कान उभे करणे त्याला शक्य असते, तर त्याने अक्षरश: तेही केले असते. पण हलकी झुळूक ना ध्वनी

आणत होती ना वास. त्यामुळे सार्जंट-मेजर सतत न थबकता जात होता. आणि ती हतभागी मुलगी त्याच्या पाठोपाठ रखडत चालली होती. वास्कोव वारंवार मागे वळून तिच्याकडे नजर टाकत होता, पण अद्याप तक्रारीचे कारण नव्हते. त्याचे हुकूम ती पाळत होती, त्याच्या पाठोपाठ येत होती, पण तिच्यात मुळीच उत्साह नव्हता. तिच्या हालचालींमध्ये चपळाई नव्हती. अजूनही मघाच्या गोळीबाराचे विचार तिच्या डोक्यात चालले असावेत.

प्रत्यक्षात गाल्या मघाचा गोळीबार विसरली होती. तिला भेडसावत होते सोन्याच्या मृत, अर्धमिटल्या डोळ्यांचे दृश्य. सोन्याचा राखाडी रेखीव चेहरा आणि रक्ताने कडक बनलेला तिचा कुडता गाल्याच्या डोळ्यांसमोरून हलत नव्हता. आणि... छातीवरच्या दोन जखमा... दाढीच्या पात्याने कापावे तशा. सोन्याचा अथवा मृत्यूचा विचार ती करत नव्हती, तर स्नायूं-मधून घुसत जाणाऱ्या, मानवी मांस टरटरा फाडत जाणाऱ्या सुऱ्याची संवेदना साक्षात अनुभवत होती, तिच्या नाकपुड्यां-मध्ये रक्ताचा उग्र दर्प भरून राहिला होता व तिला उलटी होण्याच्या बेतात होती. प्रत्यक्षापेक्षा काल्पनिक जगात गाल्या नेहमी अधिक क्रियाशीलतेने जगली होती आणि आता तिला हे सर्व विसरण्याची इच्छा होती, ते सर्व पुसून टाकावेसे वाटत होते, पण तसे करणे जमत नव्हते. उलट मनाला सुन्न करून टाकणाऱ्या भीतीने तिला घेरले होते आणि ह्या भयानक ओझ्याखाली दबल्यामुळे तिचे मन इत:पर विचार करू शकत नव्हते.

अर्थात फेदोत एवग्राफीचला ह्याबाबत काहीच कल्पना नव्हती. त्याच्या जीवन-मरणाचे योग ज्या सैनिकाशी निकटतेने

गुंफले गेले होते तो हा सैनिक आधीच मेलेला होता, ह्याची त्याला कल्पना नव्हती. जर्मनांना सामोरे जाण्यापूर्वीच, त्यांच्यावर एकही गोळी झाडण्यापूर्वीच, गाल्या मेलेली होती...

वास्कोवने हात वर केला: ठसे उजवीकडे गेले होते. दगडी पट्ट्यांवर अगदी हलके, अस्पष्ट ठसे होते; पण ओल्या शेवाळावर पाणी भरलेले पायांचे ठसे काळपट दिसत होते. जड ओझे वाहून नेताना जणू इथे जर्मनांचा अचानक तोल गेला होता आणि त्यांच्या पावलांचे ठळक ठसे उमटले होते.

"थांब इथं," सार्जंट-मेजर दबत्या आवाजात म्हणाला.

ठशांना समांतर राहून तो उजवीकडे गेला. झुडूपांमध्ये त्याने शोध घेतला तेव्हा एका छोट्या खळग्यात त्याला प्रेते आढळली. घाईघाईने त्या प्रेतांवर पाला-पाचोळा पसरलेला होता. त्याने काळजीपूर्वक पाचोळा दूर केला. पालथ्या चेहऱ्यां-वर दोन देह पडले होते. त्याने ओणवे होऊन प्रेतांचे निरीक्षण केले. वर पडलेल्या प्रेताच्या डोक्याच्या मागील बाजूस मानेवर एक छोटे स्वच्छ छिद्र होते. रक्ताचा तेथे मागमूस नव्हता, फक्त त्याचे आखूड कापलेले केस त्या जागी किंचित जळलेले होते.

"त्यांनी ह्याला गोळी घातली," सार्जंट-मेजरने निष्कर्ष काढला. "ह्याच्या स्वतःच्याच माणसांनी. डोक्याच्या मागं. जखमी झाला होता, म्हणून त्यांनी खतम केला... त्यांचा कायदा तसा..."

तो थुंकला. होय, प्रेतावर थुंकला. जरी तसे महाभयंकर पाप होते तरीही. पण त्यांच्याबद्दल तिटकाऱ्याविना दुसरी कोणतीही भावना त्याच्या मनात येत नव्हती. त्याच्या दृष्टीने ते कायद्याच्या पलिकडचे होते, मानवतेच्या सीमांपलिकडचे होते.

सरतेशेवटी, माणूस हा माणूस आहे ह्या जाणीवेपायीच तो जनांवरापासून वेगळा ठरतो. ही जाणीव नष्ट होते, तेव्हा तो पशू बनतो. दोन पायांचा, दोन हातांचा पशू. क्रूर पशू, महाभयानक. अशा प्राण्याबद्दल मानवी भावना असू शकत नाहीत, दया-माया वाटू शकत नाहीत. त्याला बेदम पिटून त्याच्या गुंफेत सरपटत परत जायला भाग पाडले पाहिजे. तेथेही त्याला खूप हाणले पाहिजे—एकेकाळी तो माणूस होता ह्याची त्याला आठवण होईपर्यंत; ही समज त्याला येईपर्यंत.

अवघ्या काही तासांपूर्वी, दिवसा, सूडाच्या तहानेने वास्कोव पेटून उठला होता. रक्ताचा बदला रक्ताने. आता अचानक सर्व काही शमले होते—पक्व बनले होते. त्या सूडाच्या तहानेचे द्वेषात रूपांतर झाले होते—थंडा, हिशेबी द्वेष. पण त्यात माथेफिरूपणा नव्हता.

"तर, असा तुमचा कायदा?.. आठवणीत ठेवू."

अत्यंत शांतपणे त्याने आणखी दोन मोजले: आता बारा उरले होते. एक डझन.

चेत्वेर्ताक जेथे वाट पहात होती, तेथे तो परतला. त्याने तिच्या चेहऱ्यावरचा भाव पाहिला—अचानक त्या अंतरंगात काहीतरी मोडून पडल्याचा त्याला भास झाला. ती घाबरली होती. अत्यंत वाईट रीतीने ती घाबरली होती—आतून. अशा प्रकारची भीती तिला जन्मभर पुरून उरली असती. क्षणात वास्कोवने जास्तीत जास्त उल्हसितपणाचा आव आणला. जणू काही ती त्याची प्रेयसी होती अशा तऱ्हेने त्याने तिच्याकडे पाहून स्मित केले व डोळा मारून तो म्हणाला:

"गाल्या, आपण त्यांचे दोन खतम केले! चौदामधून दोन

उणे, म्हणजे राहिले बारा. कॉम्रेड सैनिक, हे काही वाईट नाही. तुझ्या-माझ्या दृष्टीनं अगदी किस झाडकी पत्ती!"

तिच्याकडून एकही शब्द आला नाही, साधे स्मितसुद्धा तिच्या चेहऱ्यावर उमटले नाही. ती फक्त त्याच्याकडे बघत राहिली – त्या डोळ्यांनी त्याला सर्व सांगितले. अशा वेळांना, जर तो पुरुष असेल, तर त्याचा संताप जागा करता येतो – एक जोरदार शिवी हासडून अथवा कानावर सणसणीत ठोसा हाणून. अनुभवाने वास्कोवला हे माहीत होते. पण ह्या मुलीशी काय करायचे – त्याला कल्पना नव्हती. अशा प्रकारचा त्याला अनुभव नव्हता. लष्करी नियमावलीत ह्या मुद्याची दखल घेतलेली नव्हती.

"पावेल कोर्चागिनबद्दल कधी वाचलं आहेस?"

एखाद्या वेड्याकडे पहावे तशा रीतीने चेत्वेर्ताकिने त्याच्याकडे पाहिले. पण तरीही तिने होकारार्थी मान हलवली आणि वास्कोव थोडा जास्त आशावादी बनला.

"तर तू त्याच्याबद्दल वाचलं आहेस, छान. पण मी त्याला प्रत्यक्ष पाहिलंय, जसं आत्ता तुला पाहतोय त्याप्रमाणं! होय. लष्करी आणि राजकीय प्रशिक्षणात चांगले मार्क मिळवणाऱ्या आमच्या गटाला मॉस्कोला नेलं होतं. तिथं आम्ही लेनिनची समाधी पाहिली, वेगवेगळे प्रासाद पाहिले, म्युझियमांना गेलो आणि पावेल कोर्चागिनला भेटलो. आणि जरी तो खूप मोठ्या अधिकाराच्या जागेवर आहे, तरी अगदी साधा माणूस आहे, भल्या स्वभावाचा आहे. त्यानं आमचं छान स्वागत केलं, आम्हाला चहा दिला, लष्करात आमचं कसं चाललंय ह्याची विचारपूस केली..."

"उगीच काय थापा मारताय मला? कशासाठी?" चेत्वेर्ताकिने

शांतपणे विचारले. "कोर्चागिनला अर्धांगवायू झाला होता. आणि तो कोर्चागिनसुद्धा नाही – त्याचं नांव अस्त्रोवस्की. तो आंधळा आहे, साधं बोटसुद्धा उचलू शकत नाही. माझ्या शाळेतली मुलं-मुली त्याला पत्रं लिहायची."

"कदाचित दुसरा कोर्चागिन असेल? .."

वास्कोव शरमेने कसनुसा झाला. डासांचा त्रासही फार वाढला होता. संध्याकाळच्या वेळांना खास प्रकारच्या डासांच्या झुंडी यायच्या.

"माझी काहीतरी चूक होत असेल. ठाऊक नाही. फक्त म्हणाले की..."

त्यांच्या समोरच कुठेतरी डहाळी काडदिशी मोडल्याचा आवाज झाला. अवजड पावलाखाली तुटण्याचा स्पष्ट आवाज झाला होता आणि तो ऐकून वास्कोवला कमालीचा आनंद वाटला होता. त्याला खोटेपणा पदरी घेणे कधीही आवडले नव्हते, मुद्दाम पुढाकार घेऊन त्याने खोटेपणा कधी केला नव्हता आणि आपल्या कनिष्ठांदेखत त्याने स्वतःचे कधी हंसे करून घेतले नव्हते. ह्या शेंबड्या पोरीचे कुचके टोमणे ऐकण्यापेक्षा एकाकीपणे डझनभर जर्मनांशी दोन हात करणे त्याने ह्या क्षणाला अधिक पसंत केले असते.

"झुडूपात जा!" दबत्या आवाजात तो म्हणाला, "आणि गप्प रहा!"

तिला झुडूपात दडवून फांद्या ठाकठीक करायला आणि स्वतः जवळच्याच एका दगडामागे लपायला त्याला अवधी मिळाला – अगदी आवश्यक तेवढाच. त्याने वर पाहिले तेव्हा त्याला फक्त दोन जर्मन दिसले, पण हे मात्र फुललेल्या निखाऱ्यांवरून चालावे तसे अगदी काळजीपूर्वक आणि सावधपणे चालत होते.

त्यांनी सबमशिनगन अगदी जय्यत तयार ठेवल्या होत्या. जर्मन अद्यापही दोन-दोनच्या जोडींनी का फिरत होते याबद्दल सार्जंट-मेजर मनाशी नवल करत होता, तेवढ्यात ह्या दोघांच्या मागे आणि डाव्या बाजूलाही झुडूपांमध्ये हालचाली घडल्या. जर्मनांनी दोन्ही बाजूंना टेहळणी चौक्या बसवल्या होत्या व अचानक झटापटीमुळे आणि टेहळे नाहीसे झाल्यामुळे ते अत्यंत चकरावून गेले होते, ह्याची वास्कोवला जाणीव झाली.

पण त्याने त्यांना पाहिले होते–त्यांनी त्याला नव्हे आणि हाच त्याचा हुकूमाचा एक्का होता. अर्थात एवढे एकच हुकूमाचे पान त्याच्या हाती होते हे खरे, पण जेव्हा प्रहार करायचा तो निर्णय घेणार होता, तेव्हा प्रहाराला जास्तीत जास्त प्रभावी बनवायला ते पान उपयोगी पडणार होते. पण अशा क्षणी घाई करण्याचे काहीएक कारण नव्हते आणि वास्कोव शेवाळात अधिक खोलवर रुतून राहिला. स्वतःच्या घामट कपाळावरील डासांना उडवून लावायलासुद्धा तो भीत होता. खुशाल जर्मनांना लपून-छपून फिरू देत. खुशाल त्यांच्या पाठी त्याच्यासमोर येवोत. खुशाल ते स्वतःच्या शोधाची दिशा त्याला दाखवोत. मग तो खेळ सुरू करणार होता आणि आपला हुकूमाचा एक्का वापरणार होता...

संकटात सापडलेला माणूस एक तर अजिबात विचार करत नाही, अथवा एकाच वेळी दोन माणसांप्रमाणे तो विचार करतो. एक माणूस जोवर पुढील हालचालीचा विचार करत असतो, तोवर दुसरा त्या प्रत्यक्ष क्षणाची काळजी घेत असतो, कारण त्याला सर्व दिसते आणि काहीही त्याच्या नजरेमधून सुटत नाही. वास्कोव जेव्हा स्वतःच्या पानांविषयी आणि एक्क्याविषयी विचार करत होता, तेव्हा जर्मनांना त्याने

मुळीच दृष्टीआड केले नव्हते आणि चेत्वेर्ताकला तो क्षणभरही विसरला नव्हता. तिला त्याने छान लपवून ठेवले होते आणि त्या बाबतीत त्याचे मन स्वस्थ होते. जर्मन तिच्यापासून बऱ्याच दूर अंतरावरून जात होते, त्यामुळे त्या दिशेने काहीही प्रतिकूलाची अपेक्षा नव्हती. जर्मन तो प्रदेश टप्प्या-टप्प्याने विंचरून काढत होते असे भासत होते व वास्कोव आणि चेत्वेर्ताक एकेका विभागाच्या केंद्रस्थानी होते. ह्याचा अर्थ त्यांनी वेळ काढायचा होता, गप्प बसायचे होते, श्वासोच्छ्‌-वाससुद्धा करायचा नव्हता, शेवाळात व झुडूपात मिसळून जायचे होते आणि नंतर कृती करायची होती. त्यांना एकत्र यायला पाहिजे होते, स्वतःची लक्ष्ये निश्चित करायला हवी होती आणि मग एक सोविएत रायफल व एक जर्मन सब-मशिनगनच्या साह्याने शत्रूचा फडशा पाडायचा होता.

जर्मन परत त्याच वाटेकडे जात होते असे दिसत होते. लौकरच त्यांची ओस्यानीना व कोमेल्कोवाशी हमखास गाठ पडणार होती. अर्थात ह्याबद्दल सार्जंट-मेजरला काळजी वाटत होती, पण फार नव्हे. त्या मुलींनी पूर्वी लढाईचा अनुभव घेतलेला होता, त्यांनी स्वतःची डोकी ताळ्यावर ठेवली होती व एक तर त्या चुपचाप लपून बसू शकल्या असत्या, अथवा त्यांनी कुठेतरी माघार घेतली असती. शिवाय, जर्मन त्याला ओलांडून पुढे गेले म्हणजे कारवाई करण्याचा तो बेत आखत होता. जर्मन दुहेरी गोळीबारांच्या कैचीत सापडले असते.

जर्मन सरळ पट्ट्यावर बाहेर आले. त्यांच्या डाव्या अंगाला सुमारे वीस मीटरवर चेत्वेर्ताक झुडूपात लपलेली होती. जर्मनां-बरोबरची टेहळणीची माणसे दोन्ही बाजूंना काही अंतर राखून गुपचूप येत होती. पण ते कोणत्या बाजूने जाणार ह्याची

वास्कोवला आधीच कल्पना होती. त्यांच्यापैकी कुणीही त्याच्या अथवा गाल्याच्या पुढ्यात ठाकेल असे त्याला वाटत नव्हते. पण केवळ सुरक्षा म्हणून त्याने सबमशिनगन सज्ज ठेवली. जर्मन निमूटपणे, दबा धरून, सबमशिनगन रोखून चालत होते. दोन्ही बाजूंना टेहळ्यांकडून संरक्षण असल्यामुळे डावी-उजवीकडे पहात नव्हते. जर संकट आलेच असते तर ते समोरून येणार होते. पण आणखी काही पावलांनंतर ते चेत्वेर्ताक व वास्कोवच्या गोळीबाराच्या टप्प्यात जाणार होते आणि त्या क्षणापासून त्यांच्या पाठी सार्जंट-मेजरच्या शिकारी नेमाला उघड्या पडणार होत्या.

फांद्यांची मोठ्यांदा सळसळ करत गाल्या चेत्वेर्ताक अचानक झुडूपांमधून उठली. ताठ उभे रहात तिने निराशेने हात वर फेकले आणि जर्मनांच्या समोरील मैदानात ती धावली.

"आ... आ... आ..." ती किंचाळली. आपण काय करतो आहोत ह्याचे तिला मुळीच भान राहिले नव्हते.

अवघ्या दहा पावलांवरून सबमशिनगनची एक छोटी फैर उडाली. धावणाऱ्या गाल्याच्या ताठ, सडपातळ पाठीत गोळ्या घुसल्या. ती धपकन जमिनीवर पालथी कोसळली. भयानक भीतीपायी तिचे हात अजूनही तिच्या डोक्यावर उचललेले होते. मृत्यूच्या कडकडाटात तिची अंतिम किंकाळी विरली. तिचे अद्याप धावणारे पाय मृत सोन्याच्या बुटांच्या टोकांनी शेवाळे उडवत होते.

मैदानात पूर्ण शांतता पसरली. क्षणभर काहीच हालचाल घडली नाही. गाल्याचे पायसुद्धा स्वप्नातल्याप्रमाणे अधिकाधिक हळू हलत होते. वास्कोव मात्र दगडामागे पडून होता. तो हलला नाही. त्याच्या सर्व योजना धुळीला मिळाल्या होत्या

आणि त्याने आपला हुकूमाचा एक्का गमावला होता, ही जाणीव व्हायला अद्याप त्याला अवसर मिळाला नव्हता. त्या अवस्थेत आणखी किती वेळपर्यंत तो पडून राहिला असता अथवा नंतर तो कसा वागला असता, कोण जाणे. पण अचानक त्याच्या पाठीमागून दणकट पावलांचा आवाज आला. वाटेत आडव्या येणाऱ्या सर्व गोष्टी बेगुमानपणे तुडवत उजवी-कडचा जर्मन टेहळा गोळीबाराच्या दिशेने धावत येत असल्याचे वास्कोवने ताडले. जर्मन थेट वास्कोवच्या अंगावरच येत होता.

आता योजना आखत बसायला सवडच नव्हती. वास्कोवला मुख्य गोष्ट ठाऊक होती: जर्मनांची दिशाभूल करायची होती. त्यांना दुसऱ्या कुठल्यातरी ठिकाणी न्यायला हवे होते, उरलेल्या मुलींपासून दूर भुलवत न्यायला हवे होते. हा निर्णय होताच ताडकन उडी मारून तो उठला व गाल्याच्या देहावर वाकून पाहणाऱ्या दोन जर्मनांवर त्याने उघडपणे गोळ्या झाडल्या. झुडूपांमागून धावत येणाऱ्या माणसावर त्याने प्रदीर्घ फैर झाडली व खाली वाकून सीन्यूखिना डोंगरापासून जंगलाच्या दिशेने धाव घेतली.

त्याने कुणाला ठार मारले अथवा नाही हे पहायला तो थांबला नाही. त्याच्या डोक्यात दुसरे विचार होते. जर्मनांना कसेही करून ओलांडायचे, जंगलापर्यंत सुरक्षित पोहचायचे आणि आपल्या मुलींचे रक्षण करायचे, असा त्याचा उद्देश होता. आपल्या उरलेल्या मुलींचे रक्षण करणे त्याचे कर्तव्य होते – एक पुरुष आणि त्या मुलींचा कमांडर अशा दोन्ही नात्यांनी. बाकीच्या नष्ट झाल्या होत्या तेवढेच पुरेसे होते. अगदी गळयापर्यंत पुरेसे होते, आयुष्यभराला पुरेसे होते.

त्या संध्याकाळी सार्जंट-मेजर जसा धावत होता, तसे

धावणे त्याने बऱ्याच काळात केलेले नव्हते. झुडूपांमधून तो उड्या घेत होता, दगडांमागे लपत होता, खाली पडत होता, वर उठत होता, परत धावत होता, त्याच्या डोक्यावरच्या पानांना छेदत सणसणत जाणाऱ्या गोळयांना चुकवण्यासाठी जमिनीवर आडवा होत होता. उलट त्याच्या बाजूने तो थरथरत्या आकृतींवर सबमशिनगनमधून छोटया फैरी झाडत होता, खूप गोंगाट करत होता. पायांखालचा झाडोरा तो तुडवत होता, पाय आपटत धपाधपा धावत होता, घसा बसेपर्यंत ओरडत होता. कारण जर्मनांना हुलकावत स्वत:पाठी आणल्याशिवाय माघार घेण्याचा त्याला हक्क नव्हता. हा खेळ खेळणे त्याला आवश्यक होते. आगीशी खेळणे आवश्यक होते.

पण एका बाबतीत तो शांत होता, त्याला खात्री होती: त्याला वेढा घालून पकडणे जर्मनांना शक्य नव्हते. त्यांना तो प्रदेश नीटसा माहीत नव्हता, आता त्यांच्यापाशी फारच कमी माणसे उरली होती. शिवाय, अचानक समोरासमोर घडलेली झटापट त्यांच्या चांगलीच ध्यानात होती. म्हणून, त्याचा पाठलाग करत असतानासुद्धा, सभोवती नजर टाकायला ते विसरत नव्हते. अन्यथा जर्मनांना असे डिवचून, त्यांना असे चिडवून पळून जाणे त्याला कधीही जमले नसते. जर्मनांना त्याने पिसाळून सोडले होते, सतत त्याच्यापाठी वेड्यासारखे धावायला भाग पाडले होते; फक्त एकाच प्रतिस्पर्ध्याबरोबर खरे म्हणजे त्यांचा सामना चालला होता ह्याचा थांबून विचार करायला, ही जाणीव व्हायला त्यांना तो उसंतच देत नव्हता. खरे तर तो अवघा एकटा होता...

धुक्यानेही त्याला मदत केली. त्या वसंतामध्ये भरपूर धुके

ऱ्हडन होते. ज्या क्षणी सूर्य क्षितिजामागे अदृश्य व्हायचा, त्या क्षणी पोकळयांमध्ये हलके धुरकट धुके भरून जायचे. धुक्याचे थरच्या थर तरंगायचे, झुडूपांना चिकटून बसायचे. त्या दाट दुधाळ धुक्यात केवळ एकच माणूस नव्हे, तर आख्खी रेजिमेंट लपू शकली असती. धुक्याच्या ढगात वास्कोव कोणत्याही क्षणी सूर मारू शकला असता – मग खुशाल जर्मन त्याला धुंडाळोत! पण संकट असे होते की, धुक्याच्या शुभ्र रेषा सरोवरापाशी पोहोचल्या होत्या आणि वास्कोव तर उलट जर्मनांना जंगलच्या दिशेने भुलावणी घालत होता. म्हणून अगदी आत्यंतिक आवश्यक वेळांनाच त्याने धुक्याचा आसरा घेतला. आणि पुन्हा धुक्यातून उगवायचा व जर्मनांना जणू वेडावून म्हणायचा : "नमस्ते जर्मनांनो, मी जिवंत आहे..."

अर्थात तो सुदैवी होता. अनेकदा अत्यंत छोटया चकमकीत-सुद्धा माणसाची गोळयांनी चाळण उडते. पण तो खरेच सुदैवी होता. स्वतःच्या मृत्यूशी खूप वेळ लपंडाव खेळून शेवटी तो जंगलापाशी पोहोचला. तेथवर त्याने जर्मनांना आपल्या पाठीशी पळवत आणले होते. त्या ठिकाणी त्याची सबमशिनगन शेवटची उडाली व थंड पडली. त्याच्यापाशी आणखी काडतूसे नव्हती आणि त्यामुळे सबमशिनगन आता निष्कारण ओझे बनली होती. वाऱ्याने पडलेल्या झाडांखाली त्याने ती सबमशिनगन सरकवली व निःशस्त्र स्थितीत तो माघार घेऊ लागला.

येथे धुके नव्हते आणि गोळया सणाणत झाडांच्या बुंध्यां-मध्ये घुसत होत्या. लाकडाच्या भुग्याचा वर्षाव होत होता. आता त्याला स्वतःमधील आणि जर्मनांमधील अंतर वाढविणे आवश्यक होते. स्वतःची कातडी बचावण्याचा विचार करण्याची वेळ आता येऊन ठेपली होती. पण संतापाने पेटून उठलेले

जर्मन त्याचा पिच्छा सोडायला तयार नव्हते. अर्धवर्तुळात त्याला घेरण्यात त्यांना अखेर यश मिळाले होते. त्याला ते जोरात दाबत होते, क्षणाची उसंत देत नव्हते. दलदलीपर्यंत त्याला रेटत नेऊन जिवंत पकडण्याचा जर्मनांचा इरादा होता. ते अशा परिस्थितीपर्यंत पोहोचले होते की, जर सार्जंट-मेजर त्यांचा कमांडर असता, तर प्रश्नोत्तरांसाठी कैदी प्राप्त करण्याबद्दल त्याने त्यांना मूठभर पदके नक्की देऊ केली असती.

ज्या क्षणी हा विचार त्याच्या मनात आला, ते त्याला बहुधा गोळी घालणार नाहीत असा सुटकेचा विचार ज्या क्षणी त्याला जाणवला, त्याच क्षणी त्याच्या कोपराखालील दंडाच्या मांसल भागाला कसलातरी जोरात तडाखा बसला. एखाद्या तीक्ष्ण फांदीला हात आपटला असावा असा त्याने तर्क केला. मग अचानक त्याला जाणवले की, त्याच्या मनगटा-पर्यंत कसलीतरी उबदार धार वाहात आहे. रक्तस्राव फार नव्हता. गोळी त्याच्या शिरेला नुसती चाटून गेली होती. वास्कोव गारठला. पण दंडात भोक पडलेले असताना आता तो कसला लढणार होता! भोवती कानोसा घेऊन एकूण परिस्थिती जोखण्याची, जखमेवर पट्टी बांधण्याची आणि थोडी विश्रांती घेण्याची त्याला गरज होती. जर्मनांची साखळी तोडून जाणे त्याला शक्य नव्हते. त्यांच्यापासून तो पळून जाऊ शकत नव्हता. दलदलीपाशी जाणे एवढा एकच मार्ग मोकळा होता.

त्या पलायनासाठी त्याने आपली सर्व ताकद खर्चली. त्याचे प्राण अगदी कंठाशी आले होते अशा अवस्थेत अचानक त्याला पाईनच्या झाडाची खूण दिसली. त्याने चटकन आधाराची काठी उचलली. यांत्रिकपणे त्याच्या मनाने नोंद घेतली की आणखी पाच काठ्या तेथे होत्या, पण त्यावेळी त्याचा अर्थ

त्याच्या डोक्यात आला नाही. पाठीमागे जंगल जर्मनांच्या पावलांनी घुमत होते, जर्मनांच्या आवाजांनी निनादत होते आणि जर्मनांच्या गोळ्यांनी गात होते.

दलदलीतून बेटापर्यंत तो कसा पोहोचला हे नंतर त्याला आठवले नाही. त्याला प्रथम भान आले वाकलेल्या पाईन झाडांच्या खाली. गारठ्याने तो परत शुद्धीवर आला. त्याचे सर्वांग थरथर कापत होते, दात कडकडा वाजत होते. दंडातील मंद ठणकेची हळूहळू त्याला जाणीव झाली. काय झाले... दमट हवा त्याला बाधली होती काय...

किती वेळपर्यंत तेथे तो पडून होता हे फेदोत एवग्राफीचला नंतर आठवले नाही. मात्र खूप वेळ झाला असावा असा मात्र त्याने हिशेब केला, कारण आता त्याच्याभोवती स्मशानशांतता पसरली होती. जर्मनांनी पाठलाग सोडून दिला होता. पहाटेच्या सुमाराला धुके अधिक दाट बनले, जमिनीलगत बसले आणि त्याच्या ओलसरपणाने वास्कोवच्या हाडांपर्यंत थंडी घुसली. त्याच्या जखमेतून रक्त वाहणे इतःपर थांबले होते. त्याचा हात पार खांद्यापर्यंत चिखलाने माखला होता. गोळीमुळे पडलेले भोक अर्थातच चिखलात बुजले होते आणि घाण काढून टाकण्याची तसदी सार्जंट-मेजरने घेतली नाही. सुदैवाने त्याच्या खिशात त्याला जखमेवर बांधायचे स्वच्छ कापड आढळले आणि त्याने ते आपल्या जखमेवर बांधले. नंतर त्याने सभोवार नजर टाकली.

जंगलापलिकडे पांढुरका प्रकाश पसरत होता आणि दलदलीवरचे आकाश रंगाने पेटून उठत होते, धुक्याला जमिनीशी खाली दाबत होते. पण इथे भांड्यांच्या तळाशी फेदोत एवग्राफीच गारठ्याने हुडहुडला होता, धुक्याच्या बर्फासारख्या थंड

दुधात बुडून गेला होता. जपून ठेवलेल्या स्वतःच्या कुपीमधील द्रव पिण्याची त्याला तीव्र इच्छा झाली. आता केवळ हालचालच त्याला वाचवू शकली असती, म्हणून घाम फुटेपर्यंत त्याने उड्या मारल्या. दरम्यान धुके विरळ झाले होते आणि आता तो सभोवार नीट पाहू शकत होता.

जर्मनांपासून धोका निर्माण होण्याचे कोणतेही चिन्ह नव्हते. अर्थात त्याची वाट पहात ते दबा धरून बसले असण्याची शक्यता होती, पण तसे फारसे घडणार नव्हते. दलदल अभेद्य आहे असे त्यांना वाटले असावे आणि सार्जंट-मेजर वास्कोव दलदलीत बुडून मेला असे समजून त्यांनी त्याचा नाद सोडून दिला असावा. दुसऱ्या दिशेला, स्टेशनकडे जाणाऱ्या, थेट मारीया निकीफरोवनाकडे जाणाऱ्या, फेदोत एवग्राफीचने फारसे लक्ष दिले नव्हते. ती बाजू धोक्यापासून मुक्त होती; ती बाजू जीवनाचे आश्वासन देत होती; स्पिरिटचा अर्धा प्याला, डुकराच्या चरबीच्या तुकड्यासह अंड्यांची पोळी आणि प्रेमळ घरमालकीण. नाही, त्याने त्या बाजूला पहायलाच नको होते, मोहाला बळी पडायला नको होते; पण ज्या मदतीची त्या दिशेकडून तो वाट पहात होता, ती कुमक अद्याप आली नव्हती आणि म्हणूनच अधूनमधून त्या दिशेला तो चोरटा कटाक्ष फेकत होता.

तेथे काहीतरी काळे दिसत होते. तो काळा डाग सार्जंट-मेजरला बुचकळ्यात टाकत होता. ती काळी वस्तू काय आहे हे केवळ जाणून घेण्याच्या कुतूहलापायी एका क्षणी तेथे जाण्याच्या तो अगदी बेतात होता, पण त्याच्या श्रमांमुळे तो थकला होता आणि त्याने विश्रांती घेण्याचे ठरवले होते. त्याची विश्रांती संपली त्या दरम्यान पुरेसे उजाडले होते आणि

दलदलीमधील त्या काळ्या डागाचे रहस्य त्याला उमगले. त्याच क्षणी पाईन वृक्षाजवळच्या पाच काठ्यांचा अर्थ त्याला उमगला. तेथे पाच काठ्या होत्या ह्याचा अर्थ प्रायव्हेट ब्रीच्कीना ह्या त्रिवार नतद्रष्ट गाळात आधाराच्या काठीविना उतरली होती.

आता लष्करातून मिळालेला तिचा स्कर्ट तेवढा तेथे उरला होता. बाकी काहीही शिल्लक नव्हते. कुमक येण्याबद्दलची त्याची आशासुद्धा नष्ट झाली होती...

## १२

...आणि त्याला त्या सकाळीची आठवण झाली जेव्हा रानातून बाहेर पडणारे जर्मन त्याने मोजले होते. त्याच्या डाव्या खांद्याशी अस्पष्ट आवाजात बोलणारी सोन्या गूर्विच त्याला आठवली; लीझा ब्रीच्कीनाचे विस्फारलेले डोळे; भोजाच्या सालीच्या पादत्राणात एक पाय गुंडाळलेली गाल्या चेत्वेर्ताक. त्याला हे सर्व आठवले आणि त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडले: "म्हणजे ब्रीच्कीना कधीच पोहोचली नाही..."

त्याचा घोगरा, गारठ्याची बाधा झालेला आवाज दलदली-वरून मंदपणे वाहात गेला आणि परत सर्व काही मूक बनले. ह्या निर्जन स्थळी डाससुद्धा गुणगुण न करता चावत होते. सार्जंट-मेजरने एक उसासा टाकला आणि दलदलीत ठाम पाऊल टाकले. काठीचा आधार घेत तो पलिकडील तीरापर्यंत गेला. त्याच्या मनात कोमेल्कोवा आणि ओस्यानीना यांच्या-बद्दलचे विचार येत होते. त्या अद्याप जिवंत असतील अशी तो मनाशी आशा करत होता. स्वतःच्या कमरपट्ट्यामधील

पिस्तूलाचीही त्याला आत्ता आठवण झाली. तेवढे एकच शस्त्र त्याच्यापाशी उरले होते.

जर्मनांनी एक जरी माणूस येथे ठेवला असता, तर सार्जंट-मेजर कायमचा याच स्थळी राहिला असता — चिखलात तोंड खुपसून देह सडून जाईपर्यंत. कोणत्याही पल्ल्यावरून जर्मन त्याला टिपू शकले असते, कारण तो सरळ सामोरा तीराकडे येत होता आणि आडवे पडायला तेथे भक्कम जमीन नव्हती. पण जर्मनांनी तेथे कुणालाही ठेवले नव्हते आणि इतर कोणत्याही संकटाविना फेदोत एवग्राफीच परिचित ओढ्यापाशी पोहोचला.

त्याने कसेबसे स्वतःला स्वच्छ केले व पोटभर पाणी पिऊन घेतले. मग त्याने कागदाचा कपटा शोधला. त्याला तो त्याच्या वरच्या खिशात गवसला. तंबाखूऐवजी कोरडे शेवाळे चुरडून त्याने सिगारेट वळली आणि गारगोटी आपटून सिगारेट पेटवून धूम्रपान सुरू केले. आता काही विचार करण्यास हरकत नव्हती.

जरी त्याने २५ टक्के शत्रू निपटून काढला होता, तरी आदल्या दिवशीच तो आपले युद्ध हरला होता असे दिसत होते. तो युद्ध हरला होता, कारण जर्मनांना थोपवून धरण्यात त्याला आपयश आले होते; तो हरला होता कारण त्याने आपले निम्मे सैनिक गमावले होते, सर्व दारूगोळा संपवला होता आणि आता त्याच्यापाशी फक्त एक पिस्तूल होते. कोणत्याही अंगाने त्याने विचार केला, कोणत्याही सबबींचा आधार घेतला, तरी तो युद्ध हरला होता हेच शाबित होत होते. आणि सर्वांत वाईट म्हणजे कोणत्या दिशेला त्याने आता जर्मनांचा शोध घ्यायचा, ह्याची त्याला कल्पना नव्हती.

वास्कोवचे मन कडवटपणाने भरून गेले—भुकेपायी, उग्र सिगारेटपायी अथवा एकलेपणापायी आणि गांधीलमाशांप्रमाणे डोक्यात गर्दी करणाऱ्या दुःखद विचारांपायी. गांधीलमाशांप्रमाणे ते विचार दंश करत होते, पण मध मात्र आणत नव्हते...

स्वतःच्या उरलेल्या पथकापर्यंत पोहोचण्याचा प्रयत्न करणे अर्थातच त्याला भाग होते. तेथे आता फक्त दोन मुली होत्या, पण त्या सर्वोत्तम होत्या. ती तिघे मिळून सामर्थ्यवान ठरली असती, पण त्यांच्यापाशी शस्त्रे नव्हती. ह्याचा अर्थ कमांडर ह्या नात्याने दोन समस्यांची उकल करणे त्याला आवश्यक होते: काय करायचे आणि कशाच्या साह्याने लढायचे? ह्यावर त्याच्यापाशी एकच उत्तर होते: प्रथम स्वतःच परिस्थिती जोखायची, जर्मनांना शोधून काढायचे आणि काही शस्त्रे प्राप्त करायची.

आदल्या रात्रीच्या बेभान पाठलागात जर्मन धपाधपा आणि सावध न राहता धावले होते, जणू मायभूमीत असल्याप्रमाणे वागले होते. त्यामुळे जंगलभर त्यांच्या पावलांचे भरपूर ठसे उमटले होते. नकाशाप्रमाणे वास्कोव त्या ठशांना वाचत होता. त्यांची संगती जुळवण्याचा प्रयत्न करत होता. त्याच्या गणितानुसार दहापेक्षा जास्त जर्मन पाठलागात गुंतले नव्हते. म्हणजे त्यांच्यातील काहीजण त्यांच्या वस्तू राखण्यासाठी मागे राहिले असावेत, अथवा त्यांच्यातील आणखी कुणाला नष्ट करण्यात तो यशस्वी झाला होता. असे असले तरीही, जर्मनांची संख्या एक डझन होती असे गृहीत धरणे भाग होते, कारण नेम न धरताच त्याने गोळ्या झाडल्या होत्या. नेम धरायला सवडच नव्हती.

पावलांच्या ठशांचा मागोवा घेत रानाच्या टोकापाशी तो पोहोचला. तेथून त्याला वोप सरोवराचा, सीन्युखीना शिखराचा चांगला देखावा दिसत होता. त्याच्या उजव्या अंगाला झुडूपे आणि पाईनची राई पसरली होती. स्वत:चा पवित्रा ठरवण्यासाठी वास्कोव येथे थोडा थांबला, पण त्याच्या मुली अथवा आक्रमक यांपैकी एकाचेही दर्शन त्याला घडले नाही. सर्व काही शांत-निवांत होते. ती सकाळ खूप सुंदर आणि शांत होती. त्या सुंदर नीरवतेत जर्मन सबमशिनगनवाले आणि जुन्या धाटणीच्या रायफली धरलेल्या दोन रशियन मुली कुठेतरी लपून बसल्या होत्या.

दगडांमध्ये आपल्या मुलींचा शोध घेण्याचा सार्जंट-मेजरला अनावर मोह होत होता, पण तरीही जंगलाच्या आडोशामधून बाहेर न पडण्याचे त्याने ठरवले. स्वत:चे प्राण धोक्यात घालायचा त्याला हक्क नव्हता, मुळीच हक्क नव्हता, कारण एवढा कडवटपणा आणि एवढी निराशा वाटूनही, तो स्वत:ला पराजित म्हणवून घ्यायला तयार नव्हता. तसा विचारसुद्धा त्याला मान्य नव्हता. त्याच्या दृष्टीने युद्धाचा तसा शेवट घडू शकत नव्हता. म्हणून त्या शांत विस्तारावर डोळे विसावून झाल्यानंतर, वास्कोवने परत दाट झाडीत उडी घातली व शिखराला वळसा घालून लेगोन्तोवो सरोवराच्या दिशेने दूरच्या रस्त्याने चालायला त्याने आरंभ केला.

त्याचे गणित अगदी साधे होते. त्याचा अंदाज असा होता: रात्री त्याचा जोरदार पाठलाग केलेल्या जर्मनांना उत्तरेतील श्वेतरात्रींच्या वेळीसुद्धा पुढे जाण्याचे साहस करायची हिंमत होणार नव्हती. दिवस उजाडायची ते वाट पाहणार होते आणि अशा परिस्थितीत वेळ काढायला लेगोन्तोवो सरोवराचा किनारा

उत्तम स्थळ होता–तेथे चांगला आडोसा होता, दलदल नव्हती. म्हणून संयोगभूमीतील परिचित खडकांऐवजी ह्या अपरिचित मार्गाने जाण्याचा फेदोत एवग्राफीचने निर्णय घेतला होता.

येथे तो सावधपणे चालत होता, एका झाडापासून दुसऱ्या झाडापर्यंत झपाट्याने जात होता, कारण पावलांचे ठसे अचानक अदृश्य झाले होते. पण रान शांत होते, फक्त पाखरांची किलबिल चालू होती आणि त्यांच्या आवाजांवरून वास्कोवला समजत होते की, आसपास माणसे नव्हती.

त्याला बराच अवधी लागला होता आणि आपले गणित चुकले असे त्याला वाटू लागले होते. जर्मन जेथे कधीही असू शकणार नव्हते अशा ठिकाणी तो शोधत होता, असा त्याचा समज होऊ लागला होता. स्वतःच्या अंतःप्रेरणेविना आता त्याच्यापाशी कोणतीही संदर्भस्थळे नव्हती, पण त्याने अचूक मार्ग निवडला होता असे त्याची अंतःप्रेरणा त्याला सांगत होती. स्वतःच्या शिकाऱ्याच्या अंतःप्रेरणेबाबत शंका घेण्याच्या बेनात तो होता, तेवढ्यात त्याच्या पुढ्यात एका सशाने धूम ठोकली. तो ससा मैदानात धावला होता आणि वास्कोवच्या उपस्थितीची जाणीव त्याला नव्हती. मागील पायांवर उभा राहून ससा मागे निरखून पहात होता. तो ससा भेदरला होता आणि त्याला अजिबात माहीत नसलेल्या प्राण्यांपायी–माणसांपायी–तो घाबरला होता व म्हणून आत्ता त्याने कुतूहल दाखवले होते. सशाप्रमाणेच सार्जंट-मेजरने स्वतःचे कान टवकारले आणि ससा पहात होता त्याच दिशेला पाहिले. पण कितीही पाहिले आणि ऐकले तरी त्याला विशेष असे काहीच आढळेना. अॅस्पच्या दाट झाडीत ससा नाहीसा होऊन बराच वेळ झाला

होता आणि फेदोत एवग्राफीचच्या डोळ्यांमधून अतिताणापायी पाणी वाहू लागले होते, तरीही तो जेथे होता तेथेच थांबून राहिला. स्वतःच्या कानांपेक्षा त्या सशावर त्याचा अधिक विश्वास होता. सशाने ज्या दिशेला टक लावून पाहिले होते त्या दिशेला सरकताना वास्कोव अगदी गुपचूप, एखाद्या सावली-सारखा पुढे जात होता.

आरंभी त्याला काहीच दिसले नाही, पण मग झुडूपांमधून काहीतरी अंधुक तपकिरी रंगाचे दिसले. ते विचित्र दिसत होते आणि त्यावर अधूनमधून शेवाळ वाढले होते. श्वास रोधून वास्कोवने आणखी एक पाऊल टाकले. त्याने हातांनी फांद्या विलग केल्या आणि जमिनीत खूप खोल रुतलेल्या जुन्या झोपडीच्या शेवाळमाखल्या प्राचीन भिंतीला त्याने स्पर्श केला. ह्या ठिकाणी संन्यासी लेगोन्त राहिला असावा असा सार्जंट-मेजरने स्वतःशी विचार केला.

तो कोपऱ्याशी सरकला आणि कुजलेला लाकडी कठडा असलेली एक जुनी विहीर त्याच्या नजरेला पडली. विहीरीकडे जाणाऱ्या पाऊलवाटेवर गवत माजले होते आणि झोपडीचे दार आता एका बिजागरीवर तिरके लटकत होते. त्याने पिस्तूल सरसावले आणि डोक्यात गूं गूं आवाज होईपर्यंत कान टवकारले. तो चोरपावलांनी दारापाशी गेला आणि दाराच्या खांबावर, गंजलेल्या बिजागरीवर त्याने नजर फिरवली. तुडवलेले गवत आणि उंबरठ्याशी अजून ओला दिसणारा पावलाचा ठसा त्याच्या ध्यानात आला. अवघ्या एका तासा-पूर्वी ते दार तोडले असावे अशा निष्कर्षाला तो आला.

का असा प्रश्न होता. ओसाड पडलेल्या आश्रमाचे दार जर्मनांनी केवळ कुतूहलापायी मोडले नव्हते हे निश्चित. त्या

गाठीमागे काहीतरी कारण होते. कदाचित ते आसरा शोधत असावेत. बहुधा त्यांच्याबरोबर जखमी असावेत, कदाचित त्यांना तेथे काहीतरी लपवून ठेवायचे असावे. सार्जंट-मेजरला आणखी काही खुलासा सापडेना. म्हणून तो परत झुडूपांमध्ये लपला. मात्र स्वतःच्या कोणत्याही खुणा मागे न ठेवण्याची त्याने दक्षता घेतली. दाट झाडीत रांगत परत येऊन तो स्तब्ध बसला. डासांनी त्याच्यावर व्यवस्थित बस्तान बसवले न बसवले तोच त्याला नीलकण्ठ पक्ष्याची उत्तेजित बडबड ऐकू आली. मग एक फांदी मोडल्याचा आवाज झाला, काहीतरी धातू आपटली आणि जंगलामधून एकापाठोपाठ एक असे बाराजण अवतरले. त्यांचा म्होरा लेगोन्तोव आश्रमाकडे होता. अकराजण ओझे वाहात होते (ते स्फोटक पदार्थ असावेत असा सार्जंट-मेजरने तर्क केला) आणि बारावा खूप लंगडत होता, काठीचा आधार घेऊन चालत होता. त्यांनी झोपडीपाशी जाऊन ओझी खाली ठेवली. जखमी माणूस तर पायरीवर चटकन फतकल मारून बसला. एक माणूस स्फोटक पदार्थांना झोपडीत नेऊन ठेवू लागला, तर बाकीचे धूम्रपान करू लागले, काहीतरी चर्चा करू लागले, आळीपाळीने नकाशा पाहू लागले.

वास्कोवला डास चावत होते, ते त्याचे रक्त शोषत होते, तरीही वास्कोव डोळ्याची पापणी न लववता टक लावून न्याहाळत होता. पिस्तूल गच्च पकडून जर्मनांपासून अवघ्या दहा पावलांवर तो लपला होता, त्यांचा प्रत्येक शब्द ऐकत होता, पण एकही शब्द तो समजू शकत नव्हता. संभाषणाच्या पुस्तिकेतील अवघी आठ जर्मन वाक्ये त्याला ठाऊक होती आणि केवळ रशियन हेलयुक्त उच्चारातच त्यांना तो ओळखू शकत होता.

पण फार वेळ त्याला कोडयात रहावे लागले नाही. ज्याच्या नकाशावर प्रत्येकजण निरखून पहात होता त्या मध्यभागी उभ्या असलेल्या वरिष्ठ माणसाने हाताची खूण करताच दहा जर्मन उठले आणि सबमशिनगन सज्ज राखून जंगलाकडे निघाले. ते लोक अदृश्य होताच, ज्याने स्फोटक ओझी झोपडीत नेऊन ठेवली होती त्या माणसाने जखमी सैनिकाला उभे रहायला मदत केली व झोपडीत त्याला ओढत नेले.

डासांना शिक्षा करायला आणि श्वास सोडायला अखेरीस वास्कोवला अवसर लाभला. आता सर्व काही स्पष्ट होते आणि अवधी महत्त्वाचा होता. सीन्यूखीना शिखराकडे अर्थातच जर्मन काही रानफळे गोळा करायला गेले नव्हते. लेगोन्तोवो सरोवराला वळसा घालण्याची त्यांची इच्छा नव्हती, तर संयोगभूमीतून जाण्याचा त्यांनी निर्धार केला होता. ओझी न घेता ते तिकडे निघाले होते — वाट काढणे सुकर व्हावे म्हणून.

अर्थात त्यांना सहजपणे तो गाठू शकत होता, मुलींना शोधून पुन्हा नव्याने सर्व सुरू करू शकत होता. एकच अडसर होता — शस्त्रांचा अभाव. शस्त्रांविना जर्मनांना हाताळणे व्यर्थ होते.

त्या क्षणाला झोपडीत, त्या मोडलेल्या दाराच्या अगदी मागेच, दोन सबमशिनगन होत्या. दोन सबमशिनगन — केवढी प्रचंड संपत्ती! पण त्या प्राप्त कशा करायच्या याबाबत वास्कोवला अद्याप निश्चित माहिती नव्हती. उघडपणे, रांगडेपणाने प्रयत्न करणे म्हणजे संकटाला आमंत्रण करणे होते. विशेषतः निद्राविहीन रात्रीनंतर आणि जखमी हातासह तर तसे वागणे मुळीच उचित नव्हते. म्हणून जर्मन झोपडीबाहेर केव्हा उगवतात ह्याची केवळ वाट पहात फेदोत एवग्राफीच बसून राहिला.

आणि एक जर्मन खरोखरच बाहेर आला. बहुधा त्याला स्वतःला पाणी प्यायचे होते आणि सहकाऱ्यासाठी पाणी न्यायचे होते. सावधपणे तो झोपडीतून बाहेर पडला. त्याने सबमशिनगन काखेत धरली होती, त्याच्या कमरेला दोन कुप्या लटकत होत्या. स्वतःच्या मृत्यूला भेटायला तो जात होता, ह्याची मात्र त्याला मुळीच जाणीव नव्हती. कानोसा घेत आणि सभोवार पहात तो थोडा वेळ उभा राहिला, पण सरतेशेवटी भिंतीपासून अलग झाला आणि विहीरीकडे निघाला. वास्कोवने निशाणबाजीच्या स्पर्धेत भाग घेत असल्याप्रमाणे सावकाशपणे पिस्तूल वर उचलले, श्वास रोखून धरला आणि हळूच चाप दाबला. पिस्तूल झाडल्याचा अस्पष्ट आवाज झाला आणि जर्मनाचा एकदम पुढे तोल गेला. खात्री करण्यासाठी सार्जंट-मेजरने आणखी एक गोळी झाडली व तो आडोशामधून बाहेर यायच्या बेतात होता, पण केवळ चमत्कारानेच त्याचे मोडक्या दाराच्या फटीमधून डोकावणाऱ्या सबमशिनगनच्या नळीच्या पोलादी चमकीकडे लक्ष गेले. तो एकदम थांबला. घायाळ असलेला दुसरा जर्मन पहिल्याला संरक्षण देत होता आणि त्याने सर्व काही पाहिले होते. वास्कोव जर विहीरीकडे धावला असता, तर हमखास तो गोळीने टिपला गेला असता.

वास्कोव थिजला. तो जर्मन खात्रीने सबमशिनगन वापरणार होता. धोक्याचा इशारा देण्यासाठी एक लांब, घुमणारी फैर पुरेशी होती. मुख्य पथक धावत परतले असते, त्यांनी जंगल विंचरून काढले असते आणि सार्जंट-मेजरचा अवतार संपला असता. दुसऱ्या वेळी तो निसटू शकला नसता.

पण जर्मनाने गोळीबार केला नाही. तो वाट पहात होता. सबमशिनगनची नळी सावकाशपणे इकडून तिकडे फिरत होती;

पण इशारा दिला नाही. विहीरीच्या कठड्यापाशी त्याचा साथी पालथा पडलेला त्याने पाहिला होता—देह अजूनही आचके देत होता—पण तरीही त्याने धोक्याचा इशारा दिला नव्हता. तो वाट पहात होता... पण कशाची?

अचानक वास्कोवला आकलन घडले. पूर्ण आकलन घडले. तो फॅसिस्ट हरामखोर स्वतःची चामडी बचावण्याचा विचार करत होता. मरणाच्या पंथाला लागलेल्या सहकाऱ्याची, लष्करी हुकूमांची अथवा सरोवराकडे गेलेल्या बाकीच्या गटाची त्याला पर्वा नव्हती. त्याचे सर्व विचार आता गुंतले होते एकाच गोष्टीवर—वास्कोवचे लक्ष स्वतःवर वेधून न घेण्यात. आपल्या अदृश्य शत्रूला तो फार घाबरला होता आणि जाड ओंडक्यांच्या झोपडीत राहून जीव वाचवण्याची संधी मिळावी म्हणून देवाची प्रार्थना करत होता.

तर येथे असा एक जर्मन होता जो मृत्यूसमोर शूर वीर ठरला नव्हता. सार्जंट-मेजरला ही जाणीव झाली तेव्हा त्याने सुटकेचा सुस्कारा टाकला.

पिस्तूल परत चामड्याच्या पिशवीत ठेवून वास्कोव अजिबात आवाज न करता मागे गेला. त्याने झपाट्याने झोपडीला वळसा घातला आणि विरुद्ध बाजूच्या विहीरीकडे तो रांगत गेला. त्याच्या अंदाजाप्रमाणे खरोखरच जर्मनाचे प्रेताकडे लक्ष नव्हते. त्यामुळे कोणतीही अडचण न येता सार्जंट-मेजर त्या प्रेतापाशी पोहोचू शकला. सबमशिनगन, काडतूसांची थाळी ह्या वस्तू त्याने हस्तगत केल्या व चूपचाप तो जंगलात परतला.

आता सर्व काही वेगावर अवलंबून होते. कारण त्याने दूरचा मार्ग पत्करला होता. धोका पत्करणे आवश्यक होते,

त्याने तो पत्करला आणि नशीबाने त्याला साथ दिली. शिखराकडे जाणाऱ्या पाईनच्या राईत जेव्हा तो घुसला, तेव्हाच त्याने थोडी विश्रांती घेतली.

इथे त्याचा परिचित प्रदेश होता. ह्या ठिकाणी तो भरपूर सरपटत फिरला होता. जर त्याच्या मुली ही जागा सोडून पूर्वेला गेलेल्या नसल्या, तर इथेच कुठेतरी असायला हव्या होत्या. यदाकदाचित काही घडल्यास दूर निघून जा अशी जरी त्याने स्वतःच त्यांना आज्ञा केली होती, तरी त्यांनी ती तंतोतंत पाळली असेल ह्यावर विश्वास ठेवण्याची वास्कोवची तयारी नव्हती. तो विश्वास ठेवायला तयार नव्हता, त्यावर विश्वास ठेवण्याची त्याची इच्छा नव्हती.

ह्या ठिकाणी त्याने थोडी विश्रांती घेतली. जर्मनांचा कानोसा घेण्यासाठी त्याने कान टवकारले आणि सीन्यूखीना शिखराकडे सावधपणे चालायला आरंभ केला. चोवीस तासांपूर्वी ह्याच वाटेने तो आणि ओस्यानीना गेले होते. त्यावेळी प्रत्येकजण जिवंत होते–लीझा ब्रीच्कीना सोडून.

सरतेशेवटी त्यांनी माघार घेतली होती. मात्र फार दूर नव्हे–पाण्याच्या प्रवाहाच्या पलिकडे. आदल्या दिवशी सकाळी जर्मनांसाठी त्यांनी कार्यक्रम करून दाखवला होता तेथे. फेदोत एवग्राफीचच्या डोक्यात ही कल्पना आली नव्हती. दगडांमध्ये आणि पूर्वीच्या इतर जागी त्या दोघी आढळल्या नव्हत्या, म्हणून हताश मनाने तो तीराकडे गेला होता. इतःपर तो त्यांचा शोध घेत नव्हता, उगीचच विमनस्कपणे भटकत होता. आता तो अगदीं पूर्ण एकाकी होता ही जाणीव त्याला झाली. जखमी हाताचा तो माणूस अगदी एकटा होता. निराशेत तो एवढा गुरफटला होता की त्याच्या मनात सर्व गोष्टींचा एकच

गोंधळ माजला. अत्यंत खिन्न मनःस्थितीत तो पाण्याच्या प्रवाहापाशी पोहोचला. तहान भागवण्यासाठी पाण्याच्या काठाशी तो गुडघ्यांवर वाकला, तोच अस्पष्ट आवाजात त्याला ऐकू आले: "कॉम्रेड सार्जंट-मेजर..."

त्याच शब्दांची परत आरोळी उमटली: "कॉम्रेड सार्जंट-मेजर!"

एकदम उडी मारून तो उभा राहिला. त्या दोघी त्याच्या दिशेने धावत येत होत्या. पाण्यातून धावताना त्यांनी आपले भिजणारे स्कर्टसुद्धा वर उचलून धरले नव्हते. तोसुद्धा त्यांच्याकडे धावला आणि तिघांची प्रवाहाच्या मध्यभागी भेट घडली. त्यांनी एकमेकांना मिठ्या मारल्या. तो मळला होता, घामाने भिजला होता, त्याच्या दाढीची खुंटे वाढली होती... पण ह्या कशाचाही विचार न करता त्या दोघी त्याला बिलगत होत्या, ओठंगत होत्या, त्याची चुंबने घेत होत्या...

"अग पोरींनो, काय हे!.."

त्याला अगदी रडू फुटले होते. त्याच्या डोळ्यांच्या पापण्यांवर आसवे थरथरत होती. तो कमालीचा दुबळा झाला होता. मुलींच्या गळ्यात गळा घालून तो पैलतीराला गेला. कोमेल्कोवा सतत त्याला बिलगत होती, त्याच्या दाढी वाढलेल्या गालाला कुरवाळत होती.

"अग पोरींनो, माझ्या पोरींनो! काही खाल्लंत की नाही, थोडी झोप काढलीत की नाही?"

"आम्हाला इच्छाच झाली नाही, कॉम्रेड सार्जंट-मेजर..."

"आता कसला आलाय सार्जंट-मेजर? तुम्ही माझ्या बहिणी! मी तुमचा भाऊ! यापुढं फेदोत नांवानं हाक मारा. नाहीतर फेद्या... माझी आई मला हाक मारायची तसं..."

त्यांचे ओव्हरकोट, त्यांच्या पडशा आणि रायफली, ह्या वस्तू झुडूपांमध्ये दडवून ठेवलेल्या होत्या. वास्कोव थेट स्वतःच्या पडशीपाशी गेला, पण त्यापूर्वीच झेन्याने विचारले :

"आणि गाल्या? .."

तिने शांतपणे, चाचरत विचारले होते. त्यांना सर्व काही समजले होते, पण केवळ ठाम खात्री करून घ्यायची होती. सार्जंट-मेजरने उत्तर दिले नाही. मुकाटपणे त्याने पडशी उघडली व कोरडा पाव, खारवलेली डुकराची चरबी आणि कुपी बाहेर काढली. तीन भांड्यांमध्ये त्याने थोडे थोडे स्पिरिट ओतले, पावाचे तुकडे केले आणि चरबीचे तुकडे कापले. मुलींच्या हाती त्याने भांडी दिली व स्वतःचे भांडे उंच करत तो म्हणाला :

"आपल्या कॉम्रेडना वीरमरण आलं. गाल्या चेत्वेर्तकिला चकमकीत आणि लीझा ब्रीच्कीनाला दलदलीत. सोन्याही गेली. आपण तिघींना गमावलं. अशी परिस्थिती आहे. पण जवळ जवळ चोवीस तास आपण शत्रूला हुलकावणी देतोय. चोवीस तास! .. आता पुढचे चोवीस तास जिंकण्याची आपली पाळी. कोणतीही कुमक येण्याची अपेक्षा आपण धरू शकत नाही आणि जर्मन ह्या दिशेनं येत आहेत. तर आपल्या बहिणींच्या आठवणींचा आपण मान राखू या आणि मग कारवाईला सज्ज होऊ या. कदाचित आपली शेवटचीच लढाई..."

## १३

तुमच्या अंगावर चालून येणाऱ्या अजस्र अस्वलीसारख्या जातीचे एक संकट असते. तुमच्या चिंध्या करू पाहणारे,

आत्यंतिक पराकोटीला नेणारे. पण मग ते तुमचा पिच्छा सोडते आणि तुम्हाला भासते – अजून तुम्ही जिवंत आहात, श्वासोच्छ्वास करत आहात व जणू काही घडलेच नाही अशा रीतीने कालक्रमणा करू शकाल. पण काहीवेळा एक छोटी चूक घडते, अगदी क्षुल्लक, निव्वळ दुर्लक्षापायी – पण तिचे परिणाम महाभयानक घडतात. कुणाच्याही वाट्याला येऊ नयेत असे भोग असतात.

अशी क्षुल्लक बाब वास्कोवच्या बाबतीत घडली. न्याहरी-नंतर तो लढाईची पूर्वतयारी करू लागला होता. त्याने पडशी चाचपली, झटकून पाहिली, आतील प्रत्येक वस्तू तीन-तीनदा हात लावून तपासली – पण त्याला हव्या त्या वस्तू सापडेनात. दुसऱ्या ग्रेनेडसाठी काना आणि पिस्तूलासाठी काडतूसे ह्या वस्तुत: अगदी किरकोळ गोष्टी होत्या. पण काना नसेल तर ग्रेनेड म्हणजे निव्वळ लोखंडाचा गोळा होता. फरसबंदी दगडासारखा मुका.

"पोरींनो, आपल्यापाशी आता तोफखाना नाही."

मुलींना अस्वस्थ वाटू नये म्हणून तो स्मित करत म्हणाला. आणि त्या वेडपट पोरींनीही उजळ मुद्रांनी उलट स्मित केले.

"काही हरकत नाही फेदोत. आपण त्याशिवाय निभवून नेऊ."

कोमेल्कोवा हे म्हणाली होती आणि त्याचे नांव उच्चारताना किंचित अडखळली होती. ती लाजलीसुद्धा. तसे घडणे स्वाभा-विक होते, कारण स्वत:च्या कमांडरला त्याच्या पहिल्या नांवाने हाक मारायची तिला कधी सवय नव्हती.

जर्मन गोळीबाराला प्रत्युत्तर करायला त्यांच्यापाशी तीन रायफली, दोन सबमशिनगन आणि एक रिवॉल्वर एवढी शस्त्रे

होती. शत्रू त्यांच्यावर दहा सबमशिनगनांमधून आगीचा वर्षाव करू शकत असताना हा शस्त्रसाठा अपुरा होता. पण जंगल मदत करील, जंगल आणि पाण्याचा प्रवाह त्यांच्या साहाय्याला येतील, अशी त्यांना आशा वाटत होती.

"रीता, तुझ्या सबमशिनगनसाठी आणखी एक थाळी. लक्षात ठेव, मोठ्या फैरी उडवू नकोस. पैलतीरावर गोळीबार करायला रायफल वापर आणि जेव्हा ते पाणी ओलांडून यायला लागतील, तेव्हासाठी सबमशिनगन राखून ठेव. तेव्हा तिचा फार चांगला उपयोग होईल."

"समजलं मला, फेदोत..."

हीसुद्धा अडखळली. वास्कोव हसून म्हणाला:

"फेद्या म्हणून मला हाक मारणं तुला जास्त सोपं जाईल. अर्थात फेदोत हे काही रुबाबदार नांव नव्हे, पण तेच नांव मला ठेवण्यात आलंय..."

गेल्या चोवीस तासांचा जर्मनांवर चांगलाच परिणाम घडला होता. आता ते त्रिवार सावध होते आणि दर दगडामागे चाचपून पाहण्यापायी त्यांची प्रगती खूपच मंदावली होती. जास्तीत जास्त प्रमाणात त्यांनी तो प्रदेश धुंडाळून काढला आणि प्रवाहाच्या तीरापाशी ते पोहोचले तेव्हा सूर्य आकाशात चांगलाच वर चढला होता. प्रत्येक गोष्टीची अगदी निकट पुनरावृत्ती घडत होती, फक्त पाण्यापलिकडील जंगलात मुलींचे आवाज घुमत नव्हते. ती शांतता गूढ आणि धास्तावणारी होती. जर्मनांना धोक्याची पूर्ण जाणीव होती. पाण्याच्या काठाशी यायला त्यांनी खूप टंगळमंगळ केली. मात्र झुडूपांमधून त्यांचे ओझरते दर्शन घडत होते.

पाण्याच्या प्रवाहाने जेथे रुंद वळण घेतले होते, तेथे फेदोतने

मुलींना ठेवले होते. त्याने त्यांच्या जागा निवडल्या आणि माऱ्याची क्षेत्रे ठरवून दिली. आदल्या दिवशी झेन्या कोमेल्कोवाने अक्षरशः स्वतःच्या देहाने जर्मनांना जेथे थोपवून धरले होते, ती जागा फेदोतने आज स्वतःसाठी निवडली. ह्या ठिकाणी तीर एकमेकांना जवळजवळ भिडले होते, पाण्याच्या दोन्ही बाजूंच्या कडेपासून जंगल सुरू होत होते आणि पायउताराला ह्या जागेएवढी दुसरी उत्तम जागा नव्हती. ह्याच जागी जर्मनांनी स्वतःचे मुद्दाम वारंवार दर्शन घडवले होते. संयम नष्ट झालेल्या शत्रूला चिथावण्याचा त्यामागे त्यांचा हेतू होता. वास्कोवच्या गटात अद्याप कुणाचा संयम सुटलेला नव्हता, कारण जर्मन पाण्यात उतरेपर्यंत गोळीबार करायचा नाही, अशी त्याने आपल्या सैनिकांना सक्त ताकीद दिली होती. त्या क्षणापर्यंत श्वासोच्छ्वाससुद्धा जपून करा, असा त्याने हुकूम केला होता. पक्षी बिचकू नयेत आणि त्यांची गाणी थांबू नयेत म्हणून ही खबरदारी आवश्यक होती.

सर्व गोष्टी हाताशी असल्याची त्याने परत खात्री करून घेतली: काडतूसे ठासली होती, रायफलींचे सुरक्षा चाप चढवलेले होते: ठरल्या वेळेआधी नीलकण्ठ पक्षांनीसुद्धा इशारा देऊ नये म्हणून. समोरचा तीर सार्जंट-मेजर शांतपणे न्याहाळत होता. मात्र त्याचा नतद्रष्ट हात दुखऱ्या दाताप्रमाणे ठणकत होता.

पैलतीरावर परिस्थिती अगदी वेगळी होती. गाणारे पक्षी एकदम गप्प झाले, नीलकण्ठांची अविरत वटवट चालली होती. फेदोतच्या ध्यानातून ह्या गोष्टी सुटल्या नव्हत्या. तो वाट पहात बसून होता. जर्मनांना वाट पाहण्याचा केव्हा नेमका कंटाळा येईल ह्याचा अंदाज बांधत होता.

जरी त्याने पहिली गोळी झाडली नव्हती आणि जरी ह्या गोळीबाराची अपेक्षा त्याने केली होती, तरीही त्यामुळे तो दचकला. बार नेहमीच अचानक, नेहमीच अनपेक्षित असतो. खालच्या प्रवाहाला, त्याच्या डावीकडे गोळीबार झाला होता. त्या पाठोपाठ अनेक बार झाले. वास्कोवने नदीच्या वळणाकडे नजर टाकली. एक जर्मन हातापायांवर रांगत पाण्यातून परत स्वत:च्या तीराकडे जात होता. त्याच्या सभोवार गोळया उडत होत्या, पण त्याला मात्र लागत नव्हत्या. टोकदार गोटयांवरून एक पाय ओढत तो जर्मन हातापायांवर रांगत, धडपडत गेला.

जखमी जर्मनाला संरक्षण देण्यासाठी मग सबमशिनगनच्या फैरी उडाल्या. धावत आपल्या पोरींपाशी जाण्याची सार्जंट-मेजरला तीव्र इच्छा झाली होती, पण त्याने मोठया कष्टाने ती ऊर्मी आवरली आणि अगदी योग्य वेळी. झुडूपांमधून चार जर्मन एकाचवेळी दुसऱ्या बाजूने बाहेर पडले होते. गोळीबाराचा आडोसा घेऊन नदी ओलांडायची आणि जंगलात पसार व्हायचे असा त्यांचा इरादा होता. अशा परिस्थितीत रायफल कामाची नव्हती, कारण प्रत्येक गोळीनंतर बोल्ट खेचायला पुरेसा अवधी नव्हता. म्हणून फेदोत एवग्राफीचने सबमशिनगन उचलली. त्याने चाप ओढताच पैलतीरावरील झुडूपांमधून दोन ठिकाणांहून उजेड चकाकू लागला व त्याच्या डोक्यावरची हवा कापत गोळया सणसणत जाऊ लागल्या.

माघार घ्यायची नाही एवढी एकच गोष्ट ह्या लढाईबाबत वास्कोवला निश्चित ठाऊक होती. आपल्या बाजूची मूठभर मातीसुद्धा गमावायला तो तयार नव्हता. कितीही अवघड परिस्थिती असली, कितीही निराश असली, तरी तो स्वत:च्या

जागेवरून हलणार नव्हता. त्याला ठाण मांडून बसणे आवश्यक होते, अन्यथा शत्रूने त्याला चिरडून टाकले असते—आणि ती अखेर ठरली असती. आपल्यापाठी सबंध रशिया असल्याची भावना त्याच्या मनात होती. जणू फक्त एकटा तो—फेदोत एवग्राफीच वास्कोव—रशियाचा शेवटचा पुत्र उरला होता आणि रशियाचे रक्षण करत होता. दुसरे कुणीही नव्हे. सबंध जगात फक्त तो होता, शत्रू होता आणि रशिया.

पण मुली—त्यांच्या रायफली अद्याप उडत होत्या अथवा नाही ते ऐकायला त्याने आपला तिसरा कान उघडा ठेवला होता. ज्याअर्थी त्या गोळ्या झाडत होत्या, त्याअर्थी त्या जिवंत होत्या. त्याचा अर्थ त्या स्वत:ची आघाडी, स्वत:चा रशिया, लढवत होत्या. अद्याप त्या लढत होत्या!

त्या दिशेने ग्रेनेड फुटू लागले होते तरीही तो घाबरला नव्हता. लढाईत खंड पडणे अपरिहार्य होते अशी त्याला आंतरिक जाणीव होती, कारण सामर्थ्य माहीत नसलेल्या शत्रूबरोबर प्रदीर्घ लढाई करणे जर्मनांना शक्य नव्हते. त्यांनाही परिस्थिती जोखून पाहणे आवश्यक होते, स्वत:ची पाने चाळून पहायला हवी होती आणि मगच नव्या डावाला आरंभ करायला हवा होता.

पाण्यामधून त्याच्याकडे येणारे चार जर्मन एवढ्या चटकन मागे पळाले होते की, त्याने कुणाला टिपले होते अथवा नाही, ह्याची शहानिशा करणे त्याला जमले नव्हते. झुडूपांआडून त्यांनी त्याच्यावर उलट गोळीबार केला, त्याला घाबरवण्याचा प्रयत्न केला, पण ते थांबले आणि आता पायावर फक्त धूर तरंगत होता.

त्याने काही मिनिटे जिंकली होती. अर्थात मिनिटांनी वेळ

मोजायचा हा दिवस नव्हता. कारण त्याला कुठूनही मदत येण्याची आशा नव्हती. तरीही त्यांनी शत्रूचा चावा घेतला होता, आपले तीक्ष्ण दात त्याला दाखवले होते. अधिक सावधगिरी बाळगल्याविना ह्या जागी तो परत प्रयत्न करणे संभवनीय नव्हते. वास्कोवला खात्री होती की, दुसऱ्या एखाद्या ठिकाणाहून—बहुधा प्रवाहाच्या वरच्या अंगाने—नदी ओलांडण्याचा शत्रू प्रयत्न करील. कारण वाकणाखाली तीरांवर गुळगुळीत दगडांच्या भिंती होत्या. म्हणून स्वतःच्या जागी एका मुलीला बसवून त्याला आणखी उजव्या दिशेकडे धावणे आवश्यक होते.

स्वतःच्या शिपायांची रचना कशी करावी ह्याबद्दल विचार करायला वास्कोवला सवड मिळण्यापूर्वीच त्याच्या पाठीशी पावले वाजली. त्याने मागे वळून पाहिले, तर कोमेल्कोवा झुडूपांमधून थेट त्याच्या अंगावर धावत येत होती.

"डोकं खाली ठेव!"

"लौकर! .. रीताला..."

रीताला काय झाले होते ह्याची फेदोतने विचारणा केली नाही. कोमेल्कोवाच्या डोळ्यांनी त्याला सर्व हकीकत सांगितली होती. त्याने आपली शस्त्रे चटकन उचलली व कोमेल्कोवाच्या आधी तो त्या ठिकाणी धावत पोहोचला. पाईनच्या झाडाखाली रीना अंगाची मुटकुळी करून बसली होती. पांढुरक्या ओठांवर स्मित आणण्याचा तिने प्रयत्न केला. सतत जीभ फिरवून ती ओठ ओले करत होती. तिने पोटावर हात आवळून धरले होते आणि हातांवरून रक्ताचे ओघळ वाहात होते.

"कशानं...?"

"ग्रेनेड..."

त्याने रीताला उताणे झोपवले आणि तिचे हात पकडले. त्याने ते करावे अशी तिची इच्छा नव्हती, वेदनेची तिला भीती वाटत होती. हळुवारपणे त्याने तिचा हात बाजूला केला आणि अखेर आल्याचे त्याला समजले... काय होते ते समजणेसुद्धा अवघड होते, कारण एकच खिचडी तेथे बनली होती – रक्त, फाटलेले कापड, मांसात घुसलेला कातडी पट्टा.

"मला फडकी पाहिजेत!" तो ओरडला. "तुझ्यापाशी असतील तेवढे सगळे आतले कपडे!"

थरथरत्या हातांनी झेन्याने एव्हाना स्वतःची पडशी उघडली होती व काही सुबक अंतर्वस्त्रे ती त्याच्या हाती देत होती.

"रेशमी नको, सुती कापड!"

"नाही..."

"च्यायला!.." तो स्वतःच्या पडशीपाशी धावला आणि गाठींशी त्याने झटापट केली. गाठी घट्ट बांधलेल्या होत्या...

"जर्मन..." रीताच्या ओठांनी हालचाल केली. "कुठं आहेत जर्मन?"

क्षणभर झेन्याने रीताकडे शून्य नजरेने पाहिले आणि दुसऱ्याच क्षणी तिची सबमशिनगन उचलून एकही कटाक्ष मागे न टाकता ती तीराकडे धावली.

एक अंतर्वस्त्र आणि बँडेजच्या दोन गुंडाळ्या घेऊन सार्जंट-मेजर परतला. रीताने काहीतरी समजावण्याचा प्रयत्न केला, पण त्याने ऐकले नाही. दात आवळून त्याने तिचे रक्ताने चिंब भिजलेले कपडे सुरीने फाडले. ग्रेनेडचा कपचा तिच्या शरीरात तिरका घुसला होता आणि त्याने तिचे पोट चिरले होते. काळपट रक्तामधून निळसर-राखाडी आतडी दिसत

होती. त्याने जखमेवर आपल्या अंतर्वस्त्राची घडी टाकली आणि बँडेज गुंडाळायला आरंभ केला.

"सगळं ठीक आहे रीता... फक्त वरती जखम झालीय... आत सगळं ठीक आहे. तू बरी होशील..."

तीरावर गोळ्यांचा कडकडाट वाजला. पुन्हा एकदा वादळ सुरू झाले. पाने विखरली जात होती आणि वास्कोव बँडेज बांधत होता. पण दरवेळी रक्ताने ते ताबडतोब भिजत होते.

"तिकडं जा..." रीता कष्टाने म्हणाली. "झेन्या... तिथं..."

आणखी एक फैर त्यांच्यापर्यंत पोहोचली. ह्यावेळी ती डोक्यावर नव्हती, त्यांच्यावर रोखलेली होती, पण त्यांना गोळ्या लागल्या नव्हत्या. सार्जंट-मेजर झपदिशी मागे फिरला आणि क्षणभर ओझरत्या दिसलेल्या आकृतीवर त्याने दोनदा पिस्तूल झाडले. जर्मनांनी नदी ओलांडली होती.

झेन्याची सबमशिनगन अजून वाजत होती. जंगलात माघार घेत दूर जात असताना अजून ती आग ओकत होती. जर्मनांना हुलकावणी देत वास्कोव आणि रीतापासून ती त्यांना दूर नेत होती हे वास्कोवला समजले होते. जर्मन तिच्या पाठीशी धावत होते, पण सर्व नव्हे. जवळपास कुठेतरी आणखी एक जर्मन दिसला आणि सार्जंट-मेजरने आणखी एक गोळी झाडली. तेथून हलणे, ओस्यानीनाला दूर उचलून नेणे आवश्यक होते, कारण जर्मन खूप जवळ येऊन ठेपले होते आणि प्रत्येक क्षण त्यांचा अखेरचा ठरणे शक्य होते.

त्याने रीताला उचलले. वेदनेपायी तिने पांढुरके ओठ जोरात चावले आणि ती काहीतरी पुटपुटली. पण त्याने काहीही ऐकले नाही. त्याला रायफल उचलायची होती, पण तसे करणे

जमले नाही. झुडूपांमध्ये धावताना त्याला दर पावलागणिक जाणवत होते की, भयानक ठणकणाऱ्या त्याच्या डाव्या दंडामधील शक्ती क्षीण होत चालली होती.

पडशा, रायफली, ओव्हरकोट आणि झेन्याची अंतर्वस्त्रे—सुंदर, सुबक पण त्या क्षणी सार्जंट-मेजरच्या उपयोगाची नसलेली—त्या पाईनच्या झाडाखालीच राहिली...

सुंदर अंतर्वस्त्रांची आवड हा झेन्याचा दुबळेपणा होता. अनेक गोष्टींविना तिचे चालायचे आणि त्याबाबत तिला फिकीर वाटायची नाही, कारण तशी ती आनंदी वृत्तीची, स्नेहाळू मुलगी होती. पण युद्धाच्या आधी तिच्या आईने भेट दिलेली ती सुंदर अंतर्वस्त्रे लष्करी पडशीमधून झेन्या हट्टाने बाळगत होती. त्याबाबत सतत ताकीद, शिक्षा व सैनिकाला भोगाव्या लागणाऱ्या गैरसोयी अनुभवूनही तिने त्या अंतर्वस्त्रांना जवळ बाळगले होते.

अंतर्वस्त्रांची एक जोडी तर फारच सुंदर होती. कुणाचेही डोके फिरवून टाकणारी होती. झेन्याच्या वडिलांनाही बोलावे लागले होते: "झेन्या, हा जरा अतिरेकच झाला! कोणत्या प्रसंगासाठी आहेत हे कपडे?"

"मी पार्टीला चाललेय!" झेन्याने अभिमानाने सांगितले. अर्थात वडलांचा विचारण्याचा रोख वेगळा होता ह्याची तिला जाणीव होती.

त्या दोघांमध्ये खूप छान सामंजस्य होते.

"रानडुकराच्या शिकारीला येतेस माझ्याबरोबर?"

"मी तिला सोडणार नाही!" घाबरून झेन्याची आई म्हणायची. "लहानग्या पोरीला शिकारीवर न्यायला तुला काय खूळ लागलं?"

"होऊं दे सवय!" वडील हसून म्हणायचे. "लाल सेनेतल्या कमांडरच्या मुलीनं कशालाही भिता कामा नये."

झेन्याला कसलीच भीती नव्हती. ती घोडदौड करायची, रायफल उडवण्याचा सराव करायची, रानडुकरांच्या शिकारीला वडिलांबरोबर जायची, वडिलांच्या फटफटीवर बसून सबंध शिबंदीचे गाव दणाणून टाकायची. समारंभप्रसंगी ती जिप्सी आणि स्पॅनिश नृत्ये करायची, गिटारच्या साथीवर गाणी म्हणायची आणि निमुळत्या कंबरांच्या लेफ्टनंटांबरोबर प्रणयचाळे खेळायची. प्रेमात न गुरफटता, केवळ मनोरंजनाखातर तिचे हे उद्योग चालायचे.

"झेन्या, त्या लेफ्टनंट सेर्गेईचूकचं डोकं तू पार फिरवून टाकलं आहेत. आज तो मला वर्दी द्यायला लागला: 'कॉम्रेड झेन्या, माफ करा, जनरल...'"

"बाबा, उगीच थापा मारू नका!"

तो काळ मोठा मजेचा, आनंदाचा होता. पण आई मात्र ननन कपाळाला आठ्या घालायची आणि उसासे टाकायची. झेन्यासारखी वाढलेली मुलगी, एव्हाना उपवर झालेली, आणि अशी वागते... तिच्या आईला असे वर्तन अनाकलनीय होते. कधी नेमबाजी, घोडदौड आणि फटफटी, तर कधी पहाट फुटेपर्यंत नाचणे. लेफ्टनंटांकडून भेट मिळणारे भलेमोठे पुष्पगुच्छ, तिच्या खिडकीखाली उभे राहून त्यांनी आळवलेली प्रेमगीते आणि तिला पाठवलेली काव्यमय प्रेमपत्रे.

"झेन्या, लाडके, असं तू वागू नयेस. लोक तुझ्याबद्दल काय काय बोलतात, ठाऊक आहे?"

"लोकांना काय बोलायचं ते खुशाल बोलू देत, आई!"

"म्हणतात की कर्नल लूझिनबरोबर तू सारखी दिसतेस. तो विवाहित माणूस आहे. झेन्या, अशी कशी तू?"

"जणू काही लूझिनची मला गरजच होती!" खांदे उडवून झेन्या म्हणाली आणि पळून गेली.

लूझिन खूप देखणा होता. त्याच्या भोवती गूढतेचे आणि, शौर्याचे वलय होते. त्याला खाल्खीन-गोल येथे पराक्रम गाजवल्याबद्दल लाल ध्वजेच्या किताबाचा सन्मान मिळाला होता व फिन्लंडच्या मोहीमेबद्दल लाल तारा मिळाला होता. झेन्या ह्या विषयावर संभाषण टाळत होती त्यामागे काही कारण असावे, अशी झेन्याच्या आईची भावना होती व म्हणूनच तिला अधिक चिंता वाटत होती...

झेन्याच्या कुटुंबातील सर्व माणसे ठार मारली गेल्यानंतर, सोविएत सीमेत झेन्या जेव्हा परतली, तेव्हा लूझिनने तिला आसरा दिला होता. त्याने तिला मदत केली, तिला संरक्षण दिले व तिचे सांत्वन केले. तिच्या असहायतेचा त्याने फायदा उचलला होता असे कुणीही म्हणू शकले नसते, पण त्याने तिचे प्रेम जिंकले होते. तिला पाठबळ हवे होते; रडायला, आधाराला कुणाचा खांदा हवा होता; त्या भयानक युद्धकाळात जगात तिला उभे रहायला मदत करणारा, सहानुभूती बाळगणारा, असा कुणीतरी तिला हवा होता. आता सर्व काही अपेक्षेप्रमाणे चालले होते—झेन्या स्वत:चा तोल घालवणार नव्हती, तिने तसे कधीच केले नव्हते. तिची स्वत:वर श्रद्धा होती आणि आता ओस्यानीनापासून जर्मनांना हुलकावून दूर नेतानाही, सर्व काही व्यवस्थित पार पडेल याबाबत तिच्या मनात क्षणभरही संशय आला नव्हता.

पहिली गोळी तिच्या कुशीत घुसली, तेव्हासुद्धा तिला फक्त

आश्चर्य वाटले. एकोणीसाव्या वर्षी मरण्याचा विचार फारच विचित्र होता. अत्यंत मूर्खपणाचा होता, साक्षात असंभवनीय होता.

जर्मनांची गोळी तिला योगायोगाने लागली होती. पानांच्या जाळीमधून ते अंदाजाने गोळीबार करत होते. गप्प राहून आणि काळ काढून नंतर निसटण्याची संधी तिला मिळाली असती. पण दारूगोळा संपेपर्यंत ती गोळीबार करत राहिली. रक्तस्रावाबरोबर तिची शक्ती क्षीण होत चालल्याने आता न पळता एकाच जागी पडून ती गोळ्या झाडत होती. जर्मनांनी तिला अगदी जवळून गोळ्या घातल्या. मृत्यूनंतरही मानी आणि सुंदर दिसणाऱ्या तिच्या चेहऱ्याकडे ते कितीतरी वेळ टक लावून पहात राहिले...

## १४

स्वत:ला प्राणांतिक जखम झाल्याचे रीताला ठाऊक झाले होते. मरण प्रदीर्घ आणि यातनादायी होणार हेही तिला माहीत होते. अद्यापपावेतो कोणतीही वेदना नव्हती, फक्त तिच्या पोटात एक जळती संवेदना होती. ती पेटती संवेदना हळूहळू वाढत होती आणि तहान वाढवत होती. पण पाणी प्यायचे नाही हे तिला माहीत होते, म्हणून तिने फडक्याचे टोक एका डबक्यात बुडवले आणि ओठ ओले केले.

एका कोसळलेल्या फर वृक्षाच्या मूळांखाली वास्कोवने तिला लपवले होते आणि वरती फांद्यांनी तिचा देह झाकून तो गेला होता. गोळीबार अजूनही ऐकू येत होता, पण लौकरच सर्व शांत झाले आणि रीता रडू लागली. आवाज न करता,

हुंदके न देता, मूकपणे तिचे रडणे चालले होते. आसवांच्या धारा तिच्या गालांवरून ओघळत होत्या. झेन्या इतःपर जिवंत नव्हती हे तिला समजले होते.

नंतर अश्रू वाहणे थांबले. आता तिला तोंड द्याव्या लागणाऱ्या प्रचंडतेसमोर आसवांनी माघार घेतली होती. सामोऱ्या येणाऱ्या परिस्थितीपुढे तिला नमते घ्यावे लागले होते आणि स्वतःला तयार करणे भाग होते. तिच्या पावलांपाशी एक थंडगार, काळी पोकळी आ वासून होती. रीता तिच्याबद्दल धैर्याने, कोणतीही भावनाप्रधानता न राखता विचार करत होती.

स्वतःबद्दल, स्वतःच्या जीवनाबद्दल, यौवनाबद्दल आता ती खेदाने सुस्कारे टाकत नव्हती. कारण स्वतःपेक्षा फार अधिक महत्त्वाच्या गोष्टीचा तिने सतत विचार केला होता. स्वतःच्या मुलाला आता पोरका सोडणार होती. आता तो एकटा मागे पडणार होता, तिच्या आजारी आईला त्याचा सांभाळ करावा लागणार होता. युद्धादरम्यान तो कसा वाढेल आणि कोणत्या प्रकारचे जीवन त्याच्या वाट्याला येईल, ह्याबद्दलचे चित्र नजरेसमोर आणण्याचा रीताने प्रयत्न केला.

लौकरच वास्कोव परत आला. त्याने फांद्या बाजूला सारल्या आणि जखमी हाताला डोलवत तो मुकाट बसून राहिला.

"झेन्या ठार झाली?"

त्याने होकारार्थी मान हलवली. क्षणभरानंतर तो म्हणाला:

"आपल्या पडशा गायब झाल्या. पडशा आणि रायफली. एक तर ते सोबत घेऊन गेले अथवा त्यांनी कुठंतरी लपवून ठेवल्या."

"झेन्या... पटकन मेली?"

"ताबडतोब," तो म्हणाला. पण तो खरे बोलत नव्हता हे तिला समजले. "ते निघून गेलेत. बहुधा स्फोटक वस्तू आणायला..." तिच्या मंदावलेल्या, सर्वज्ञानी कटाक्षाकडे त्याचे लक्ष गेले आणि अचानक तो ओरडला: "त्यांनी आपल्यावर मात केली नाही, समजलं? मी अजून जिवंत आहे आणि मला पराभूत करणं तेवढं सोपं नाही त्यांना!"

तो बोलायचा एकदम थांबला, त्याने दात कराकरा चावले आणि परत हात डोलवायला आरंभ केला.

"दुखतोय?"

"इथं दुखतंय," छातीवर हात आपटत तो म्हणाला. "इथं कुरतडतंय, उंदरानं कुरतडावं तसं! मी तुम्हाला ह्या लढाईत घातलं, पाचही जणींना — कशासाठी? मूठभर फ्रीत्सांसाठी?"

"स्वतःला दोषी ठरवू नकोस... हे युद्ध आहे..."

"युद्ध चालू आहे तोवर ठीक आहे, पण शांतताकाळात माणसं त्याच रीतीनं विचार करतील ह्याचा? तुम्हा सगळ्याजणींना का मरावं लागलं हे समजेल त्यांना? आणि जर्मनांना मी तसंच जाऊ का दिलं नाही, असा निर्णय मी का घेतला? 'आमच्या मातांचं तुम्ही पुरुषांनी गोळ्यांपासून रक्षण का केलं नाही? त्यांचं मरणाशी लग्न लावून तुम्ही जिवंत कसे राहिलात? कीरोव रेल्वे आणि पांढऱ्या समुद्राचा कालवा तुम्हाला त्यापेक्षा जास्त महत्त्वाचा वाटला? फक्त पाच मुली आणि रिव्हॉल्वरवाला एक सार्जंट-मेजर, यांच्यापेक्षा जास्त शिपाई तिथं पहाऱ्याला असतील!' असं लोक मला विचारतील तेव्हा मी काय उत्तर देऊ?"

"नको रे बोलू असं," क्षीणपणे ती म्हणाली. "कुणाची

मायभूमी काही कालव्यांपासून सुरू होत नाही. तिथून मुळीच नाही. आपल्या मायभूमीचं आपण रक्षण केलं. प्रथम तिचं आणि मग त्या कालव्याचं."

"हं..." वास्कोवने जडपणे एक सुस्कारा टाकला आणि तो गप्प झाला. "तू इथंच पडून रहा, तोवर मी आसपास नजर टाकून येतो. नाहीतर नेमकी त्यांच्याशी टक्कर व्हायची आणि सगळंच संपायचं." त्याने पिस्तूल बाहेर काढले व का कुणास ठाऊक, स्वतःच्या बाहीवर काळजीपूर्वक घासून त्याने त्याला चकचकीत केले. "हे घे. त्यात फक्त दोन काडतूसं उरली आहेत, पण तरीही ते जवळ असलं की मन शांत राहील."

"थांब!" रीता त्याच्या चेहऱ्यापलिकडे टक लावून पहात होती–फांद्यांनी अर्धवट झाकलेल्या आकाशात. "आपल्या स्टेशनापाशी मला जर्मन दिसले होते ते आठवतं? शहरात राहणाऱ्या माझ्या आईला भेटायला मी गेले होते. तिथं माझ्या छोटा मुलगा आहे, तीन वर्षांचा. आलीक म्हणतात त्याला. त्याचं खरं नांव आल्बेर्त. आई खूप आजारी आहे आणि फार काळ जगणार नाही. माझे वडील युद्धआघाडीवर बेपत्ता आहेत."

"चिंता करू नको, रीता. मला सगळं समजलं."

"तुझे उपकार मानते." तिच्या रंगविहीन ओठांवर स्मित उमटले. "आता माझी शेवटची इच्छा पार पाडशील?"

"नाही," तो म्हणाला.

"नाकारण्यात काय अर्थ? काहीही झालं तरी मी मरणार. फक्त जास्त वेदना भोगाव्या लागतील एवढंच!"

"मी थोडी टेहळणी करतो आणि परततो. रात्री आपण आपल्या लोकांपर्यंत पोहोचू."

"माझं चुंबन घे," अचानक ती म्हणाली.

तो कसाबसा तिच्यावर ओणवा झाला आणि तिच्या कपाळाचे त्याने लाजरे चुंबन घेतले.

"तुझी दाढी टोचतेय..." डोळे मिटत अगदी अस्पष्ट आवाजात ती म्हणाली. "आता जा. माझ्यावर फांद्या पसर आणि जा."

तिच्या पांढुरक्या, खोल गेलेल्या गालांवर सावकाशपणे [illegible] ओघळली. फेदोत हलकेच उठला, रीताला त्याने [illegible] काळजीपूर्वक झाकले आणि नदीच्या प्रवाहाकडे, [illegible] दिशेने तो निघाला.

[illegible] ग्रेनेड – त्याचे एकमेव शस्त्र – त्याच्या खिशात [illegible] होता.

[illegible] एक मंद आवाज त्याने ऐकला – नव्हे [illegible]. तो आवाज तात्काळ फांद्यांखाली विरून [illegible]. जंगलची शांतता कान देऊन ऐकू लागला. [illegible] अविश्वासाच्या भावनेने, फरच्या झाडाकडे [illegible].

[illegible] पिस्तूल झाडले होते आणि [illegible]. जखमेभोवती निळ्या भुकटीच्या [illegible] त्या जखमेकडे वास्कोव खूप [illegible] पहात राहिला. मग त्याने रीताला उचलून [illegible] अंतरावर नेऊन ठेवले व ती जेथे झोपली होती, त्याच जागी तो खड्डा खणू लागला. तेथे जमीन मऊ होती आणि भराभर खणले जात होते. त्याने काठीने माती भुसभुशीत

केली, मग मुठी भरभरून माती बाजूला टाकली आणि सुऱ्याने मूळे तोडली. जे काही करायचे होते ते त्याने झटपट उरकले आणि मग विश्रांतीसाठी न थांबता तो तडक झेन्याचा देह पडला होता तेथे गेला. त्याच्या दंडात असह्य ठणका बसल्या होत्या, खुपसल्याप्रमाणे वेदना होत होत्या. झेन्यासाठी व्यवस्थित थडगे खणणे त्याला अशक्य ठरले. हा विचार त्याच्या मनाला खात राहिला. त्याला त्याबद्दल खेद वाटत होता आणि सुकलेल्या, तडकलेल्या ओठांमधून सतत तो पुटपुटत होता: "माफ कर मला, झेन्या, माफ कर..."

झोकांड्या खात आणि अडखळत, सीन्युखीना डोंगर ओलांडत तो जर्मनांकडे निघाला. थिजलेल्या पकडीत त्याने शेवटचे काडतूस असलेले रिवॉल्वर धरले होते. लौकरात लौकर जर्मनांची गाठ घ्यायची आणि आणखी एकाला ठार मारायचे, एवढ्या एकाच विचाराने आता त्याला झपाटले होते. कारण इतःपर त्याच्यात बळ उरले नव्हते. अजिबात ताकद उरली नव्हती. त्याच्या सबंध देहात फक्त वेदना भरून राहिली होती...

अजून उबदार असलेल्या दगडांवर शुभ्र संधिप्रकाश हळूच पसरला. पोकळ्यांमध्ये धुके भरू लागले होते, वारा पडला होता आणि डासांच्या झुंडी त्याच्या डोक्यावर घोंघावत होत्या. ह्या शुभ्र धूसरतेत त्याच्या पाचही मुली त्याच्या नजरेसमोर उभ्या राहिल्या. तो पुटपुटत होता, दुःखाने मानेला सतत झटके देत होता: अजून जर्मनांचा पत्ता नव्हता. जरी तो उघडपणे चालत होता, त्यांना भेटायला अधीर झाला होता, तरी ते अवतरले नव्हते, त्यांनी गोळीबार केला नव्हता. हे युद्ध संपवण्याची आता वेळ झाली होती, त्याला पूर्णविराम

देण्याची घटका भरली होती आणि हा पूर्णविराम आता त्याच्या रिवॉल्वरच्या पोलादी-निळसर नळीत होता.

त्याच्यापाशी काना नसलेला एक ग्रेनेड होता हे खरे– कोंबडाचा गोळा. कशाला तो हे ओझे बाळगून फिरत होता हे त्याचे त्यालाच समजत नव्हते. सवयीपायी केवळ तो त्या ग्रेनेडला सोबत घेऊन फिरत होता. लष्करी मालमत्तेची देखरेख करण्याच्या त्याच्या सार्जंट-मेजरी सवयीपायी. आता त्याच्यापुढे उद्दिष्ट नव्हते. इच्छेविना दुसरे काहीही नव्हते. वळसे [illegible] तो गेला नाही, पावलांच्या ठशांचा त्याने शोध घेतला [illegible] परिपाठानुरूप तो सरळ चालत होता. तरीही जर्मनांचा [illegible] नव्हता...

[illegible] गाई त्याने ओलांडली होती आणि आता तो जंगला- [illegible] प्रत्येक मिनिट त्याला लेगोन्तच्या आश्रमाकडे [illegible] त्याच सकाळी त्या स्थळी त्याने अत्यंत [illegible] होते. सर्व जागा सोडून तो तेथेच [illegible] करायला तो थबकला नव्हता. [illegible] अचूक अंत:प्रेरणेने त्याला नेमके [illegible] आणि आता त्याच अंत:प्रेरणेशी आज्ञा- [illegible] केली. कानोसा घेतला व तो [illegible]

[illegible] मोकळे मैदान काही शेकडा [illegible] होते. हे काही शेकडा मीटर [illegible] आवाज न करता काटले. जणू [illegible] वजनच नव्हते. शत्रू तेथे होता हे त्याला माहीत [illegible] त्याची तशी खात्री होती. वाटेत ससा नेमका उडी [illegible] हे लांडग्याला ज्या अंत:प्रेरणेने माहीत असते, त्याच

अंत:प्रेरणेने वास्कोवला स्वत:च्या शत्रूचा ठिकाणा माहीत होता.

मैदानाच्या टोकाशी झुडूपांमध्ये तो स्तब्ध उभा राहिला. अजिबात हालचाल न करता विहीरीचा कठडा न्याहाळत राहिला. त्याने सकाळी ठार केलेल्या जर्मनाचा आता तेथे मागमूस नव्हता. झोपडीला व तिच्या जवळच्या काळपट झुडूपांनाही त्याने बारकाईने न्याहाळले. संशयास्पद असे तेथे काहीही नव्हते, मुळीच नव्हते, तरीही सार्जंट-मेजर धीराने वाट पहात राहिला.

झोपडीच्या कोपऱ्यापासून एक अंधुक ठिपका मंदपणे सरकला तेव्हा त्याला आश्चर्य वाटले नाही. नेमक्या ह्याच ठिकाणी पहारेकरी असणार अशी त्याची खात्री होती.

अत्यंत सावकाशपणे, कमालीच्या मंदपणे, त्या पहारेकऱ्याच्या दिशेने तो सरकू लागला. जणू काही स्वप्नात असल्याप्रमाणे मंदपणे तो एक पाऊल वर उचलायचा आणि वजन नसल्याप्रमाणे जमिनीवर ते पाऊल खाली टेकवायचा. तो पावले टाकत होता असे मुळी भासतच नव्हते. सबंध शरीराचे वजन थेंबाथेंबाने ओतत तो चालला होता असे वाटत होते. एकही डहाळी करकरू नये म्हणून. अशा रीतीने हा विचित्र पक्षी-नाच करत त्याने मैदानाला वळसा घातला आणि स्तब्ध पहारेकऱ्यामागे तो थांबला. त्या रुंद, काळ्या शिलोटीकडे आता तो अधिकच मंदपणे आणि सफाईदारपणे सरकत होता. तो चालत नव्हता, तरंगत होता.

एक पाऊल अंतरावर तो थांबला. खूप वेळापासून त्याने श्वास रोखून धरला होता. आता त्याने काळजाला ठिकाणावर यायला अवधी दिला. खूप आधीपासूनच त्याने रिवॉल्वर परत चामडी पिशवीत ठेवून दिले होते आणि उजव्या हातात सुरा

पकडून तो उभा होता. माणसाच्या शरीराच्या उग्र दर्पाने त्याच्या नाकपुड्या भरून गेल्या. सावकाशपणे, एकेक मिली-मीटरने, त्या एकच एक निर्णायक घावासाठी त्याने सुरा वर उचलला.

पण दरम्यान, बळ एकवटण्यासाठी त्याने आणखी अवधी घेतला. त्याच्या अंगात अगदी कमी बळ उरले होते आणि त्याचा डावा हात इतःपर निकामी बनला होता.

त्या घावात त्याने आपले सर्वस्व खर्ची घातले, शेवटच्या थेंबापर्यंत सर्व ताकद वापरली. किंचाळी उमटलीच नाही. [illegible] एक विचित्र, दीर्घच दीर्घ उसासा आणि मग फॅसिस्ट गुडघ्यांवर खाली कोसळला. सार्जंट-मेजरने लाथेने थाडदिशी दार ढकलले आणि तो झोपडीत घुसला.

«Hände hoch!»

[illegible] होते. रेल्वेकडे शेवटची मुसंडी मारण्यापूर्वी [illegible] चालले होते. फक्त एक जण जागा होता [illegible] उचलण्यासाठी तो कोपऱ्यात झेपावला, [illegible] चटकन पिस्तूल झाडून त्याला लोळवले. पिस्तू-[illegible] झोपडीच्या सखल छताखाली घुमला, जर्मन [illegible] आणि सर्व जर्मन शब्द सार्जंट-मेजरच्या [illegible].

[illegible] त्यागाईन... त्यागाईत! .."

[illegible] घाणेरड्या शिव्यांची लाखोली वाहिली...

नाही, त्याच्या हुकूमाची अथवा सार्जंट-मेजर हातात पाजळत असलेल्या ग्रेनेडची जर्मनांना भीती वाटली नव्हती. पण सभो-वतालच्या अनेक वेर्स्ती परिसरात फक्त तो एकटाच होता

आणि दुसरे कुणीही नव्हते, ह्यावर त्यांचा विश्वासच बसत नव्हता, तशी कल्पना त्यांना स्वप्नातसुद्धा शिवली नसती. त्यांच्या फॅसिस्ट मेंदूंना हे अवगाहन करणे जमले नाही. म्हणूनच, त्याच्या आज्ञेनुसार, ते जमिनीवर पालथे पडून राहिले. चौघेही पडून होते आणि झटपट हालचाल करणारा पाचवा एव्हाना दुसऱ्या जगात दाखल झाला होता.

मग त्यांनी एकमेकांना कंबरपट्ट्यांनी बांधले, चांगले कसून बांधले आणि शेवटच्याला फेदोत एवग्राफीचने खुद्द स्वतः बांधले. हे करून झाल्यानंतर तो रडला. त्याच्या मळक्या, दाढी न केलेल्या चेहऱ्यावरून अश्रू ओघळत होते. तापामुळे तो एकाच-वेळी थरथर कापत होता, रडत होता, हसत होता आणि ओरडत होता:

"काय, घेतलंत?.. घेतलंत, काय? पाच पोरी, फक्त पाच पोरी होत्या, फक्त पाचजणी!.. पण जाता आलं नाही तुम्हाला, कुठंही जाता आलं नाही... नुसते इथं घिरट्या मारत बसलात!.. तुमच्यापैकी प्रत्येकाला ठार मारीन... अगदी प्रत्येकाला... माझ्या हातांनी ठार मारीन... जर वरच्या अधिकाऱ्यांनी तुम्हाला जिवंत सोडलं तर! मग खुशाल माझ्यावर खटला भरोत! खुशाल!.."

त्याचा दंड ठणकत होता. त्यामुळे त्याचे सर्वांग तापाने फणफणत होते. आणि त्याचे मन भरकटू लागले. शुद्ध हरपण्याची त्याला भीती वाटत होती आणि बळाचा शेवटचा अंश वापरून तो कसाबसा भान टिकवून होता.

परतीचा प्रवास त्याला कधीही आठवू शकला नाही. जर्मनांच्या पाठी एकीकडून दुसरीकडे झुलत होत्या, कारण झिंगलेल्या दारुड्याप्रमाणे वास्कोवच्या झुकांड्या जात होत्या.

[illegible]च्या चार पाठींविना दुसरे काहीही तो पाहू शकत नव्हता आणि त्याच्या मनात एकच विचार होता—जर त्याची शुद्ध [illegible]पायला लागली, तर प्रथम तो त्यांना गोळ्या घालणार [illegible]. आणि त्याची शुद्ध कोळ्याच्या जाळ्याच्या शेवटच्या [illegible]च्यावर ओठंगून होती. सबंध शरीरभर त्याला ठणका बसल्या [illegible] आणि त्या वेदनांपायी तो अक्षरशः बोंबलत होता. [illegible] [illegible] होता आणि रडत होता. अगदी खाली कोसळण्याच्या [illegible] [illegible] होता.

[illegible] त्यांना हटकले आणि हटकणारे मित्र होते, शत्रू [illegible] [illegible] [illegible]त्री पटली तेव्हाच त्याने स्वतःची शुद्ध हरपू [illegible] [illegible]...

## उपसंहार

[illegible] [illegible]!

[illegible] [illegible] [illegible] [illegible] आहेस, तर आम्ही एका [illegible] [illegible] [illegible] [illegible]च्यात मासे धरण्यात वेळ घाल-[illegible] [illegible]. [illegible] [illegible] फार हैराण करतात हे खरे, [illegible] [illegible] [illegible] [illegible] आहे. ये मित्रा, काही दिवसांची [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] इकडे. मोटारी नाहीत, माणसांची [illegible] [illegible] [illegible] [illegible] एक मोटारबोट पाव घेऊन [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible]सारखे. प्रवाशांसाठी [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] मासे त्यांच्यात. आणि छोटया [illegible] [illegible] [illegible]. भुंकऱ्या तर विचारूच नकोस!..

आज मोटारबोटीतून कुणी एक पांढरे केसवाला, एकच हात असलेला एक म्हातारा आला होता. त्याच्या संगतीला रॉकेट दळातला एक कॅप्टन होता. कॅप्टनला म्हणतात आल्बेर्त

फेदोतोविच (कल्पना करू शकतोस?) आणि तो आपल्या म्हाताऱ्याला पिताजी म्हणून हाक मारतो! इथे ते काहीतरी शोधत होते, पण काय ते समजले नाही...

"...काल पत्र पुरे करू शकलो नाही, म्हणून सकाळी पूर्ण करतोय.

"इथेसुद्धा लढाई झाली होती म्हणतात... तू आणि मी जन्मण्यापूर्वी इथे लढले होते.

"आल्बेर्त फेदोतोविच आणि त्याचे वडील एक संगमरवरी लादी घेऊन आले होते. आम्ही थडग्याचा शोध घेतला— नदीपलिकडे जंगलात ते आहे. कॅप्टनच्या वडिलांना फक्त त्यांनाच समजणाऱ्या खुणांवरून ते सापडले. लादी वाहून न्यायला त्यांना मदत करण्याची माझी इच्छा होती—पण मला धीर झाला नाही.

"आणि इथल्या पहाटवेळा अगदी शांत-निवांत आहेत. फक्त आजच माझ्या हे ध्यानात आले."



## माननीय वाचक!

प्रस्तुत पुस्तकाबाबतची आपली मते आणि सूचना जाणून घेण्यास आम्हाला आनंद वाटेल. रशियन आणि सोविएत साहित्याचे तुमच्या मातृभाषतील अनुवाद आमच्या लोकांच्या संस्कृतीची व जीवनाची सखोल ओळख करून घेण्यास [illegible] मदत करतील अशी आशा आहे. [illegible] [illegible]: 'रादुगा' प्रकाशन, १७ झूबोवस्की [illegible] [illegible] ११९०२१, सोविएत संघ.

विश्नेव्स्की व. '**आशावादी शोकांतिका**'.

नाटक

सुप्रसिद्ध सोविएत लेखक आणि सार्वजनिक कार्यकर्ते व्सेवोलोद विश्नेवस्की (१९००-१९५१) यांनी तीन युद्धांमध्ये भाग घेतला होता: पहिले महायुद्ध, यादवी युद्ध आणि महान पितृभूमीरक्षक. त्यांचे नाटक 'आशावादी शोकांतिका' सोविएत नाटयशास्त्राच्या सुवर्ण-निधीत सामील झाले आहे. ऑक्टोबर क्रांती-नंतरच्या काही महिन्यांच्या काळात ह्या नाटकाचे कथानक घडते: अराजकवादी खलाशी पलटणी-च्या कमिस्सारपदी, राजकीय नेतृत्वपदी, एका स्त्रीची नेमणूक होते. ह्या असाधारण परिस्थि-तीमधून लेखकाने सर्वविजिगीषु विचाराचे बळ प्रकट केले आहे. बोल्शेविकांनी खलाशांना, सर्व लोकांना, हे सर्वविजयी विचाराचे बळ दिले.

